Prajna Pathshala Mandal, Wai.

SHRIDHAR GANESH PARANJPE
MEMORIAL LECTURES
NAGPUR UNIVERSITY 1940.

# The Criticism of Hinduism

# हिंदुधर्माची समीक्षा

( SECOND EDITION )

LECTURES
DELIVERED BY

**Pandit Laxmanshastri Joshi,** Tarkateerth.
( Editor, *Dharmakosha, Wai.* )
&
( President, *Prajna Pathshala Mandal, Wai* )

**Wai 1942**

Price Rs. 2/-

## प्रकाशकाचे दोन शब्द



'हिंदुधर्मसमीक्षा' या पुस्तकाची पहिली आवृत्ति आक्टोबर १९४१ मध्यें नागपूर विश्वविद्यालयानें प्रसिद्ध केली. दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करण्याचा अधिकार प्रस्तुत पुस्तकाचे लेखक तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांस विश्वविद्यालयानें दिला आहे. लक्ष्मणशास्त्री यांनी विश्वविद्यालयानें आपणांस दिलेला द्वितीयावृत्तीचा अधिकार प्राज्ञपाठशाळामंडळास अर्पण केला आहे. याबद्दल प्राज्ञपाठशाळामंडळ तर्कतीर्थ जोशी यांचे अत्यंत आभारी आहे. हें पुस्तक हिंदी, बंगाली वगैरे भाषांत प्रसिद्ध करण्याचा योग लवकरच येईल अशी अपेक्षा आहे.

१ मे १९४२ — वि. ग. जोशी.

वाई — चिटणीस, प्रा. पा. शा. मंडळ

# प्रास्ताविक



नागपूर विश्वविद्यालयाने हिंदुधर्मसमीक्षेसंबंधी व्याख्यानें देण्यास आमंत्रण दिल्याबद्दल व तीं व्याख्यानें प्रसिद्ध केल्याबद्दल विश्वविद्यालयाचा व विशेषतः कुलगुरू नानासाहेब केदार ॲडव्होकेट नागपूर यांचा मी अत्यंत आभारी आहे.

या व्याख्यानांत हिंदुधर्माची समीक्षा ऐतिहासिक पद्धतीने व ऐतिहासिक समाजशास्त्राच्या दृष्टीने केली आहे. या व्याख्यानातील हिंदुधर्मावरील टीका अनेक हिंदु शिक्षितांना पटणार नाही; एवढेंच नव्हे तर, त्यांना असेही वाटेल कीं, हें एक नवें पाखंड किंवा धर्मविध्वंसक नास्तिक्य आहे. धर्म ही मानवजातीची अफू आहे, या विचाराने प्रेरित होऊन हें समीक्षण केलें नाही; तर धर्माची समीक्षाच सर्व समीक्षेचा खरा प्रारंभ होय (The criticism of religion is a beginning of all criticism. Karl Marx.) या विचाराची प्रेरणा या समीक्षेच्या मुळाशी आहे.

पहिल्या व्याख्यानांत पुढील दोन व्याख्यानांतील विचारांची आधारभूत विचारसरणी मांडली आहे. पहिल्या व्याख्यानांत हिंदुधर्माच्या समीक्षेस प्रत्यक्ष प्रारंभ न केल्यामुळे किंचित् विषयान्तर वाटण्याचा संभव आहे. आधुनिक समाजशास्त्रांतील आणि मानव-

जातिशास्त्रांतील धर्ममीमांसा फारच थोड्या शिक्षितांना परिचित आहे म्हणून पुढील दोन व्याख्यानांतील विचारांचा नीट अर्थ समजण्याकरिता आणि त्या विचारांची सामान्य भूमिका काय आहे, हें समजून यावें म्हणून, दूरान्वयाचा दोष पतकरूनही धर्मसमीक्षेसंबंधी व धर्मविकासासंबंधी सामान्य तत्त्वें, समाजपरिवर्तनासंबंधी सामान्य सिद्धान्त, संस्कृतीची मीमांसा व मानवजातिशास्त्रज्ञांच्या धर्मोपपत्ति यांची मांडणी करावी लागली. समाज रचनेचे नियम, संस्कृति व धर्म यांची गल्लत करण्याची सवय अनेक पंडितांना असते, त्यामुळे हिंदुधर्माचें विवेचन करीत असता अनेक लेखक घोटाळा करतात; म्हणून समाजरचना, संस्कृति व धर्म यांच्या संबंधांचा उलगडा पहिल्या व्याख्यानात करावा लागला.

धर्माची व्याख्या व धर्माच्या ज्ञानाचें साधन या संबंधी प्राचीन भारतीय तत्त्ववेत्त्यांनी अत्यंत सूक्ष्म व मूलगामी चर्चा केली आहे, त्या चर्चेचा परामर्श दुसऱ्या व्याख्यानात घेतला आहे. त्या बरोबर आधुनिक धर्मव्याख्या व धर्मप्रमाणाची आधुनिक मीमांसा मांडली आहे. हिंदु तत्त्वचिंतकांनी केलेली धर्मव्याख्या व धर्मप्रमाणचिकित्सा यांचा परामर्श हाच हिंदुधर्माच्या समीक्षेचा खरा प्रारंभ होय, म्हणून हिंदुधर्माची समीक्षा दुसऱ्या व्याख्यानांत प्रत्यक्ष सुरू होते.

तिसऱ्या व्याख्यानात हिंदुधर्माच्या सामान्य व विशेष स्वरूपाची, अंगोपांगाची, विविध व विचित्र शाखोपशाखांची, ऐतिहासिक क्रमाची आणि ऐतिहासिक कार्यकारणपरंपरेची मांडणी केली आहे. हिंदुसमाज व हिंदुधर्म यांचा परस्पर संबंध निरूपिला आहे. चातु-

वैर्ण्य व नवें वंशशास्त्र यांचा काय लागाबांधा आहे, हें ही सांगितलें आहे. हिंदुधर्मसुधारणेच्या नव्या प्रयत्नांचाही समाचार घेतला आहे. शेवटी, या पुढें सामाजिक प्रगतीस धर्ममूल्यांची गरज आहे कीं नाही याची चर्चा करून, समाप्ति केली आहे.

हिंदुधर्मावर टीका करणे हें फारच जबाबदारीचें व अनेक कारणास्तव अवघड काम आहे. पाश्चात्य राष्ट्रांच्या राजकीय दास्यात सापडल्यामुळे हिंदी राष्ट्रवादाची दुरभिमानात व अंधश्रद्धेत परिणति झाली आहे. त्यामुळे या व्याख्यानांतील विचार अंधश्रद्धांच्या जिव्हारीं लागतील. स्वकीय संस्कृति, स्वीय धार्मिक संस्था व स्वतःच्या समाजाचा इतिहास चिकित्सक व टीकात्मक दृष्टीने तपासण्याचें धैर्यच शिक्षितांच्या ठिकाणी शिल्लक राहिलें नाही. स्वतःच्या परंपरेच्या विरुद्ध बंड करणारा बुद्धिवादच स्वतःच्या राष्ट्रांत व समाजांत उच्चतर स्थित्यन्तर घडवून आणू शकतो. परंतु पूर्व परंपरेचें लंगडें समर्थन करणाऱ्या विचारसरणीसच भारतीय समाजात अग्रपूजेचा मान आहे. परंपरागत मूल्यांची तपासणी करणारी, जुन्या संस्था जुने विचार आणि जुने आचार यांची दया माया न ठेवता शास्त्रीय रीतीने छाननी करणारी, चालू समाजरचना आणि धर्म यांच्यावर बौद्धिक हल्ला करणारी व सामाजिक नवजीवनास प्रसविणारी चिकित्सा सोसण्याइतकें मानसिक बल फार थोड्या भारतीयांच्या ठायी शिल्लक आहे. जें जुनें जग, गळ्यांतील लोढणे बनून, मनुष्याच्या प्रगतीस अडथळा करीत आहे, त्याचा विनाश करणारीं शास्त्ररूपी विचारशस्त्रें निर्माण कर-

ण्याचा प्रयत्न अनेक पुरोगामी तत्त्वचिंतक व कर्तृत्वशाली लोक करीत आहेत. त्या शास्त्ररूपी शस्त्रांनी जुन्या जगाशी लढता लढता, जुन्या व वर्तमान समाजातील मानसिक व भौतिक दास्याचा ज्यात मागमूसही नाही असें, सगळ्या समाज-घटकांना सारखेच स्वातंत्र्य प्राप्त करून देणारें, सर्व समाजघटकांच्या कर्तृत्वाच्या पूर्ण विकासास अवसर देणारें नवें जग घडवावयाचें आहे. त्या कर्त्या लोकांच्या सेनेत दाखल झालेला एक पायिक एवढाच प्रस्तुत वक्त्याचा दर्जा आहे. हा वक्ता तों विचारशास्त्रें घडविणारा एक साक्षेपी कामगार आहे.

लक्ष्मणशास्त्री जोशी.



# हिंदुधर्माची समीक्षा

---

व्याख्यान दुसरें

व्याख्यान तिसरें



---

# हिंदुधर्माची समीक्षा

व्याख्यान पहिलें

## धर्मसमीक्षेची भूमिका



हिंदुधर्माच्या समीक्षेस प्रारंभ करावयाचा म्हणजे धर्मसमीक्षेची सामान्य भूमिका प्रारंभीं मांडली पाहिजे. या सामान्यभूमिकेचे, ऐतिहासिक धर्मसमीक्षेची सामान्य तत्त्वप्रणाली व धर्मोत्पत्तिविषयक आधुनिक उपपत्ति, असे दोन भाग आहेत. यांचें क्रमशः निरूपण करावयाचें आहे.

### ( १ ) ऐतिहासिक धर्मसमीक्षेची तत्त्वप्रणाली

ह्या तत्त्वप्रणालीचें सविस्तर प्रतिपादन करावयाचें आहे. या प्रतिपादनाचें सार थोडक्यांत असें आहे.

( अ ) धर्मसमीक्षा ही मानवेतिहासशास्त्राचीच एक शाखा आहे. म्हणून ऐतिहासिक धर्मसमीक्षेचा उदय मानवजातिशास्त्राच्या उदयाबरोबरच झाला.

( आ ) ऐतिहासिक परिणतिक्रमाची साकल्यानें व सामान्यरूपानें मीमांसा करावयाची असल्यास प्रत्येक ऐतिहासिक घटनेची पृथक्‌पणें विशेषरूपानें समीक्षा करावी लागते, हें ऐतिहासिक पद्धतीचें

मूलभूत तंत्र होय. या मूलभूततंत्राचें अवलंबन करूनच धर्मसमीक्षा केली पाहिजे.

( इ ) नवधर्मसमीक्षेची सामान्य तत्वें पुढीलप्रमाणें आहेतः—

( १ ) मानवी मनांतूनच धर्म निर्माण झाला आहे व विकसित झाला आहे म्हणून धर्मसमीक्षेचें मानवबुद्धि ( Reason ) हेंच साधन होय.

( २ ) धर्मांतील सत्यासत्य कल्पना, धर्म-प्रयोजन आणि धर्म-कल्पनांचा व धर्म-संस्थांचा ऐतिहासिक कार्यकारणभाव हे तीन नव-धर्मसमीक्षेचे विषय होत.

( ३ ) समाजाच्या विकासाबरोबरच धर्मही विकास पावत असतो. समाजसंस्था व संस्कृति ज्या प्रगतीच्या अथवा अवनतीच्या विशिष्ट अवस्थेंत असते, त्याच अवस्थेंस अनुरूप अशीच धर्मसंस्थेचीही अवस्था असते.

( ४ ) धर्मविकासाचीं मुख्य दोन ज्ञापकें आहेत; त्या त्या कालचें विज्ञान व विज्ञानानुसारी संस्कृति यांच्याशीं अविरोध हें पहिलें ज्ञापक होय. विवक्षित कालखंडांतील विशिष्ट समाजाच्या किंवा जमातीच्या सामाजिक प्रगतीस प्रेरक अशी शक्ति उत्पन्न करण्याची योग्यता, हें दुसरें ज्ञापक होय.

शेवटीं वरील तत्त्वांचें आकलन करतां यावें म्हणून संक्षेपतः संस्कृतीची मीमांसा करावयाची आहे व समाजपरिवर्तनाच्या शास्त्रांतील मुख्य तत्त्वांचें दिग्दर्शन करावयाचें आहे.

धर्मसमीक्षा ही एक सामाजिक तत्त्वज्ञानाची शाखा आहे.

धर्मसमीक्षा इतिहासदर्शनाची शाखा

कारण धर्म ही एक सामाजिक वस्तू आहे. सामाजिक म्हणजे समाजनिर्मित व समाजाच्या इतिहासाबरोबरच जिचा इतिहास बनतो अशी. सामाजिक तत्त्वज्ञानास इतिहासाचें तत्त्वज्ञान किंवा 'इतिहासदर्शन' ( Philosophy of History ) म्हणतात. मानव समाजाच्या घडामोडींच्या व स्थित्यंतरांच्या समीक्षेंतूनच सामाजिक तत्त्वज्ञान किंवा इतिहासदर्शन निर्माण होतें. सगळ्या मानवसमाजांच्या निरनिराळ्या प्रकारच्या व्यापारांचें व संस्थांचें समालोचन करून जे सामान्य व विशेष सिद्धांत किंवा प्रमेयें निष्पन्न होतात, त्या सिद्धांतांची व प्रमेयांचीं सुसंगत रचना म्हणजेच इतिहासाचें तत्त्वज्ञान होय. धर्मसमीक्षा ही इतिहासतत्त्वज्ञानाचीच एक कक्षा होय. कारण समाजेतिहासाशीं धर्मेतिहास पूर्णपणें निगडित असतो.

समाज ही इतिहासबद्ध वस्तू असल्यामुळें त्याचें प्रत्येक अंग

धर्माची ऐतिहासिक समीक्षा

इतिहासबद्ध आहे. इतिहासांतील प्रत्येक घटना कार्यकारणभावाच्या मालिकेंतील एक दुवा म्हणून तपासावी लागते. धर्माचेंही असेंच आहे. धर्म अत्यंत प्राकृत हीन अवस्थेपासून तो अतिशय उच्च

---

( १ ) Studies in the Philosophy of Religion p. 6 by Pringle Pattison.

अशा अवस्थेप्रत परिणत पावलेली अशी ऐतिहासिक घटनांची मालिकाच आहे. त्या घटनांचा प्रत्येक विशिष्ट दुवा लक्षांत घेऊनच त्याची अवगति करून घेतली पाहिजे. या अवगतीस धर्माची ऐतिहासिक समीक्षा म्हणतात.

ऐतिहासिक धर्मसमीक्षेचा उदय

ऐतिहासिक पद्धतीस अनुसरणारी धर्मसमीक्षा पाश्चात्य पंडितांनीं इ० सनाच्या १८व्या शतकांत सुरू केली. युरोपियन लोकांनीं जेव्हां जगाच्या अनेक सफरी केल्या व पृथ्वीच्या सगळ्या पृष्ठभागांवर आपलें वर्चस्व स्थापण्यास सुरवात केली, तेव्हां त्यांनीं सर्व मानवांच्या वृत्त व वर्तमान संस्कृतीच्या अभ्यासाचीं साधनें गोळा केलीं. कालग्रस्त नष्ट संस्कृतींचे भूगर्भांतील अवशेष उकरून काढण्यास सुरवात केली. आफ्रिका, आस्ट्रेलिया, अमेरिका, मलयाद्वीपें इत्यादि ठिकाणच्या मानवसंघाच्या सामाजिक जीवनाचें अध्ययन आरंभिलें. या मानवेतिहासाच्या अभ्यासाचें धर्माभ्यास हें एक महत्त्वाचें अंग झालें. धर्मविकासाच्या निरनिराळ्या अवस्था व विभिन्न देशकालपरिस्थितींतील विचित्र धार्मिक प्रकार, यांचे निरूपण व स्पष्टीकरण करणारें अफाट वाङ्मय निर्माण झालें. धर्माचा इतिहास अवगत झाल्यामुळें धर्माची ऐतिहासिक समीक्षा किंवा ऐतिहासिकदर्शन उदयास आलें. धर्माच्या इतिहासांतील घटनांची ऐतिहासिक समीक्षा सुरू झाली. पहिल्यांदा लेसिंग ( Lessing ) व हर्डर ( Herder ) यांनीं 'मानववंशाचें शिक्षण' ( The education of human race ) या ग्रंथाच्या द्वारें धमसमीक्षेला ( Philosophy of Religion ) प्रारंभ केला. या ग्रंथांत विशेषतः यहुदी व ख्रिश्चन धर्मांचीच

ऐतिहासिक समीक्षा केलेली दिसते. नंतर हेगेलनें ( Hegel ) इतिहासाचें तत्त्वज्ञान लिहिलें; व धर्माच्या ऐतिहासिक समीक्षेला प्रगल्भदशेस आणले. हेगेल नंतर १९व्या शतकांत धर्मसंस्थेची अत्यंत सूक्ष्म व विस्तृत अशी चर्चा मानवसंस्कृतीच्या अभ्यासकांनीं सुरू केली. सर. टायलरनें ( Tylor ) 'प्राथमिक संस्कृति' ( Primitive culture ) या ग्रंथांत रानटीसमाजापासून तो तहत आधुनिक सुधारलेल्या समाजापर्यंत जी निरनिराळीं धर्मरूपें दिसतात, त्यांतील ऐतिहासिक तत्त्वांची छाननी केली. त्यानंतर सर फ्रेजरनें ( Sir James Frezer ) 'सुवर्णमयी शाखा' ( Golden Bough ) या ग्रंथांत टायलरचीच परंपरा चालवून, धर्मचर्चेंत अनेक प्रगल्भ सिद्धांतांची भर घातली. इंग्लंडमध्यें त्याचवेळीं स्पेन्सरनें सामान्य धर्ममूलाची चर्चा केली. रॉबर्टसन् स्मिथ यानें सेमाइट मानववंशांच्या अतिप्राचीन धर्मसंस्थेच्या इतिहासाचें मनन जगापुढें मांडलें. जर्मनींत कँट, हेगेल, श्लीरमाखर, स्ट्रॉस, फायरबाख, मॅक्स वेबर, फ्रान्समध्यें कोंट, डुरखीम इंग्लंडमध्यें स्पेन्सर, टायलर, फ्रेझर, राबर्टसन् स्मिथ, मॅरेट, टॉनी इत्यादि धर्ममीमांसक १९ व २० व्या शतकांत प्रसिद्धीस आले. भारतीय धर्मांचें परिशीलन सर विल्यम् जोन्स, झिमर, मॅक्समुलर, हॉप्किन्स, कुंटे, भांडारकर, लो. टिळक वगैरे प्राच्यविद्यासंशोधकांनीं केलें. ही सगळी धर्मसमीक्षेची सामग्री मोठी आहे. धर्माचा इतिहास म्हणजे निरनिराळ्या देशकालांतील भिन्न मानवसमाजांत निदर्शनास येणारीं धर्मरूपें यांचें कार्यकारणभावघटित निरूपण होय. या इतिहासाच्या अधिष्ठानावर आधुनिक धर्ममीमांसा किंवा धर्म-

---

(१) Studies in the Philosophy of Religion p. 1.

समीक्षा निर्माण झाली आहे.

ऐतिहासिक पद्धतीचें मूलभूत तंत्र— विशेषपरीक्षा

समाजाच्या निरनिराळ्या ऐतिहासिक अवस्थेशीं संवादी असेंच प्रत्येक धर्माचें स्वरूप असतें. त्याचें हें वैशिष्ट्य व त्या त्या समाजसंस्थेंतील प्रयोजन, भिन्न भिन्न असते. इतिहासाच्या कोणत्याही शाखेस हाच वैशिष्ट्याचा नियम लागू आहे. समाजसंस्थेंतील कला, वाङ्मय, रीति, नीति, धर्म, अर्थव्यवस्था, राज्यपद्धति, शिक्षण, कायदा, युद्ध-योजना, इत्यादि संस्थांचें सामान्य व विशेष असें द्विविध अभ्यसन करणें अगत्याचें असतें. मुख्यतः विशेषस्वरूपाच्या परीक्षेशिवाय त्या संस्थेची कार्यपद्धति, परिणाम व प्रयोजन यांची अवगतीच अशक्य असते. सामाजिक शास्त्राचें प्रत्येक प्रस्थान याच रीतीनें शोधावें लागतें. त्या त्या सामाजिक संस्थांच्या त्या त्या विशिष्ट अवस्थेंतील स्वरूपांचें पृथक् पृथक् समालोचन करावें लागतें व सिद्धांत बांधावे लागतात. आधुनिक अर्थशास्त्र हें याचें उत्तम उदाहरण आहे. ॲडॅम स्मिथ व रेकार्डो यांचे अर्थशास्त्रीय सिद्धान्त, इंग्लिशांच्या भरभराटीस आलेल्या प्रगमनशील भांडवलदारी आर्थिक युगास जसें लागू पडतात, तसे इतरत्र लागू पडत नाहींत; ही गोष्ट नीस, रोशर व मोलर यांनीं चांगल्या रीतीनें दाखविली आहे. रामायणीय लंकाविजय, महाभारतीय युद्ध, सिकंदराचा दिग्वि-जय, रोमन लोकांचा लष्करी विस्तार, अरबांचा विश्वविक्रम, चंगीझ-खानाचें आक्रमण, पाश्चात्यांचा विश्वविजय, १९१४ सालचें महायुद्ध आणि चालू जर्मन आक्रमण या सगळ्यांना युद्ध ही

संज्ञा आहे. पण त्या प्रत्येक घटनेचें रहस्य व कार्य अगदीं पृथक् आहे. त्या प्रत्येक युद्धाचें विशिष्ट स्वरूप अभ्यासिल्याशिवाय त्याची कार्यकारणमीमांसा पुरी होऊं शकत नाहीं; त्याचा शास्त्रीय अर्थ कळूं शकत नाहीं; प्रत्येक ऐतिहासिक घटनेचें स्वतंत्र महत्त्व असतें. विशेष—परीक्षाच इतिहास-मीमांसेचें खरें अधिष्ठान [१] आहे. विशेष-परीक्षा हें ऐतिहासिक पद्धतीचें मूलभूत तंत्र आहे. धर्माची समीक्षा याच रीतीनें केली पाहिजे.

मानवी बुद्धि धर्मसमीक्षेचें साधन

"अमुक एक खरा धर्म होय, व अमुक एक खोटा धर्म होय, असें सश्रद्ध लोकांनीं मानलेले जगांतील धर्मांचे विभाग, शास्त्रीय धर्मसमीक्षेस मान्य नाहींत. अमुक एक धर्मच संपूर्ण सत्य व दुसरा धर्म अधोगतीचा व पतनाचा मार्ग होय, अशी भावना हिंदु, खिश्चन, मुसलमान वगैरे धर्मांच्या अनुयायांच्या ठायीं असते. या भावनेला शास्त्रीय धर्मसमीक्षेंत थारा नाहीं. विशिष्ट ऐतिहासिक घटना एवढ्याच दृष्टीनें धर्मसमीक्षा प्रत्येक धर्माकडे पाहते. कारण अलौकिक साक्षात्कार किंवा अलौकिक शब्दप्रमाण हें धर्माचें प्रमाण व मूळ आहे, असें धर्मसमीक्षा गृहीत धरत नाहीं. अलौकिक प्रमाण हेंच धर्माचें मूळ मानलें, तर धर्मसमीक्षेस अवसर फारच थोडा राहतो. समीक्षा म्हणजे बुद्धीच्या साहाय्यानें, बुद्धिवादाचें नियम उपयोगांत आणून तपासणी करणें. एकदा अलौकिक हेंच

---

(१) The Historical Method in Social Science pp. 27-33 by M. M. Postan.

धर्ममूल व धर्मप्रमाण मानलें म्हणजे धर्माची बौद्धिक चिकित्साच करणें अशक्य होतें; मग अलौकिक साक्षात्कारानें प्राप्त झालेल्या धर्माची बुद्धीच्या साहाय्यानें व्यवस्था लावणें, नीटनेटकी मांडणी करणें, एवढेंच काम राहतें. तेथें धर्माच्या सत्यस्वरूपाचा व प्रयोजनाचा निर्णय करण्याचें काम अलौकिक प्रमाणच करूं शकतें. ज्याला अलौकिक साक्षात्कार झाला आहे, त्याचा शब्दच शेवटचें अवगतीचें साधन बनतें. बुद्धिवादावर आधारलेल्या धर्मसमीक्षेत अलौकिक साक्षात्कार किंवा शब्दप्रामाण्य मान्य नसलें तरी, तोही समीक्षेचा विषय बनतोच. धर्मप्रमाण या सदरांत पुढें या विषयाची चिकित्सा करावयाची आहे.

मानवी बुद्धि हेंच समीक्षेचें मुख्य साधन आहे. कारण धर्म हा त्या त्या देशकालपरिस्थितीत मानवी मनानें म्हणजे मानवांच्या बुद्धीनें, भावनांनीं, व आकांक्षांनींच निर्मिलेला आहे. त्याची साधकबाधक प्रमाणांनीं तपासणी करणें व धार्मिक श्रद्धा व कल्पना यांची शुद्धि करणें, हें समीक्षेचें प्रयोजन होय. समीक्षेतून नवा धर्म उत्पन्न होतोच, असें नाहीं, निदान यापुढें तरी होणार नाहीं. कारण नवधर्मसंस्था उत्पन्न होण्याचें युग संपलें आहे.

१८ व्या शतकांतील बुद्धिवादी अनैतिहासिक धर्मसमीक्षा

धर्माची समीक्षा प्राचीनकाळीं चार्वाकानें ज्या पद्धतीनें केली, किंवा युरोपमध्यें व अमेरिकेमध्यें १८ व्या शतकांतील व्हॉलटेर, थॉमसपेन, ईलिहु पामर, शेले, रॉबर्ट इंगरसाल, क्लॅरेन्स, दारो, दि आलेंबर्त इत्यादिकांनीं ज्या तऱ्हेनें धर्मविचिकित्सा केली, ती एकांगी होती. त्यांनीं धर्मसंस्थेचें इतिहासां-

तील महत्त्वाचें स्थान ओळखलें नाहीं. त्यांनीं धर्मांतील व्याघात, हेत्वाभास, भ्रांति, वंचना व खुळचटपणा उघडा करून दाखविला. मानवमनांवरील धर्मकल्पनांची पकड सोडविण्याकरितां महत्प्रयास केलें. धर्म म्हणजे भ्रामक विचारांची व दडपलेल्या जीवांची दीर्घ काळोखी रात्र, असें सांगून जनतेला सूर्यप्रकाश दाखविण्याचा प्रयत्न केला. दि अलेंबर्तचें असें मत होतें कीं, आतापर्यंतचा धर्मेतिहास म्हणजे 'प्रमाद व वंचना' यांचीच कहाणी होय; उरावर बसलेल्या पिशाचाचें दुःस्वप्न जसें विसरावें, त्याचप्रमाणें मानवांचा धार्मिक इतिहास विसरला पाहिजे. व्हॉलटेर तर असें म्हणत असें कीं, ऐतिहासिक धर्म म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून, बेदरकार बदमाषांनीं अज्ञजनतेची निरंतर पिळणूक करण्याकरितां जाणून बुजून रचलेला कटच होय. 'मेल्यावर शेवटीं सगळ्यांना न्याय मिळणार आहे.' या सिद्धांताबद्दल तर तो असें म्हणाला कीं, "हा सिद्धांत म्हणजे पूर्वी एका मूर्खाला फसविण्याकरितां एका लुच्चानें काढलेली युक्ति होय." "ह्यूमनें धर्माचा नैसर्गिक इतिहास" (Natural History of Religion) या ग्रंथाचें शेवटीं म्हटलें आहे कीं, "जगांत पसरलेले धर्मसिद्धांत तुम्ही नीट तपासा म्हणजे धर्मविचार ही आजारी माणसांची स्वप्नेंच होत, हें तुम्हास पटविण्याची फारशी गरजच राहणार नाहीं. बुद्धिवादी म्हणून घेण्यांत ज्यांना कांहीं महत्त्व वाटतें अशा लोकांनीं अंतःकरणापासून पतकरलेले हे सिद्धांत आहेत, असें म्हणण्याचें ऐवजीं, हे सिद्धांत म्हणजे मानवदेहधारी मर्कटांच्या खेळकर वृत्तींतून उत्पन्न झालेल्या लहरीच होत, असेंच तुम्ही मानाल." चार्वाकानें प्राचीनकाळीं

याहीपेक्षां जोराचा हल्ला धार्मिक सिद्धांतावर केला होता.

बुद्धिवादाचे जोरावर धार्मिक सिद्धांत खोडून काढण्याची ही विध्वंसक प्रवृत्ति मानवप्रगतीस अत्यंत आवश्यक असली, तरी ती अपुरी आहे. या विषयाचा मध्यबिंदूच निराळा आहे. तो म्हणजे, धर्मसंस्था ही एक सामाजिक शक्ति आहे, हा विचार होय. या शक्तीच्या पाठीशी एक प्रकारची, विशिष्ट ऐतिहासिक कारणांनीं बनलेली, सामाजिक मनःस्थिति व एक प्रकारची सामाजिक रचना आहे. आज धर्मातील वेडगळपणा व बालिशता उघडकीस आणणें इतकें महत्वाचें नाहीं. धर्माच्या क्षेत्रांत वदतोव्याघात, हेत्वाभास, तर्कदोष, प्रमाद, बालिशपणा व खुळचटपणा पहिल्यापासून आतांपर्यंत इतका माजला असूनही युगानुयुगें अनंत मानवांनीं धर्माला आश्रय कां दिला, हा प्रश्न महत्त्वाचा आहे. धर्मातील अनृत, अज्ञान, भ्रांति, माया, कपट, वंचना, मौर्ख्य यांचे आविष्करण करण्याच्या खटाटोपांत हाच महत्त्वाचा प्रश्न बाजूस पडतो. निराधार कल्पना व हेत्वाभासदुष्ट अनुमानें यांच्यावर आधारलेल्या धार्मिक विचारपद्धतीनेंच, मोठमोठ्या प्रज्ञावंतापासून तो क्षुद्रतम पशुसम मानवापर्यंत सगळ्यांनीं, जीवन घालविलें आहे, असें इतिहास सांगतो. याचा अर्थ असा कीं, धर्मसंस्था ही एक समाजांतील विशिष्ट हितसंबंधाचें रक्षण करणारी सामाजिक शक्ति आहे. धर्मसंस्था ही एक प्राचीन इतिहासांत प्रभावी झालेली सामाजिक शक्ति आहे. या दृष्टीनें या संस्थेच्या सर्वांगांचें समीक्षण करणें अगत्याचें आहे. धर्म-विचारांच्या मिथ्यात्वसिद्धीनें धर्मसंस्था डळमळीत होत नाहीं. त्याकरितां तिची उपयुक्तता सरावी लागतें.

विशिष्टवर्गाचे स्वार्थ ह्या संस्थेच्या अस्तित्वावर अवलंबून आहेत. ती वर्गव्यवस्था जेव्हां नष्ट होईल व जेव्हां सामाजिक जीवनांतील बेबंदशाही नष्ट होईल, तेव्हांच तिचें समाजांतून उच्चाटन [1] होईल. जेव्हां चालू हीन समाजरचना नष्ट होऊन धार्मिक भ्रांतीची गरज नसलेली श्रेष्ठदर्जाची समाजरचना उत्पन्न होईल, तेव्हांच धर्मसंस्थेचा लोप होईल. कारण त्याच स्थितींत सामान्य जनतेस विज्ञानाचें शिक्षण मिळूं शकेल. विज्ञानदृष्टीचा लाभ झाल्याशिवाय सामान्य जनतेच्या दृष्टीवरील धर्मभ्रांतीचीं पटलें नष्ट होणार नाहींत.

चिकित्सक बुद्धिवाद व धर्मविकास

धर्मविकासाचा इतिहास हाच धर्मसमीक्षेचा देखील इतिहास होय. जुन्या युगांतील धर्मसंस्था, धर्मतत्वें, धार्मिक विधिनिषेध व धार्मिक भावना यांच्यात बदल होत असता जे नवे विचार व आचार उत्पन्न होतात, त्या आचारविचारांच्या मुळांशीं एक-प्रकारचा चिकित्सक बुद्धिवाद असतो. नव्या परिस्थितींतील नवे अनुभव मनुष्यांना जुन्या संस्थांत बदल करण्यांस किंवा त्यांचा नाश करण्यास प्रवृत्त करतात. ही बदल करण्याची किंवा नष्ट करण्याची प्रवृत्ति बुद्धिजन्य असते. जेव्हां जुनीं ध्येयें व जुने आचारविचार लय पावूं लागतात, तेव्हां त्यांच्या पोटांतून नवी ध्येयें व नवे आचारविचार जन्माला येतात. या नवीन स्थितीच्या प्रसूतीस बौद्धिक प्रेरणा कारणीभूत होते. प्रगतिमय मानवी प्रवृत्तींच्या मुळांशीं बुद्धिवाद किंवा शोधकबुद्धि ही मूलभूत प्रेरणा आहे. या प्रेरणेमुळें धर्माचा विकास व क्षय

(१) Anti – Duhring p. 355 by F. Engels.

होतो. धर्माला भावना, आकांक्षा, श्रद्धा, भक्ति, प्रीति, द्वेष, भय, विस्मय, विषाद इत्यादि सगळ्या मनःप्रवृत्तींचा आधार असतो, हें खरें आहे. पण त्यांच्याही मुळाशीं स्पष्ट किंवा अस्पष्ट, व्यवस्थित किंवा अव्यवस्थित, प्राकृत किंवा सुसंकृत विचारसरणी किंवा बौद्धिक क्रिया असावीच लागते. विशिष्ट विचारांवाचून वरील मनःप्रवृत्तींना अस्तित्वच नसतें. एवंच विशिष्ट बुद्धिवाद हा प्रत्येक धर्मसंस्थेचें अधिष्ठान होय. जुन्या विचारसरणीचेंच विदारण करून नवा बुद्धिवाद जन्माला येतो. जुन्या बुद्धिवादाची तपासणी करणारा नवा बुद्धिवाद म्हणजेच समीक्षा होय. ही समीक्षक प्रवृत्ति प्रत्येक धर्माच्या इतिहासांत संक्रमणकालीं उदयास येते.

प्रत्येककाळीं नव्या विचारसरणीस, जुन्या विचारसरणीचे लोक ‘अश्रद्धा, पाखंड, व नास्तिक्य’ असें संबोधित आले आहेत. वस्तुतः श्रद्धा म्हणजे विशिष्ट विचारांच्या सत्यतेची खात्री. हल्ली ज्ञानाचा कमी उपयोग करणाऱ्यांच्या मनांतील खात्रीस श्रद्धा म्हणतात. प्रत्येक विचारसरणी, मग ती जुनी असो अथवा नवी असो, उदात्त असो की अवनत असो, त्यांत निश्चितपणा असावयाचाच. त्यास शून्यवादी व संशयवादी हेच अपवाद होत. त्यांच्या ठिकाणीं सुद्धा कांहीं विचार निश्चित स्वरूपाचें असतात. या निश्चयासच श्रद्धा म्हणतां येईल. पण भाषेंत श्रद्धा हा शब्द, ‘तर्काचा व बुद्धिवादाचा प्रतियोगी’ या अर्थी वापरतात. याचें कारण मानसशास्त्राचें अज्ञान होय. श्रद्धा व विचार यांत विरोध असतो, पण तो विरोध म्हणजे जुन्या विचारांचा व नव्या विचारांचा विरोध होय. जुन्या

श्रद्धामय विचारांची तपासणी सुरू झाली म्हणजे ती श्रद्धा ढळूं लागते. म्हणून नव्या विचारांना पाखंड किंवा नास्तिक म्हणतात. धर्मसमीक्षा हें खरोखरच पाखंड आहे. या पाखंडामुळेंच नव्या युगाचा अवतार होतो. नवी ध्येयें, नवी मूल्यें, व नवी समाजरचना यांना ही पाखंडसंज्ञक विचारक्रांतीच जन्माला घालते. कृष्ण, बुद्ध, ख्रिस्त व महंमद हे धर्मसंस्थापक सुद्धां जुन्या धर्माच्या दृष्टीनें महा पाखंडीच होते, हें जर इतिहास सांगतो, तर सगळ्याच धर्मांना विचाराग्नींत घालून परीक्षा करणारी नवधर्मसमीक्षा ही अतिपाखंडी ठरली, तर त्यांत नवल नाहीं.

उपनिषदांनीं देवता, ईश्वर, आत्मा, पुनर्जन्म, यज्ञ इत्यादिकांची मीमांसा सुरू केली; त्यांतच परंपरागत यज्ञसंस्थेचें वैयर्थ्य सिद्ध होऊं लागलें. तीन हजार देवतांची वैचारिक कत्तल याज्ञवल्क्यानें बृहदारण्यक उपनिषदांत केली[1]. ईश्वराचें स्वरूप, एक व्यक्ति न राहतां, एक तत्व, असें ठरूं लागलें. जुनी श्रद्धा तेथेंच ढासळूं लागली. जुन्या धार्मिक विचारांना बौद्धिक तपासणीची आंच लागूं लागली कीं, जुने देव वितळूं लागतात.

हिंदुस्थानांत वैदिक वाङ्मयाच्या उत्तरकालीं, न्याय, वैशेषिक, सांख्य, चार्वाक, वगैरे दर्शनें उत्पन्न झालीं. हीं दर्शनें परंपरागत धार्मिक कल्पनांची साधक बाधक तपासणी व व्यवस्था करण्याकरितां उत्पन्न झालीं. ईश्वर, जग, जीव, कर्म, इत्यादिकांचा अर्थ काय याची मीमांसा या दर्शनांनीं केली. ही दर्शनें म्हणजे धर्मसमीक्षाच होत. चार्वाक, बौद्ध व जैन यांची दर्शनें सुद्धा वैदिकधर्माचें बुद्धिवादानें

(१) बृहदारण्यकोपनिषद्. ३।९।१

निरसन करण्याकरितां व नवीन धर्माच्या समर्थनार्थ उत्पन्न झाली.

धर्म-समीक्षेच्या तीन बाजू

ही दार्शनिक धर्मसमीक्षा, अमुक तत्वें, सत्य कीं असत्य आहेत, हें बौद्धिक प्रमाणानें, ठरविण्याकरितां झाली. आधुनिक धर्मसमीक्षा, अमुक एक धर्म किंवा धर्मतत्व सत्य कीं असत्य आहे, व अमुक एक धर्म किंवा धर्मतत्व उपयुक्त कीं अनुपयुक्त आहे, एवढ्यावरच थांबत नाही; तर तो धर्म किंवा तें धर्मतत्व कोणत्या इतिहासकालांत, कोणत्या सामाजिक परिस्थितींत व कोणत्या ऐतिहासिक कारणांनीं उत्पन्न झालें, याचीही मीमांसा करते. विशिष्ट तऱ्हेची धर्मसंस्था व धार्मिक विचारसरणी ही विशिष्ट सामाजिक परिस्थितीचें फळ असते. त्या विशिष्ट सामाजिक स्थितींत बदल झाला तर धर्मसंस्थेत कसा बदल होतो, या गोष्टीची मीमांसा नवधर्मसमीक्षा करते. (१) धर्मतत्वांचें सत्यत्व (२) धर्मसंस्थांचें ऐतिहासिक प्रयोजन आणि (३) धर्मतत्वांचा व धर्मसंस्थांचा ऐतिहासिक कार्यकारणभाव, या सर्वांची समीक्षा नव्या धर्मसमीक्षेंत करावयाची असते. सत्यत्व तपासणें, प्रयोजन तपासणें व ऐतिहासिक कार्यकारणभाव तपासणें, ह्या धर्मसमीक्षेच्या तीन बाजू होत.

ऐतिहासिक विकास व धर्म

ही इतिहासाधिष्ठित धर्मसमीक्षा धर्मेतिहासाचा उलगडा विकासवादी विचारसरणीनें करते. अत्यंत रानटी अवस्थेंपासून तो सुधारलेल्या मानवसमाजापर्यंत धर्माची बहुत स्थित्यंतरें होतात. हीन समाजांचा धर्म हीन असतो, व उच्च समाजांचा धर्म उच्च असतो. समाजाच्या उच्चतेंत व नीचतेंत अवांतर बहुविध श्रेणी पडतात.

त्यांत तारतम्यांची अविरत परंपरा आहे. मानवसमाजांच्या श्रेष्ठकनिष्ठतेची परीक्षा संस्कृतीच्या सर्वांगांची तपासणी करूनच करतां येते. इतर सांस्कृतिक अंगाबरोबरच धर्माचाही विकास होत असतो. मात्र धर्मविकास किंवा संस्कृति–विकास अतिप्राचीन कालापासून आतांपर्यंत सारखा प्रगतिमयच झाला आहे, असें म्हणतां येत नाहीं. त्यांत अनेक चढउतार आहेत. हे चढउतार जरी इतिहासांत दिसत असले, तरी आज जो मानवसमाजाचा इतिहास उपलब्ध झाला आहे, त्यांत मानवसमाजाचा आजपर्यंत एकंदरींत विकासच झालेला दिसतो. प्राचीनकाळीं अनेक राष्ट्रें उदयास आलीं व नष्ट झालीं, पण त्यांनीं संपादन केलेल्या संस्कृतीचा वारसा एका राष्ट्राकडून दुसऱ्या राष्ट्राकडे गेलेला दिसतो, त्या राष्ट्रांनीं एकमेकांत सांस्कृतिक विनिमय केलेला दिसतो. क्रीट, इजिप्त, सुमेर, पॅलेस्टाईन, भारतवर्ष व चीन यांच्या प्राचीन संस्कृतींचा एकमेकांशीं संपर्क व संघर्ष झाला. आशियाची व आफ्रिकेची भूमध्यसमुद्राजवळची सांस्कृतिक उज्वल परंपरा ग्रीक लोकांना लाभली; ग्रीकांच्या संस्कृतीच्या दीपावर रोमन लोकांनीं आपला सांस्कृतिक दीप पाजळला; रोमन लोकांच्या संस्कृतीच्या प्रकाशांतून मध्ययुगीन युरोप जन्माला आला; त्यानंतर अरबांनीं शास्त्र व कला यांचा संदेश मध्ययुगीन युरोपला दिल्याबरोबर आधुनिक पाश्चात्य सुधारणा जन्मली, व सगळ्या जगाच्या अग्रस्थानीं जाऊन बसली. गतेतिहासांत अनेक राष्ट्रांची उत्थानपतनें झाली, पण मानवसंस्कृतीचा विकास क्रमाक्रमानें होत गेला; व त्याबरोबर धर्माचाही विकास झाला. विकास किंवा प्रगति होतेंच व झालीच पाहिजे, हा मानवे-

तिहासाचा अपरिहार्य नियम नाहीं. प्रतिगामी व प्रगतिविरोधी शक्तींचा विजय झाल्यामुळें कित्येक राष्ट्रें व संस्कृति कालवश झाल्या आहेत, असें इतिहास बजावून सांगत आहे. परंतु व्यक्तिशः तीं तीं राष्ट्रें नामशेष किंवा कालग्रस्त झालेली असली तरी त्यांच्या संस्कृतींचा अंश इतर राष्ट्रांनी संग्रहीत केल्यामुळें आतांपर्यंत एकंदरीत समाजाचा विकास होत गेला[१], हेंही तितकेंच खरें आहे. मानससरोवर किंवा गंगोत्री यांची हिमालयांतून यात्रा करीत असतां अनेक चढउतार येतात, पण एकंदरींत प्रवासी उच्च व उच्चतर अशा पर्वतश्रेणीवरच आरूढ होत जातो; तसा मानव समाजानें मानवोत्पत्तीपासून आजपर्यंत जो पंथ आक्रमिला, त्यांत प्रगतीच झालेली दिसते. संस्कृतीची गोष्ट धर्मालाही लागू आहे. कित्येक वेळां क्रमविकास होत गेला; कित्येक प्रसंगीं विरोधविकासपद्धतीनें उन्नति झाली, म्हणजे पहिल्या ऐतिहासिक परिस्थितीचा नाश होऊन, त्याजागीं दुसरी परिस्थिति उत्पन्न होऊन, प्रगति झाली आहे; कित्येक वेळां दीर्घकालपर्यंत अनवस्था व अवनति यांच्या गर्तेत अडकून राहावें लागलें. इतिहासांतील वरील सगळ्या अवस्थांमधून धर्मसंस्था गेल्या आहेत.

समाज विकासाच्या ज्या अवस्थेंत असतो, त्याच अवस्थेंत धर्मही असतो. मानवसंस्कृतीच्या सर्वच अंगांची ही गोष्ट आहे. संगीतांतील सूर, ताल, आलाप यांच्यांत किंवा विविध वाद्यांत ज्या प्रमाणें संवादित्व असतें, मेळ असतो, सुसंगति असते, त्याचप्रमाणें

(१) The History of Europe, Preface, by Fisher.

संस्कृतीच्या सर्व अंगांत संवादित्व, मेळ, व सुसंगति असते. एकाद्या समाजाची इतर संस्कृति मागासलेली आहे, व धर्मच तेवढा परिणतीच्या शिखरास पोंचला आहे, असें कधीं असत नाहीं. ‘ जसे लोक तसे त्यांचे देव ’ ही लोकोक्ति इतिहासाचे एक उत्तम रहस्य आहे. उत्पादनपद्धति, कला, विद्या, जगत्-विषयक ज्ञान, समाजांतील वर्गसंबंध यांचा ज्या मानाने विकास होतो, त्यामानाने कायदा, नीति व धर्म यांची योग्यता वाढत जाते.

समाजपरिवर्तन व धर्मपरिवर्तन

त्या त्या काळची उत्पादनपद्धति व त्यावर उभी असलेली समाजरचना जितकी मागासलेली किंवा सुधारलेली असतें आणि त्यावेळचें जीवनविषयक किंवा विश्वविषयक ज्ञान जितकें कोतें किंवा मोठें असतें, त्या मानानें त्या त्या काळची धर्मसंस्था मागासलेली किंवा सुधारलेली असते, व धार्मिक विचारसरणी कोती किंवा मोठी असते, यांस मानवजातिशास्त्रांत भरपूर पुरावा उपलब्ध होतो. धर्मांतील मानवबलीची प्रथा व दास्यसंस्था हींच दोन उदाहरणें पहा. भूमीचा व नद्यांचा नीट उपयोग करण्याची लायकी ज्या मानव गटांत नसते, कृषिकर्मांत कुशलता ज्यांना प्राप्त झालेली नसते, त्या मानव गटांना दुसऱ्या मानवगटांची उपयुक्तता कळत नसते. अशा सामाजिक परिस्थितींत नरमेधानें किंवा नरबलीनें देवता संतुष्ट होते, त्या स्थितींतल्या एका टोळक्यानें दुसऱ्या टोळक्यांतील पकडलेल्या युद्धबंदींचा सरसकट संहार करणें हा त्यावेळचा युद्धधर्म असतो; जितांच्या स्त्रियांचाच तेवढा बचाव होतो. जेव्हां एका मानवगटास,

दुसऱ्या मानवगटाकडून उत्पादक अथवा इतर तऱ्हेचे श्रम करवून घेतां येतील, असा भरवसा उत्पन्न होतो; मनुष्याच्या कर्तृत्वशक्तीचा बोध होतो; तेव्हां विजयी मानवगट जित मानवगटांचा सर्वसंहार करण्याऐवजीं त्यांस दास बनवितात, किंवा शूद्र बनवितात; दया-धर्म त्यावेळीं अस्तित्वांत येतो.

पारलौकिक किंवा आध्यात्मिक अवास्तव कल्पना हाच धर्मांचा असाधारण विशेष असल्यामुळें कोणत्याही धर्मसंस्थेचा आधार कमिजास्त प्रमाणांत मागासलेली उत्पादन पद्धति, हीन समाजरचना व सृष्टिशास्त्राचा कोतेपणा व अपुरेपणा हाच असतो; हें जगांतील आज अस्तित्वांत असलेले कोणतेही धर्म तपासले, तर सहज दिसून येईल. या कल्पना प्राथमिक स्थितीतील समाजांत स्थूल असतात म्हणून त्यांचें आभासमयत्व किंवा भ्रांतिमयत्व स्पष्टपणें प्रत्ययास येतें. सुधारलेल्या समाजांत त्या कल्पना गूढ व सूक्ष्मरूप धारण करतात, त्यांचें भ्रांतित्व सूक्ष्म चर्चेनें आवृत केलेलें असतें. एवढें मात्र खरें कीं, सगळेच धर्म अज्ञानाच्या व मागासलेपणाच्या सारख्या पातळींत नसतात, व नाहींत. कारण सगळे मानवसमाज सुधारणेच्या एकाच पातळींत नाहींत. सुधारणेची पातळी जितकी उंच, तितकी धर्मसंस्थाही उंच असते.

निसर्गशक्तींनाच सचेतन समजून त्यांची आराधना करणारे धर्म मागासलेल्या मानवसमाजांतच दिसतात; व जगांत न्यायाचें साम्राज्य आहे, जग हें अबाधित कर्मविपाक सिद्धान्ताने किंवा नैतिक नियमांनी बद्ध आहे, किंवा ईश्वर न्यायतत्त्वाची मंगलमूर्ति

आहे, या तत्त्वावर आधारलेले धर्म सुधारलेल्या मानवसमाजांतच प्रतिष्ठा पावलेले दिसतात. एकाकाळीं जे मानवसमाज नैसर्गिक भौतिक शक्तीवर देवतारूपाचा आरोप करून भक्ति करीत, तेच कालांतरानें विकासाच्या उन्नत सोपानावर गेल्यावर अर्धवट तात्त्विक व नैतिक स्वरूपाच्या आध्यात्मिक देवतांची उपासना करूं लागले. अशा तऱ्हेचें स्थित्यंतर कांहीं समाजांत फार सावकाश झालें, व कांहीं समाजांत त्वरेनें घडून आलें. पण या स्थित्यंतरांत उच्च व उच्चतर असें तारतम्य ठरवितां येतें. वैदिक वाङ्मयांतील व ग्रीक कथांतील देवता भौतिकशक्तीवर आरोपित केलेल्या चेतन व्यक्ति होत. अनेक देववादातूनच एक देववाद किंवा ब्रम्हवाद हिंदूंच्या, पाश्चात्यांच्या व मुसलमानांच्या धर्मांत प्राचीन काळीं उत्पन्न झाला. ह्या स्थित्यंतराच्या मुळाशीं सामाजिक स्थित्यंतर होतें, ही गोष्ट इतिहासावरून सहज समजते. या दृष्टीनें ख्रिश्चन व मुसलमान धर्मांच्या इतिहासाची पाश्चात्य इतिहासकारांनीं चांगली मीमांसा केली आहे. युरोपांत औद्योगिक क्रांति झाल्यावर भांडवलशाही समाजस्थिति उत्पन्न झाली; त्याबरोबर ख्रिश्चन धर्मांतही परिवर्तन झालें. या परिवर्तनाची मीमांसा मॅक्स वेबर व टॉनी यांनी उत्तम केली आहे.

गणधर्म, राष्ट्रधर्म व विश्वधर्म या क्रमानें जगांतील धर्मसंस्थांची परिणति झाली आहे. जेव्हा मानववंश फिरत्या किंवा अंशत: स्थिर अशा टोळक्याच्या स्थितींत असतात, गणरूप असतात, तेव्हांच्या धर्मास गणधर्म ( Tribal Religion ) म्हणतात. प्रत्येक टोळक्याचा धर्म निराळा असतो. त्या सर्वांची मिळून, तीं अनेक टोळकीं स्थलबद्ध होऊन,

जेव्हां राष्ट्रें बनतात, तेव्हां राष्ट्रधर्म (National religion) उत्पन्न होतो. यहुदी धर्म व प्राचीनकालीन आर्यावर्तांतील वैदिक-धर्म ही याची उत्तम उदाहरणें होत. बुद्धधर्माच्या उदयापासून विश्वधर्म अस्तित्वांत आले. आशिया, युरोप व आफ्रिका यांतील समाजांचें खुष्कीच्या व दर्याच्या मार्गानें दळणवळण वाढलें, व्यवहार वाढला, व त्यामुळें मानव्याच्या एकतेचा पहिल्यांदा अनुभव आला, तेव्हां मानव्य-मूलक विश्वधर्म उत्पन्न झाले. बुद्धधर्म हा पहिला विश्वधर्म. विश्वधर्म म्हणजे सगळ्या मानवांना, कुल-गोत्र-जाति-देश इत्यादि मर्यादांचा त्याग करून, निःश्रेयसाचा मार्ग सांगणारा धर्म. हिंदुधर्म (शैव, वैष्णव वगैरे भक्तिधर्म), खिश्चन-धर्म व इस्लामधर्म हे विश्वधर्मांचेच (Universal religion) प्रकार होत, ते सगळ्यांना परमार्थाचा मार्ग दाखवू इच्छितात. एवंच गणधर्म, राष्ट्रधर्म व विश्वधर्म ही धर्मसंस्थेच्या सामाजिक अधिष्ठानांतील परिवर्तनाची सूचक अशी सोपानपरंपरा होय.

धर्मविकासाची ज्ञापकें

आधुनिक धर्मसमीक्षकांच्या विचाराप्रमाणें धर्माचा विकास ठरविण्याची दोन प्रमाणें आहेत. एक प्रमाण असें कीं, इतिहासाच्या विवक्षित कालखंडांत मनुष्यास जगाबद्दल व जीवनाबद्दल जें विज्ञान (Scientific knowledge) व जी विज्ञानाश्रित संस्कृति प्राप्त झालेली असते, त्यांच्याशीं विसंगत नसलेले असेच त्या कालखंडांतील धर्मविचार असले पाहिजेत. दुसरें प्रमाण असें; त्या त्या विशिष्ट कालखंडांत मनुष्यसमाजाची जी सांस्कृतिक प्रगति होत असते, त्या संस्कृतीच्या प्रगतीस व

उच्च सामाजिक जीवनास पोषक व प्रेरक शक्ति उत्पन्न करणारा असा तो तो धर्म असला पाहिजे.

विज्ञानाचा धर्माशीं संबंध कसा पोचतो, याचें थोडक्यांत येथें दिग्दर्शन केलें पाहिजे. प्रत्येक समाजाचें अस्तित्व विज्ञानावर अवलंबून असतें. वस्तूंचा वास्तविक कार्यकारणभाव कळल्याशिवाय वस्तूंचा चांगला उपयोग, होतच नाहीं. वास्तविक कार्यकारणभावांचे व्यवस्थित मांडलेलें ज्ञान म्हणजेच विज्ञान होय. हें विज्ञान जितकें उत्कृष्ट किंवा निकृष्ट असतें, त्या मानानें संस्कृति उत्कृष्ट किंवा निकृष्ट असते. कारण संस्कृति म्हणजे अंतर्बाह्य शक्तींचा उपयोग करण्याची कला. त्या त्या समाजाच्या धर्मकल्पना जितक्या विज्ञानाशीं अविरोधी असतात व विज्ञानाश्रित संस्कृतीस पूरक असतात, तितक्या त्या समाजाच्या प्रगतीस उपकारक होतात. त्यांच्या सामाजिक उपयुक्ततेवरूनच त्यांचा श्रेष्ठकनिष्ठपणा ठरतो. अनेकदेववाद, ब्रम्हवाद इत्यादि धर्मकल्पनांचा अर्थ याच· दृष्टीनें तपासता येतो.

सृष्टींतील विशिष्ट घटनेचा कार्यकारणभाव उलगडण्याकरितां कल्पिलेली चेतनशक्ति म्हणजे देवता, वादळ, झंझावात, झुळझुळ वाहणारा वायु, उष्णवारे, थंडीचा कडाका, नौकानयनास अनुकूल किंवा प्रतिकूल वायुप्रवाह इत्यादि घटना कोणीतरी चेतन व्यक्ति घडवून आणते, अशा कल्पनेनें वायुदेवता मानवानें कल्पिली. सृष्टींतील वास्तविकरीत्या न उलगडलेल्या घटनांच्या काल्पनिक किंवा भ्रांतिमय उपपत्तीनेच देवता सिद्ध होते. जितक्या देवता तितक्या

भ्रांति होत. एकदेववादांत तेहतीसकोटी भ्रांतीतील बहुतेक सगळ्या भ्रांतींचा निरास झालेला असतो. एकदेववादी समाजांचें विज्ञान व संस्कृति उन्नत असते. एकदेववाद व ब्रम्हपरिणामवाद यांत असाच फरक आहे. ब्रम्हपरिणामवादाप्रमाणे विश्वाच्या कार्यकारण-भावांत कोणी सचेतन व्यक्ति हात घालीत नाहीं. देव जरी असला तरी तो विश्वावेगळा, विश्वप्रकृतीहून निराळा, नसतो. म्हणून एकेश्वरवादापेक्षां ब्रम्हपरिणामवाद हा विज्ञानाच्या अधिक सन्निध असतो. ख्रिश्चन व मुसलमानधर्म एकेश्वरवादी आहेत व उपनिषदें ब्रम्हपरिणामवादी आहेत. सत्परिणतिवादी औपनिषद् धर्म, ख्रिश्चन व मुसलमान धर्मांपेक्षां अधिक विकसित आहे. कारण तो विज्ञान-दृष्टीस अधिक अनुकूल आहे. भौतिकवादी विचारसरणीपासून जो धर्म दूर, तो धर्म प्रगतीपासून जास्त दूर असतो.

या दृष्टीनें, हेगेलचें हिंदुधर्माबद्दलचें मत कसें चुकीचें होतें, तें बरोबर दाखविता येतें. हेगेल आपल्या धर्मदर्शनांत असें [1]म्हणतो " हिंदुधर्म हा ख्रिश्चन धर्मापेक्षां कनिष्ठप्रतीचा आहे, कारण ख्रिश्चन धर्मांतील ईशतत्त्व मुख्यतः चिन्मय-आत्मरूप-विचारशील ( Spirit ) आहे. व हिंदुधर्मांतील ब्रम्ह हें द्रव्यरूप (Substance) आहे. उपनिषदांत " सृष्टि ज्यांतून उत्पन्न होते, ज्यांत राहाते व ज्यांत विलीन होते, तें ब्रम्ह होय " असें म्हटलें आहे. ह्याचा अर्थ, ब्रम्ह द्रव्य होय असा होतो. ब्रम्हास आत्मत्व कल्पिणारा ख्रिश्चन धर्म श्रेष्ठ होय. ' देवानें जग केलें ' असें ख्रिश्चन धर्म

(१) The Philosophy of Hegel pp. 495-514 by Stace.

म्हणतो. ‘देवांतून जग उद्भवलें’ असें म्हणत नाही.” हेगेलचें हें म्हणणें बरोबर नाही. कारण ‘देवानें जग रचलें’ असें म्हणणारा रचनावादी धर्म विज्ञानापासून दूर असतो.

कोणताही विचार किंवा आचार जितका विज्ञानावर प्रतिष्ठित असतो तितका तो उन्नत असतो. रोगांच्या निदानांत व चिकित्सेंत मंत्र, तंत्र, जादु इत्यादि दैवी क्रियांचा व अदृष्ट अलौकिक, दैवी किंवा राक्षसी शक्तींच्या कल्पनांचा उपयोग जी वैद्यकविद्या मोठ्या प्रमाणांत करते, ती अडाणी व रानटी असते. ज्या वैद्यकविद्येंत द्रव्यगुणांचा किंवा भौतिकवस्तूंचा कार्यकारणभाव लक्षांत घेऊन अथवा शरीर व भोवतालचें भौतिकविश्व यांच्या क्रियाप्रतिक्रियांचे नियम लक्षांत घेऊन निदान व चिकित्सा केलेली असते, ती सुधारलेली व उन्नत असते. सूर्यचन्द्राचे उदयास्त, ऋतुचक्र, भूकंप, पर्जन्य, नद्यांचे महापूर, सूर्यचन्द्रग्रहणें, चन्द्राची क्षयवृद्धि इत्यादि सृष्टींतील घडामोडींचा दैवी कार्यकारणभाव धर्मविद्या सांगते. म्हणून भौतिक कार्यकारणभाव सांगणारी विज्ञानें धर्मविद्येपेक्षां श्रेष्ठ असतात. अदृष्ट-कर्मविपाकावर आधारलेल्या मन्वादि स्मृतींतील कायद्यांपेक्षां कौटिल्यादिकांच्या अर्थशास्त्रांतील दृष्टमूलक कार्यकारणभावावर आधारलेला कायदा उच्च होय. मनुष्याचें सृष्टीबद्दलचें ज्ञान जितकें वाढतें, त्या मानानें सृष्टीवर त्याची सत्ता वाढतें. जेव्हां सृष्टीवरील सत्ता वाढण्यास अनुकूल अशी समाजरचना होते, तेव्हां समाजांतील पारलौकिक, अदृष्टवादी, देववादी व दैववादी विचारसरणी क्षीण होत जाते व मर्यादित होत जाते. परलोक, अदृष्ट व अलौकिक

दिव्यशक्ति यांची कल्पना हाच धर्माचा महत्वाचा आधार. हा आधार जितका मोठा तितके अज्ञानही मोठे असतें. ज्या मानानें संस्कृतीतील आचार-विचार वरील कल्पनेवर उभारलेले असतात, त्या मानानें ती संस्कृति मागासलेली असते.

संस्कृति व धर्म यांचा परस्परसंबंध कळण्याकरितां संस्कृति म्हणजे काय याचें थोडक्यांत विवरण करतो. संस्कृति म्हणजे आध्यात्मिक व आधिभौतिक शक्तींना सामाजिक जीवनास उपयुक्त बनविण्याची कला. आध्यात्मिकशक्ति म्हणजे स्वतः मनुष्य, व आधिभौतिक शक्ति म्हणजे त्याच्या भोवतालचें विश्व. मनुष्य आपली इंद्रियें कार्यक्षम करतो, विकारांना वळण लावतो, व विचारांची म्हणजे ज्ञानाची वाढ करतो, बुद्धि भावना वासना व आकांक्षा यांना व्यवस्थित प्रगल्भ व सूक्ष्म बनवितो, त्यांस आध्यात्मिक संस्कृति म्हणतां येईल. नीति सौंदर्य सत्य न्याय ध्येय श्रेयस् इत्यादि संज्ञांनीं ज्यांचा बोध होतो, त्यांचा या आध्यात्मिक संस्कृतीशी संबंध आहे. कायदा, धर्म, वाङ्मय, शास्त्रें, विज्ञान, समाजव्यवस्था, राज्यपद्धति यांचा आध्यात्मिक संस्कृतींत अंतर्भाव होतो. भौतिकसंस्कृति म्हणजे मानवाभोवती पसरलेल्या विश्वाचें समाजजीवनांस अनुकूल असें रूपांतर होय. भूमि, जल, अग्नि, वायु, आकाश, धातु, वृक्ष, वनस्पति, पशु, इत्यादिरूपानें भोवताली पसरलेल्या अनंत सृष्टीस उपयुक्त बनविणें, शिकार नौकानयन कृषि पशुपालन, धातूंची हत्यारें बनविणें, वाफेची व विजेची यंत्रें बनविणें, इत्यादि क्रियांचा भौतिक संस्कृतीत अंतर्भाव होतो. भौतिक-

संस्कृतीचें स्वरूप-आधिभौतिक व आध्यात्मिक

संस्कृति व आध्यात्मिक संस्कृति यांच्यांत पृथक्त्व दाखविणारी रेघ सांपडणें कठीण आहे. याचें कारण त्यांच्यांत परस्परावलंबित्व आहे, व त्या एकमेकांत मिसळलेल्या आहेत. आधिभौतिक संस्कृति हें आध्यात्मिक संस्कृतीचें अधिष्ठान आहे. भोवतालच्या जगाचा उपयोग करताकरताच मनुष्यांच्या आंतरिक शक्तींचा विकास होत असतो. मानवांतल्या अत्यंत खोल नैतिक संबंधाचेंही भौतिकच अधिष्ठान असते. पति व पत्नी, माता व पुत्र यांचे जिव्हाळ्याचें, नातें असतें, पण त्याचें प्राथमिक कारण भौतिक असतें. मनुष्यामनुष्यातले सगळे संबंध साक्षात् किंवा परंपरेनें समाजाच्या भौतिक गरजांच्या व्यवस्थेवरच अधिष्ठित असतात. गीतेतील असुरी संपत्ति व दैवी संपत्ति, मनूचे वर्णाश्रमधर्म किंवा आस्तेयादी धर्म यांचा समाजाच्या भौतिक जीवनांच्या व्यवस्थेशीं संबंध पोचतोच. त्या त्या मानवसमाजाची भौतिक संस्कृति जितकी सुधारलेली असते तितकी त्याची आध्यात्मिक संस्कृति सुधारलेली असते. एकाद्या समाजाचे अध्यात्म श्रेष्ठ असतें व भौतिकजीवन मात्र कनिष्ठ प्रतीचें असतें, असा इतिहासांत दाखला नाहीं व असणें शक्य नाहीं.

अमेरिकन मानवशास्त्रज्ञ बोॲास यानें संस्कृतीची त्रिपुटी सांगितली आहे.[1] (१) मनुष्य व निसर्ग यांचे संबंध व निसर्गविजय (२) मानवामानवांतले संबंध किंवा सामाजिक संबंध (३) मनुष्याच्या अंतःकरणांतील क्रियाप्रतिक्रिया.

अमेरिकन मानवशास्त्रज्ञांची संस्कृतीची व्याख्या

---

(१) General Anthropology pp. 4-5 Edited by Franz Boas.

(१) मनुष्य व निसर्ग यांच्या संबंधामुळें अथवा निसर्गावरील विजयामुळें जी संस्कृति निर्माण होते, तिचें अगणित प्रकार आहेत. अन्नोत्पादन व अन्नरक्षण, गृह, पशु, वनस्पति, ऋतुचक्र, वायु, हवामान, पाऊस इत्यादि प्रकारच्या सृष्टीपासून संरक्षण करण्याच्या व तिच्यावर ताबा ठेवण्याच्या पद्धति (२) मानवामानवांतले संबंध; कुटुंब, गण, वर्ग, जाति, उच्चनीच श्रेणी इत्यादि विविध सामाजिकगटांचे अंतर्गत व बाह्य संबंध; स्त्रीपुरुष, तरुण व वृद्ध यांचे संबंध; समाजांतील राजकीय व धार्मिक संघटना; युद्ध व शांतता यांतील समाजसंबंध. (३) मनुष्याच्या अंत:करणांतील क्रियाप्रतिक्रिया:— यांत पहिल्या दोन प्रकारांच्या संबंधामुळें अंत:करणावर होणाऱ्या प्रतिक्रिया येतात. ज्ञान, विचार, भावना, अपेक्षा आकांक्षा आणि प्रत्यक्ष प्रयत्न ह्याच त्या प्रतिक्रिया होत. बौद्धिक व भावनात्मक मनोव्यापार यांचा यांत अंतर्भाव होतो; शास्त्र, नीति, कला, सौंदर्य व धर्म यांचा यांत समावेश होतो; मन:कल्पित मूल्यांचा यांत अन्तर्भाव होतो.

संस्कृतीच्या दुसऱ्या व तिसऱ्या संपुटांत धर्माची गणना बोआसनें केली आहे. संस्कृतीला गति व इतिहास आहे; म्हणून धर्मालाही गति व इतिहास आहे; म्हणून धर्मेतिहासांचे सिद्धान्त अवगत करून घेण्याकरितां समाजांच्या व सामाजिक संस्थांच्या परिवर्तनांचे सिद्धान्त अवगत करून घेणें आवश्यक असते. त्या करितां संस्कृतीच्या सर्वांगांचा पृथक् पृथक्पणें व संकलितपणें अशा दोन्ही रीतीनें अभ्यास करणे आवश्यक असते.

संस्कृतीची वाढ

संस्कृति कशी वाढते हा समाजशास्त्रांतील एक वादाचा विषय आहे. त्यांत दोन तऱ्हेचे संप्रदाय आहेत.[१] पहिल्याचे पुरस्कर्ते टायलर, सर जेम्स फ्रेझर व इतर बहुतेक नाणावलेले इतिहासज्ञ आहेत. हा संप्रदाय असें म्हणतो कीं, प्रत्येक समाजाची संस्कृति सामाजिक गरजांतून उत्पन्न झाली आहे. या गरजांचे दोन प्रकार. प्राथमिक व दुय्यम. आत्मरक्षण, प्रजोत्पादन, व प्रजासंवर्धन ही प्राथमिक गरज. या दोन्ही गरजांचा स्वभाव असा आहे कीं, त्या सारख्या वाढतच असतात. त्या वाढत असतात म्हणून समाज व संस्कृति वाढत असते. त्या कांहीं कारणास्तव खुंटल्या म्हणजे समाज व संस्कृति खुंटते. दुसरा संप्रदाय इलियट स्मिथ प्रभृति ब्रिटिश संशोधक व कांहीं जर्मन-ऑस्ट्रियन पंडित यांचा आहे. हा संप्रदाय असें म्हणतो की, विशिष्ट राष्ट्रेंच उच्च दर्जाची विशिष्ट संस्कृति उत्पन्न करण्यास समर्थ असतात. इतर राष्ट्रें किंवा समाज, संस्कृति उत्पन्न करणाऱ्या राष्ट्राची संस्कृति स्वीकारून सुसंस्कृत होतात. संस्कृति प्रसरण व विनिमय यामुळें वाढते. स्मिथच्या मतें मूळ संस्कृति इजिप्तमध्यें प्रगल्भ-दशेला आली. कृषि, व्यापार, स्थापत्य, राज्य, धर्मसंस्था, पुरोहित-वर्ग, लेखन, नौकानयन, युद्धकला इत्यादि स्वरूपाची संस्कृति प्रथमतः इजिप्तमध्यें वाढली. ह्या संस्कृतीनें सगळ्या जगाचें आक्र-मण केलें म्हणूनच जग पहिल्यांदा सुसंस्कृत झालें. जर्मनसंशोध-

---

(१) Encyclopaedia of Social sciences, on 'culture'

काचें म्हणणें असें कीं, मुळांत जगांत आठ प्रकारच्या संस्कृति उदयास आल्या. आज सगळी मानवजात कमिजास्त प्रमाणांत त्याच संस्कृतींच्या विनिमयानें, संमिश्रणानें, आक्रमणानें व झगड्यानें उजळली आहे.

या दोन्ही सांप्रदायांत ऐतिहासिक तथ्य आहे. दुसरा संप्रदाय संकुचित दृष्टीचा आहे. कांहीं थोड्याच मानवगटांना थोर संस्कृति उत्पन्न करण्याचे श्रेय हा संप्रदाय देतो. थोडेच मानवगट उच्च संस्कृति निर्मू शकतात, असें यांचें आग्रहाचें सांगणें आहे. पहिला संप्रदाय अधिक शास्त्रशुद्ध आहे. सगळे मानवगट योग्य परिस्थितींत थोर संस्कृति उत्पन्न करूं शकतात व अडचणींमुळें मागें पडतात. संस्कृतीच्या प्रगतीचें मर्यादित व संकुचित लक्षण घेऊनच दुसरा संप्रदाय संस्कृति-मीमांसा करतो. पहिला संस्कृतीच्या अनंत वाढीची शक्यता इतिहासाच्या खोल अवलोकनानें सिद्ध करतो, व मागासलेल्या व पुढारलेल्या मानवजातीला भव्य भवितव्य दाखवितो. प्रगतीची अखण्ड प्रेरणा त्यांतूनच मिळते. दुसरा संप्रदाय कृतार्थ झालेल्या धन व सत्ता संपादन केलेल्या वरिष्ठवर्गाची अप्रत्यक्षपणें तरफदारी करतो. दुसऱ्यांतील एवढाच मुद्दा ग्राह्य आहे कीं, संस्कृतीची वाढ विनिमयानें, संमिश्रणानें व संघर्षानें झाली आहे. पण संस्कृतिवृद्धीचें तेवढेंच एक कारण नाहीं. संस्कृतीची मूलप्रेरक सामाजिक गरजच होय. सामाजिक गरजामुळेंच समाज स्थलांतर करतात, किंवा एकमेकांवर आक्रमणें करतात, व एकमेकांच्या संस्कृति मिसळून टाकतात, किंवा स्वतःच एकमेकांत मिसळतात.

स्पेंग्लरची संस्कृति-मीमांसा. भिन्न भिन्न संस्कृतींत मूलभूत फरक मानणारा दैववादी व आत्मवादी संप्रदाय

जर्मन पंडित ओस्वाल्ड स्पेंग्लर यानें 'पश्चिमेची उतरती कळा' ( The decline of the West ) या बड्या ग्रंथांत प्राचीन अर्वाचीन सगळ्या संस्कृतींचा परामर्श घेतला आहे. त्यानें सांगितलेली उपपत्ति अशी:— संस्कृतीची दोन युगें. प्राथमिक व उच्च. कोणतीही संस्कृति त्या त्या मानवसंघाच्या अंतर्यामीं वसत असलेल्या आत्म्याच्या जागृतीतून निर्माण होते[१]. तत्पूर्वी हा आत्मा प्राथमिक संस्कृतीच्या ( Primitive culture ) बालिश अवस्थेत चिरकाल झोपलेल्या त्या त्या मानवगणांच्या ठायीं स्वस्वरूपीं लीन झालेला असतो. हा आत्मा त्या अव्यक्त, निराकार, दिक्कालातीत अमरस्थितींतून बाहेर येऊन व्यक्त, साकार, दिक्कालबद्ध, सान्त व मर्त्य बनतो. एका विशिष्ट भूप्रदेशांतच त्याची मुळें एकाद्या विशालवृक्षाप्रमाणें रोवलेलीं असतात. हा व्यक्तस्थितींत आल्यावर त्याची संपूर्ण वाढ होते. त्याच्या सगळ्या शक्ति विकसित होऊन खलास झाल्या म्हणजे हा मरतो. त्याच्या शक्तींचा विकास म्हणजेच समाजांतील अनेक जमाति, भाषा, सांप्रदायिक श्रद्धा, कला, राज्यें व विज्ञानें होत. हा आत्मा म्हणजे संस्कृति-पुरुष होय. हा मरतो म्हणजे त्याच्या मूलस्वरूपांत विलीन होतो. या संस्कृति-पुरुषाचा पूर्ण आविष्कार म्हणजे संस्कृति. प्रत्येक संस्कृतीचा आत्मा पृथक् असतो. हिंदी, चिनी, मिसरी, सुमेरी, ग्रीक, ज्यू,

(१) The Decline of the West p. 106 by Oswald Spengler.

अरबी, पाश्चात्य इत्यादि प्राचीन व अर्वाचीन अशा प्रत्येक संस्कृतीचा आत्मा निराळा. ह्या आत्म्यांची प्रत्यगावस्था म्हणजे रानटी स्थितींतील गणसंस्कृति( Tribal Primitive Culture ). ह्या आत्म्यांचा उन्मेष म्हणजे जगांतील भिन्न भिन्न उच्च संस्कृति. ह्या आत्म्यांना प्रकट होण्याची स्फूर्ति केव्हां व कशानें होते, हें अत्यंत अगम्य आहे. ज्याप्रमाणें बीजास अंकुर फुटावा, व धुमारा निघावा, त्याप्रमाणें ह्यांचा आविर्भाव होतो. वसंत, ग्रीष्म, शरद् व शिशिर किंवा कुमार, तरुण, प्रौढ व वृद्ध अशा चार अवस्थांतून ते आत्मे जातात[१]. आत्म्याची प्राथमिक स्फूर्ति म्हणजे वसंत; यांत नैसर्गिक प्रवृत्तींना भरगच्च मोहोर येतो, लढाऊ रक्तपिपासा वाढते. काव्यमयप्रतिभा जागृत होते. विश्वव्यापी भावना उल्हासतात. ईश्वरीसाक्षात्कार होतो. महाकाव्यें याचवेळीं होतात. जाणिवेची प्रगल्भता म्हणजे ग्रीष्म; यावेळीं नागरिकता येऊं लागते, ग्रामजीवन नागरिकतेचें आश्रित बनते; मूर्ति, स्थापत्य, चित्र, संघटित-धर्म, पावित्र्यभावना गणित, ज्योतिष, वादकुशलता, वक्तृत्व, यांना महत्त्व येते. ज्यांत सगळ्या बौद्धिकक्रिया परिपक्व होतात व फलित होतात, तो शरद्; शरद् म्हणजे फलसंग्रहकाल; हें बुद्धिवादी व तत्त्वज्ञानप्रधान युग होय. यांत विज्ञानें निर्माण होतात; दर्शनांची संपूर्ण मांडणी होते; सगळ्या जुन्या परंपरेचें संशोधन होतें; धनास व विज्ञानास प्रतिष्ठा लाभते. शिशिर म्हणजे जडता; सगळेंच जीवन थिजू लागते; अहंकाराचा लोप होऊ लागतो; बेबंदशाही माजते. विश्वबंधुत्वाची वृत्ति बळावते; नीतिप्रधान धर्म बनतो. दृष्टि जडवादी

(१) Ebid pp. 21, 22, 31, 78, table 1.

होते; श्रद्धा गौण ठरते; बुद्धि श्रेष्ठ ठरते; औदासीन्य, निवृत्ति व उपेक्षा यांनीं विचार भारावून जातात. यंत्र व धन यांचें प्रस्थ माजतें; घटपटाची खटपट वाढते.

या चार अवस्थेंतून प्रत्येक मोठी संस्कृति गेली आहे. या चार अवस्थेंतून गेल्यावर त्या संस्कृतीला कांहीं थोर भवितव्यच नसते. त्यानंतर त्या संस्कृतीच्या लोकांनीं सगळ्या जगभर पसरावें किंवा जागच्याजागीं मूढ स्थितींत गाडून घ्यावें. स्पेंग्लरच्या मतें जर्मन लोक वगळल्यास बाकीच्या हिंदु, मुसलमान, चिनी, युरोपियन, अमेरिकन, मेक्सिकन वगैरे लोकांना यापुढें कांहींच भवितव्य नाहीं. हिंदु, मुसलमान व चिनी लोकांना तर यापुढें कोणत्याही अन्य राष्ट्राच्या गुलामगिरींतच राहणें भाग आहे. दुर्दैवानें त्यांना पुरेपूर गिळून टाकलें आहे.

मानवसंस्कृतीचा प्रत्येक आत्मा संस्कृति व भौतिक सुधारणा अशीं दोन रूपें धारण करतो. त्यांत क्रम आहे. प्रथम संस्कृति ( culture ) व नंतर सुधारणा ( civilization ). संस्कृतींत काव्यें, धर्म, कायदा, राज्य, प्रभुत्व, श्रेष्ठकनिष्ठभाव, आज्ञाधारकता, यज्ञ, मंत्र, प्रार्थना, नाट्य, संगीत इत्यादि रूपानें जीवनस्फूर्ति उजळत असते. सुधारणेच्या युगांत स्फूर्ति मंदावते. विज्ञान व यंत्र, अर्थ व स्वास्थ्य यांच्याकडे कल होतो. रुक्ष बुद्धिवाद, व्यक्तिस्वातंत्र्य, समता, उदारमतवाद, लोकसत्ता इत्यादि ढिल्या विचारांना ऊत येतो. भावना व श्रद्धा, निष्ठा व आज्ञाधारकता, संघटितपणा व

कायदा, यांचा लोप होऊं लागतो. पर्यंकपंडित मिरवूं लागतात. जीवन थिजतें, रक्त गारठतें, सर्वांग बधिर होतें, शववत् होतें.

ही स्पेंग्लरची संस्कृति मीमांसा गूढवादावर उभारलेली आहे. वेदांतील[1] पुरुषसूक्तांत सांगितलेल्या विराट पुरुषाच्या कल्पनेचाच जास्त चांगल्या रीतीनें व व्यापक प्रमाणांत स्पेंग्लरनें परिष्कार केला आहे. त्यानें कल्पिलेला संस्कृतिपुरुष किंवा समाजआत्मा हें एक काव्यमय-कल्पनानिर्मित-गूढ-तत्त्व आहे. शास्त्रीयचिकित्सेच्या कसोटीस तें उतरणार नाहीं. युरोपांतील सरंजामी समाजरचना नष्ट होऊन तिच्या ठिकाणीं भांडवलदारी समाजरचना उत्पन्न झाली; याची मार्क्सनें जी ऐतिहासिक भौतिकवादानें उपपत्ति लावली आहे, त्या उपपत्तीची सर्वांगीण तर्कशुद्धता आणि प्रमाणपूर्णता पाहिली म्हणजे, त्याच्याशीं तुलनाकरतां, स्पेंग्लरची मीमांसा गूढ, अस्पष्ट व अव्यक्त कल्पनांचा विलासच होय, असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. तो स्वतःच म्हणतो कीं, विज्ञान व बुद्धिवाद अवनतीचें लक्षण आहे. म्हणूनच ही मीमांसा शास्त्र-पद्धतीस पोहोंचूं शकत नाहीं. जर्मन नाझीपक्षाचा स्पेंग्लर हा प्रमुख तत्त्व-वेत्ता मानला जातो, म्हणून त्याचें तत्त्वज्ञान अल्पशब्दांत येथें मांडलें.

समाजाच्या परिवर्तनाचें शास्त्र Social Dynamics

मानवजातिशास्त्रज्ञांनीं मानवसमाजाच्या संस्कृतीच्या अभ्यासार्थ तीन मुद्यांचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला आहे. ( १ ) मानवेतिहासाची रचना. ( २ ) ऐतिहासिक घटनांची विशिष्ट रूपें, ( Types ) व त्या वैशिष्ट्यांचा क्रम. ( ३ ) ऐतिहासिक घटनांतील

( १ ) ऋग्वेद १०।९०, वाजसनेयी संहिता अ. ३०.

परिवर्तनाचें गतीचें शास्त्र, ( Dynamics ). आज उपलब्ध असलेल्या मानवेतिहासाचें, ऐतिहासिक विशिष्ट घटनांचे, त्या घटनांच्या क्रमाचे आणि ऐतिहासिक परिवर्तनाच्या गतीच्या शास्त्राचें निरूपण करण्याचा पाश्चात्य समाजशास्त्रज्ञांनीं व इतिहासवेत्त्यांनीं प्रयत्न केला आहे. त्यांत प्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ मार्क्स यानें इतिहासाच्या गतिशास्त्राचा सिद्धान्त फार सम्यक् रीतीनें उपपादिला आहे. त्यानें आपला सिद्धान्त अर्थशास्त्राच्या समीक्षेच्या प्रस्तावनेंत ( Introduction to Critique of political economy ) व ' कम्युनिस्टांच्या जाहीरनाम्यां'त ( Communist Manifesto ) मांडिला आहे. त्यानें समाजरचनेच्या दोन बाजू मांडिल्या आहेत. एक, समाजाचा भौतिक सांगाडा, ( Foundation ) अधिष्ठान किंवा अधिकरण. दुसरी, समाजाचा आध्यात्मिक प्रासाद ( Super structure ). उत्पादनाची पद्धति व त्या पद्धतीमुळें उत्पन्न होणारे मानवामानवांचे संबंध हा समाजाचा भौतिक सांगाडा किंवा पाया होय. उत्पादनपद्धति म्हणजे मानवजीवनास उपयुक्त होणाऱ्या साधनांच्या निर्मितीची पद्धति. उत्पादनपद्धतीच्या वैशिष्ट्यामुळें समाजांतील मानवांचे विशिष्ट संबंध उत्पन्न होतात. उत्पादनपद्धति व मानवांचे गट ह्यांचे अस्तित्व भौतिक आहे. धान्य, फळें, वस्त्रें, उपकरणें, वनस्पति, हत्यारें, घर, वाहनें, पशु, धातु, पात्रें, यंत्रें इत्यादिकांचे उत्पादन, विनिमय, विभजन व व्यवस्था करण्याच्या पद्धतीमुळें श्रमविभाग होऊन मनुष्यांचे समाजांत गट पडतात. उत्पादनपद्धति व तज्जन्य मानवीवर्ग यांच्या अधिष्ठानावरच समाजाचा आध्यात्मिक प्रासाद उभारला जातो. हा आध्यात्मिक प्रासाद

म्हणजे भाषा, विद्या, वाङ्मय, कला, कायदा, राज्यपद्धति व धर्म यांचा समुच्चय होय. मनुष्याची आध्यात्मिक शक्ति म्हणजे अंतःकरण, हेंच या प्रासादाचे मुख्य कारण असतें. मानसिकमूल्यांचाच यांत जास्त भाग असतो. बुद्धि, भावना व आकांक्षा यांचाच यांत प्रत्यक्ष विकास झालेला दिसतो. धर्म विशिष्ट परिस्थितींतील समाजाच्या आध्यात्मिक प्रासादाचा एक भाग आहे, असें मार्क्स सांगतो. हा आध्यात्मिक प्रासाद व त्याचे भौतिक अधिष्ठान यांच्यांत विलगपणा नसतो. त्यांचा समवायसंनिकर्ष आहे. समवायसंनिकर्ष म्हणजे अनेक वस्तूंनी नियमानें संमिश्र किंवा अविलग होऊन राहणें.

समाजाचा भौतिक आश्रय किंवा अधिष्ठान बदललें कीं, त्याचा आध्यात्मिक प्रासादही बदलतो. एक बदललें कीं, दुसरेंहीं बदलतें. उत्पादनपद्धति व तज्जन्य सामाजिक वर्गपद्धति यांचा आध्यात्मिक संस्कृतीशी आश्रयाश्रयिभावसंबंध आहे. 'पूर्णतेस पोचलेला समाज व पूर्णतेस पोचलेलें राज्य' ही वस्तुस्थितीस सोडून असलेली कल्पना आहे.[१] प्रत्येक सामाजिक रचना व संस्था विकासाच्या मालेंतील एक दुवा होय. ती नष्ट होऊन त्या ठिकाणी दुसरी येते. प्रत्येक स्थिति तेवढ्या कालापुरतीच आवश्यक व न्याय्य असते. एका विशिष्ट कालमर्यादेच्या बाहेर तिचें अस्तित्व अनावश्यक व अन्याय्य असते. नव्या समाजरचनेला अवसर देऊन पूर्वीच्या समाजरचनेनें नष्ट व्हावयासच पाहिजे. ज्याप्रमाणें भांडवल-

(१) Ludwig Feuerbach p. 21 by F. Engles.

शाही समाजरचना आल्यावर सरंजामी समाजरचनेतील ध्येयें धुक्याप्रमाणें विरली व संस्था फुटलेल्या नौकेप्रमाणें तळास गेल्या, त्याप्रमाणें भांडवलशाही समाजरचना देखील सामाजिक प्रगतीस अडथळा करू लागल्यामुळें व उपयोग संपल्यामुळे नष्ट व्हावयास पाहिजे. प्रत्येक सामाजिक स्थिति सापेक्षतेनेंच आवश्यक व न्याय्य असते.

जी गोष्ट समाजरचनेस लागू, ती मानवीविचार व क्रिया यांना लागू आहे. कोणतेही विचार संपूर्ण नसतात. विचारसरणी विकासाच्या खालच्या अवस्थेंतून वरच्या अवस्थेंत जात असते. संपूर्णता तिला कधींच येत नाहीं. श्रेष्ठ व श्रेष्ठतर अशी तारतम्यांची परंपरा अनंत असते. आतां संपूर्ण सत्य सांपडलें म्हणून जर कोणी हात पसरून कृतार्थ बुद्धीनें विशिष्ट विचारसरणीला आलिंगन द्यावयास लागेल, तर त्याची फसवणूक झाल्याशिवाय राहणार नाहीं. जी गोष्ट विचारांची, तीच भावना व ध्येय यांची. तत्त्ववेत्यांनीं व धर्मस्थापकांनीं निःश्रेयस् व मोक्ष म्हणून जी ध्येयें ठरविली आहेत, ती सुद्धा इतिहासांत बदललेली दिसतात. उदाहरणार्थ चालू शतकांत हिंदुस्तानांत राष्ट्रवाद आल्यानंतर जे राष्ट्रवादी तत्त्ववेत्ते झाले त्यांनीं उपनिषदांत व गीतेत सांगितलेला वैयक्तिक मोक्ष गौण गणला, व राष्ट्रीय मोक्ष व सगळ्या मानवजातीचा मोक्ष शोधून काढला. अशा रीतीनें गीता व वेद शाश्वत सिद्धांत सांगतात, असें म्हणणाऱ्यांनीच गीतेला व वेदाला अशाश्वत केलें.

मार्क्सनें मानवेतिहासांतील समाजाचे निरनिराळें टप्पे किंवा विशिष्ट रूपें व त्यांचा विकासयुक्त क्रम सांगितला आहे. ती विशिष्ट

रूपें सांगत असतां समाजाच्या भौतिक किंवा आध्यात्मिक संस्कृतीचें एक विवक्षित एकांगी लक्षण घेऊन निरूपण केलें नाही, तर भौतिक व आध्यात्मिक संस्कृतीचें समुचित रूप लक्षांत घेऊन समाजरचनेची विशिष्ट रूपें, त्यांचा क्रम व त्या क्रमाच्या मुळाशीं असलेले गति-सिद्धान्त निरूपिले आहेत. ती रूपें व त्यांचा क्रम असा आहे, प्राथमिक गणरूप साम्यवादी जनसमुदाय ( Primitive Communist Society ), पितृसत्ताक समाज ( Patriarchal ), पुरातनसमाज ( Ancient ), सरंजामदारी समाज ( Fuedal ), भांडवलदारीसमाज ( Capitalistic ), व समाजवादी समाज ( Socialistic ). हे प्रकार अतिसामान्य असून त्यांचे अवांतर किंवा संमिश्र प्रकार त्या त्या भौतिक, ऐतिहासिक व परिस्थितीच्या वैशिष्ट्यामुळें होतात. वरील प्रकारचे अनेक समाज या भूगोलावर भूतकाळीं व वर्तमान-काळीं आढळतात. उपरिनिर्दिष्ट प्रकारांमध्यें तदनुरूपच धर्मसंस्थेचा विशिष्ट प्रकार असतो.

गणघटित रानटी व अर्धरानटी प्राचीन समाजांच्या अनेक अवशेषांचा अभ्यास मानवजातिशास्त्रज्ञांनीं चालविला आहे; वर्त-मानकालींहि अनेक रानटी व अर्धरानटी मानवगट भूपृष्ठावर सगळ्या खंडांत सांपडतात; त्यांचाही शास्त्रज्ञांनीं अभ्यास केला आहे. आफ्रिका, अमेरिका, आस्ट्रेलिया व आशिया या खंडांतील, उच्चनीच अशा सांस्कृतिक सोपानावर असलेल्या, मानवगणांच्या धर्मांचा व संस्कृ तींचा अभ्यास गेली अडीचशें वर्षें चालू आहे; त्यांवरून असें निश्चित करतां येतें कीं, समाजाच्या भौतिक-विशिष्ट-रचनेवर व योग्य-

तेवरच धार्मिक संस्कृतीची योग्यता अवलंबून असते. प्रत्येक समाजाचे धार्मिक विधिनिषेध, धार्मिक भावना, उपासना, कर्मकांड, उत्सव, यात्रा व देवता यांचे स्वरूप त्याच्या इतर जीवनाशीं विशेषतः भौतिक जीवनाशीं व रचनेशीं संवादी असते. टॉयलर, फ्रेझर, स्पेन्सर ॲडयूलँग, डुरखी, मॅरेट, मॅलिनोस्की, वेबर, टॉनी, मुलर, इत्यादिकांनीं युरोप, अमेरिका, आस्ट्रेलिया, आफ्रिका, हिंदुस्थान, इत्यादि ठिकाणच्या मानवगणांचे धर्म तपासून जें त्यांचें स्वरूप मांडलें आहे, त्यावरून वरील विधानास पुष्टी मिळतें.

**( २ ) धर्मोत्पत्तिविषयक आधुनिक उपपत्ति अथवा धर्ममूल.**

समाजांत ज्या कारणांनीं धर्म अस्तित्वांत येतो तीं कारणें व धर्मांची अगदीं प्राथमिक स्वरूपें म्हणजे धर्ममूल होय.

लौकिक व अलौकिक असे जीवनाचे दोन भाग

ज्यांत धर्म नाहीं, असा कोणताही मागासलेला किंवा सुधारलेला समाज जगांत सांपडत नाहीं. प्राथमिक परिस्थितीतील प्रत्येक मानवगणांत जीवनाचे धार्मिक व व्यावहारिक ( Sacred and Profane ) असे दोन विभाग दिसतात[1]; दुसऱ्या शब्दांत यांस अलौकिक व लौकिक असेंहि म्हणतां येईल. पवित्र व पूज्य समजून श्रद्धेनें आचरलें जाणारें व विशिष्ट विधिनिषेधांच्या मर्यादेनें

( १ ) Science Religion and Reality, pp. 1, 31. by Malinowski.

बद्ध असे परंपरागत कर्मकांड, आचार किंवा नियम प्रत्येक प्राथमिक परिस्थितींतील समाजांतहि आढळतात. गूढ अलौकिक शक्ति, जादूंचे सामर्थ्य, पापपुण्य, आत्मे, भुतें, राक्षस, पितर, गंधर्व, यक्ष, देवता इत्यादि कल्पनांशीं या आचारांचा संबंध असतो. हीच जीवनाची अलौकिक बाजू होय. दुसरी लौकिक बाजू होय; यांत शिकार, वनसंचार, कृषि, फलसंचय, नौकानयन, युद्ध, हत्यारें बनविणें, इत्यादि व्यावहारिक क्रिया येतात; विज्ञानांत ज्या तऱ्हेच्या बुद्धीचा वापर करावा लागतो, तशा प्रकारची चौकस बुद्धि यांत वापरावी लागते. या लौकिक व्यवहारांत लोक कार्यकारणांच्या नैसर्गिक क्रमांचे सूक्ष्म निरीक्षण करतात, त्यांचा नियमबद्धतेवर पक्का विश्वास असतो. प्राथमिक स्थितींतील गणांप्रमाणेंच सुधारलेल्या समाजांतही या दोन तऱ्हेचे विभाग दिसतात. सुधारलेला समाज अलौकिक विभागास स्वर्गाचा, मोक्षाचा, परमार्थाचा, किंवा अध्यात्माचा मार्ग म्हणतात. हा अलौकिक प्रांत धर्म-विचारांचा विषय होय.

धार्मिक जीवन हें व्यावहारिक जीवनांत मिसळलेलें असतें. व्यावहारिक क्रियांशीं धार्मिक बुद्धि—क्रिया—भावनांचा संबंध पोचतो. त्यामुळें कित्येक धर्मतत्त्वज्ञ सगळ्याच मानवी क्रियेस धर्माधर्माच्या क्षेत्रांत आणून सोडतात. सगळ्या मानसिक व शारीरिक क्रिया या तत्त्ववेत्यांनीं जरी धर्माशी जोडलेल्या असल्या, तरी समाजांतील सामान्य लोक अलौकिक वस्तूंचे व लौकिक वस्तूंचे पृथक्त्व गृहीत धरून व्यवहार करीत असतात. धार्मिक दृष्टिकोनानें सगळ्या जीवनाकडे केवळ कांहीं थोड्या व्यक्तीच पाहूं शकतात. सुधारलेल्या समाजांतील धार्मिक तत्त्वज्ञानांत

जगाचा व जीवनाचा संबंध अलौकिक धार्मिक तत्त्वाशी जोडलेला असतो, हें खरें; पण परंपरेनें सर्व मानव-व्यवहार धर्मबद्ध आहेत, अशी विचारसरणी त्या समाजांत सर्वमान्य असते, असे म्हणतां येत नाहीं. सर्वसाधारण-सामाजिक-व्यवहारांत या विचारसरणीला महत्त्व नसतें. रानटी समाजांतही अलौकिक वस्तूंच्या कल्पनांचे क्षेत्र विभागलेलेंच असते. शेती नांगरणें, वेळेवर बी पेरणें, खत घालणें, जमीन भाजणें, जमीनीची पारख करणें, धान्यावरील कीड मारणें, नौका बांधणें, वनस्पतींची लागवड करणें, जनावरांची जोपासना करणें इत्यादि क्रिया धार्मिक क्रियेपेक्षां निराळ्या आहेत, हें रानटी लोकांसही समजते. पाऊस पाडण्याकरितां, शेती पिकण्याकरितां, अतिवृष्टि टाळण्याकरितां, समुद्रांतील प्रवासांत व जमिनीवरील सफरींत अकल्पिक संकटें टाळण्याकरितां, संसार सुखी होण्याकरितां करावयाचे धार्मिकविधि निराळे आहेत. धार्मिकविधींचा व्यावहारिक कर्मांशीं संबंध असतो एवढेंच. ही गोष्ट सगळ्याच समाजांना लागू आहे.

सुधारलेल्या धर्माची पूर्वतयारी

प्राथमिक स्थितींतील समाजांत विज्ञान निर्माण झालेलें नसतें; पण विज्ञान निर्माण होण्यास लागणारी पूर्वतयारी तेथें सुरू असतें, त्याचा पाया तेथें रचला जात असतो. त्याचप्रमाणें सुधारलेल्या समाजांत जी धर्मसंस्था दिसते, त्याची पूर्वतयारी प्राथमिक समाजांत होत असते. ही पूर्व तयारी सुधारलेल्या धर्मसंस्थेचे मूळ होय. जीवनाबद्दलचें व जगाबद्दलचें विशिष्ट तत्त्वज्ञान हा प्रगल्भ समाजांच्या धर्माचा पाया होय. पण प्राथमिक समाजांतील धर्मांत सर्व जीवनाचा व

विश्वाचा संकलित विचार असत नाहीं. त्या स्थितींतील समाजाची शक्ति जीवनांतल्या प्राथमिक गरजा संपादन करण्यांतच खर्च होत असते. तात्पुरत्या गरजा भागविण्याकरितां जेवढा विचार करतां येईल तेवढाच. त्यांची ध्येयें हीं अगदीं जवळची असतात. अन्न, रोगनिवारण, संकटनाश प्रजोत्पादन व प्रजारक्षण एवढ्यांतच सगळा जीव टेकीस येतो, तेवढ्याकरितांच देवतांची, भूतांची किंवा गूढ अलौकिक शक्तींची तो आराधना करतो किंवा साहाय्य घेतो, त्यावेळीं पद्धतियुक्त तत्त्वज्ञान व धर्म निर्माण होऊं शकत नाहीं. पण त्या स्थितींत प्रगल्भ धर्मांची बीजें किंवा मुळें सांपडतात. याकरितां त्यांचा विचार करणें अगत्याचें असतें.

हिंदु धर्माची चिकित्सा करीत असतां, रानटी लोकांपासून तो सुधारलेल्या समाजापर्यंतच्या धर्मांच्या मुळांशीं असलेल्या तत्त्वांचा विचार करण्याचें काय प्रयोजन ? याचें उत्तर असें आहे कीं, हिंदु धर्माचें स्वरूप अत्यंत गुंतागुंतीचें, बहुरूपी, उच्चनीच अशा सर्व पातळींतील समाजांच्या धर्मसंस्थांशीं जुळणाऱ्या आचार–विचारांनीं भरगच्च भरलेलें असल्यामुळें त्याची समीक्षा योग्य रीतीनें करण्यास या चर्चेची गरज आहे. धर्माच्या गहन स्वरूपाचा उलगडा त्याच्या निरनिराळ्या अवस्थांचा विचार केल्यानेंच होतो.

ऐहिक गरजांतून धर्माची उत्पत्ति

भौतिक जीवन व सामुदायिक जीवन अशा मानवी जीवनाच्या दोन कक्षा ( Aspects ) आहेत. या द्विविध जीवनास भौतिक व सामाजिक शक्तींच्या साहाय्याची आवश्यकता असते. मानवी जीवनांत भौतिक व सामा

जिक अशा दोन गरजा अगदीं अपरिहार्य दिसतात. या दोन गरजा, हीं दोन इष्टें, धर्माचें मूळ होत. या दोन गरजांतून धर्म निर्माण झाला आहे. [ १ ] भौतिक जीवन म्हणजे शरीररक्षण, सचेतन-अचेतन वस्तूंचा किंवा द्रव्यगुणकर्मांचा इन्द्रियांनीं व मनानें स्वीकार आणि व्यवस्थित प्रजोत्पादन. हें जीवन भौतिक साधनाधीन असतें. भूमि, अन्न, वनस्पति, आच्छादन, वस्त्र, गृह, औषधी, शस्त्रें यांची या जीवनास गरज असते. हीं साधनें पर्जन्य, नद्या, हवा, उष्णता, प्रकाश इत्यादिकांच्या आधीन असतात. ह्या सगळ्या वस्तूंकरितां निरंतर धडपड व झगडा यांत प्राथमिक स्थितींतील सगळीं माणसें गुंतलेलीं असतात. स्वतःच्या मानसिक व शारीरिक कर्तृत्वानेंच ह्यांचा मनुष्यास लाभ होतो. सृष्टींतील कार्यकारणभावाच्या ज्ञानाची प्राप्ति करून घेतल्यानेंच त्याला सृष्टींतील साधनें प्राप्त करून घेतां येतात. जीवनार्थ चाललेल्या प्रयत्नांत सृष्टींतील कार्यकारणभाव अवगत करून घेणें ही मानवी बुद्धीची नैसर्गिक प्रवृत्ति होय. ही संशोधक बुद्धि मनुष्यजीवनांतील मूलभूत प्रेरकशक्ति होय. या प्रेरणाशक्तीमुळेंच मनुष्य अमानुष सृष्टीपेक्षां श्रेष्ठ झाला. या शक्तीमुळेंच तो अनंत सृष्टींवर क्रमानें विजय मिळवत चालला आहे.

कार्यकारणभावाचा शोध करण्याचा प्रयत्न करीत असतां, प्रथमतः त्याच्या आवती भोंवतीं चाललेल्या व त्याच्या दैनंदिन जीवनावर परिणाम करणाऱ्या सृष्टीतील घडामोडींचा त्याला वास्तविक अर्थ कळत नाहीं; सृष्टीतील शक्तींवर त्याची सत्ता चालत नाहीं; सृष्टीतील शक्तींवर, त्याला आपलें भविष्य नीट घडविण्याइतकी सत्ता,

प्राप्त झालेली नसते. स्वतःच्या कक्षेबाहेर असलेल्या निसर्गशक्तींच्या वास्तविक स्वरूपाची, कार्यकारणभावाची अवगति करून घेण्यास मानव अतिशय उत्सुक असतो; कारण त्याच्या जीवनावर अनुकूल व प्रतिकूल आघात निसर्गशक्ति करीत असतात. सूर्यचन्द्रांचें उदयास्त, उषःकाल, ग्रहणें, मेघ, पर्जन्य, ऋतुचक्र, वनस्पतिवर्ग, पशुवर्ग, भूकंप, समुद्रांतील वादळ, अतिवृष्टि, अनावृष्टि, झंझावात, साथींचे घातुक रोग, अनेक शारीरिक व्याधि, जन्ममृत्यु इत्यादिकांचा परिणाम मनावर होत असतो. भय, आनंद, विस्मय, विषाद, शोक, प्रतीक्षा, उत्कंठा, प्रीति, इत्यादि भावनांचा उद्रेग अंतःकरणांत अशाच परिस्थितींत होत असतो. ह्या विचार-विकारांच्या अनुभवाचे संस्कार त्याच्या हृदयांत खोलवर उमटतात. त्याला हा अनुभव स्वस्थ बसूं देत नाहीं. त्याची संशोधक प्रवृत्ति जागृत होते. भोवताली घडणाऱ्या परिस्थितीचा कार्यकारणभाव समजण्याची उत्कंठा लागते. त्यामुळें अनेक आभास व कल्पना-तरंग उठत असतात. वास्तवज्ञानाचें क्षेत्र अतिशय मर्यादित असल्यामुळें भ्रांतिमय विपर्यस्त विचारसरणी उत्पन्न होते. निसर्गशक्तींच्या ठायीं मन अलौकिक शक्तींचा व व्यक्तींचा ( Supernatural forces and personalities ) आरोप करते. निसर्गशक्तींचे व्यापार या अलौकिक व्यक्तींचे किंवा शक्तींचे चरित्र होय, असें मन ठरवितें. ओबडधोबड व विक्षिप्त कल्पनांचे जाळें विणून मन सृष्टीचा अर्थ ठरवितें.

वास्तविक व लौकिक अनुभवानें निर्मिलेल्या कल्पनांच्या विपर्यस्त रचनेनेंच मन अलौकिक शक्ति व व्यक्ति यांच्या कल्पना

निर्माण करतें. अलौकिक शक्ति व व्यक्ति यांच्या विषयीं बनविलेल्या कल्पनांचे पृथक्करण केल्यास त्या कल्पनांचा प्रत्येक अंश वास्तविक अनुभवानें निर्माण झालेल्या कल्पनाच असतात. कविकल्पनांचे पृथक्करण केल्यानें या अलौकिक कल्पनांचे पृथक्करण कसें करावें तें समजतें.

त्या कल्पित शक्तींच्या व व्यक्तींच्या विषयीं भय, आदर, शरणागति, प्रीति इत्यादि भावना उत्पन्न होतात. पदोपदीं असहायतेची व निराधारतेची जाणीव होऊन मनुष्य त्या शक्तींचे साहाय्य घेण्याचा प्रयत्न करतो. त्याचे साहाय्य दोन तऱ्हेनें घेण्याचा प्रयत्न करतो. त्यांना स्वाधीन करून घेण्यानें, किंवा त्यांचे मन वळवून घेण्यानें, हा प्रयत्न म्हणजेच धार्मिक कर्म होय. स्वाधीन करण्याची क्रिया म्हणजे साधना व मन वळविण्याची क्रिया म्हणजे आराधना. साधनात्मक क्रियेंत जादू ( Magical rites ) मुख्य व आराधनेंत भक्ति ही मुख्य आहे.

या ठिकाणीं जादू हा शब्द व्यापक अर्थीं वापरला आहे. मंत्र, तंत्र, यंत्र, अभिचार, कृत्या, जारण, मारण, उच्चारण इत्यादि तंत्रशास्त्रांतील व अथर्ववेदांतील क्रिया त्यांत अंतर्भूत होतात. वेदांतील बरेचसे यज्ञ तपासले तर त्यांतील पुष्कळ क्रिया 'यातु' या शब्दानें बोधित होतील, अशाच आहेत. पाऊस, धान्यसमृद्धि, पशुवृद्धि, प्रजाप्राप्ति, रोगनिवारण, कुटुंब-ग्रामदेशादिकांच्या संकटांचा नाश, शत्रुनिर्दालन इत्यादि साध्यांच्या सिद्धीकरितां जीं विशिष्ट

कर्में सांगितलेलीं असतात, त्यांचा जादूंत समावेश होतो. त्या कर्मांच्या योगानें अद्‌भूत शक्तींवर गूढरीतीनें ताबा चालवितां येतो. त्या शक्तींना आपल्या इष्ट-सिद्धीकरतां काम करावयास भाग पाडणें हा या कर्मांचा उद्देश असतो.

आराधना म्हणजे मन वळविण्याची किंवा शरण जाण्याची क्रिया. अलौकिक शक्तींच्या व व्यक्तींच्या लहरीवर, इच्छेवर व कृपेवर इष्टसिद्धि अवलंबून असते, अशी समजूत आराधनेच्या मुळाशीं असते. पूजा, हवन, नमस्कार, दान, श्राद्ध, जप, प्रार्थना, गुणसंकीर्तन, भक्ति इत्यादि क्रिया आराधना या सदरांत येतात.

साधनेकरितां व आराधनेकरितां कर्मकाण्ड व्यवस्थित रितीनें रचलें जातें. मंत्रतंत्रांचे विधान तयार होतें. स्तोत्रें, कथा व पुराणें तयार होतात. विशिष्ट संप्रदाय किंवा परंपरागत आचार निर्माण होतो.

[ २ ] धर्माशीं भौतिक गरजांचा कसा संबंध आहे व त्यांतून धर्म कसा निर्माण होतो, याचे वर थोडक्यांत विवरण केलें. सामाजिक जीवन ही मानवी जीवनाची दुसरी बाजू ( aspect ) होय. मनुष्याच्या भौतिक गरजांची पूर्ति त्याच्या सामुदायिक जीवनांतच होते. ही सामुदायिक जीवनाची गरज धर्माचें दुसरें मूळ होय. सामुदायिक संबंध हा मानवी जीवनांचा आधारच होय. मनुष्याला समाजाव्यतिरिक्त अस्तित्वच नाहीं. शरीरांतील एक एक पेशी ( cell )

स्वतंत्र रीतीनें जन्मत नाहीं व जगत नाहीं; तसेंच व्यक्तीचें व समाजाचें नातें आहे. विचार, भावना, भाषा, वाङ्मय, कला, पोषण-संरक्षणाची साधनें, आचार व नीति इत्यादि जे कांहीं व्यक्तींच्या ठायीं प्रशस्त अथवा अप्रशस्त असते, ते सर्व सामाजिकच असते. त्यांत व्यक्तींचा भाग अल्प असतो. या सामुदायिक जीवनाची संवेदना प्राथमिक संस्कृतीतील व्यक्तींत फार तीव्र असते. व्यक्तीचा अहंकार सामाजिक संवेदनेंत गोंवलेला असतो. याचें कारण अगदी उघड आहे. त्यावेळीं सगळा योगक्षेमच प्रत्यक्ष समुदायाच्या आश्रयानें चालतो. आहाराची व विहाराची साधनें समुदायाश्रित असतात. परंपरेचें संरक्षण करणें अगदी अगत्याचें, पण तितकेंच कठीण असते; म्हणून सगळी जमातची जमात परंपरेचे रक्षण करण्यास तत्पर असते. जमातीवरील व व्यक्तीवरील संकटांच्या जबाबदारीची भावना तिला फार तीव्र असते. अलौकिक शक्तींचा कोप होऊ नये म्हणून व त्यांची कृपा व्हावी म्हणून साधना व आराधना या धार्मिक कर्मांचीं अंमलबजावणी समुदायच करतो. सामाजिक जीवनांतील बऱ्यावाईट प्रसंगांचा वास्तविक अर्थ कळण्याइतकी पात्रता त्या स्थितीतींल जमातींना नसते. त्यामुळें सामाजिक घडामोडींच्या पाठीमागें अलौकिक शक्तींचा हात असतो, असें स्वाभाविकपणें वाटतें. सामाजिक कर्तव्यें किंवा सामाजिक कायदें त्या शक्तींच्या भीतीमुळें किंवा प्रीतीमुळें पाळले जातात. प्रत्येक जमातीच्या विशिष्ट देवता असतात. त्या विशिष्ट देवतांचें स्वरूप त्या जमातींच्या वैचारिक पात्रतेप्रमाणें कल्पिलेलें असतें. त्यांची विचारसामग्री जेवढी असते व विचारांचा साठा जेवढा असतो, तेवढ्यावरच

धर्म उभारला जातो. गणजीवनाबद्दलच्या उत्कट भावनांचा आविष्कार या धर्मात होतो. जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, गणदीक्षा ( Initial Ceremony ), विवाह, अन्त्यविधि, सण, हंगामाचे समारंभ, सामुदायिक भंडारे, युद्धविजयोत्सव, न्यायसभा ( Tribal Courts ) इत्यादि धार्मिक कर्मे सामाजिक भावनेचेच आविष्कार होत. जमातीचे कायदे व आचार पवित्र ( sacred ) असतात, त्यांच्या पाठीशी अलौकिक ( supernatural ) शक्तींचे अधिष्ठान असते. अशीच प्राथमिक जमातींची ( Primitive societies ) समजूत असते. सामाजिक जीवन धर्माचें दुसरें मूळ होय, ही गोष्ट प्राथमिक ( Primitive ) किंवा सुधारलेल्या ( Civilized ) समाजांच्या धार्मिक जीवनाच्या निरीक्षणावरून सिद्ध होतें. म्हणूनच सामाजिक जीवन ज्या मानानें विकसित किंवा अवनत होत जाते, त्या प्रमाणांत धर्महो विकसित किंवा अवनत होत जातो. कारण जीवन हा अनुभवाचा आधार व अनुभव धर्माचा आधार होय.

पारलौकिक किंवा पारमार्थिक धर्मकल्पनांचा उदय

पारलौकिक गतीवर व पारमार्थिक जीवनावर भर देणारे धर्म समाजाच्या इतिहासांत उशिरा उत्पन्न झालेले आहेत. धर्म पहिल्यांदा ऐहिक गरजां करितां उत्पन्न झाला. कांहीं काळानें त्यांत पारलौकिक स्थितीला प्रामुख्य आले.

( १ ) Science Religion and Reality, p. 42.
Religion of the Semites, by Robertson Smith.

पारलौकिक स्थिति म्हणजे मृत्यूनंतर प्राप्त होणारी किंवा या देहाव्यतिरिक्त किंवा या जगाव्यतिरिक्त स्थिति. ह्या स्थितीची कल्पना अनेक कारणांनीं अस्तित्वांत आली. पहिलें कारण, देहाहून जीव किंवा आत्मा निराळा आहे व तो देहावेगळा राहूं शकतो, या कल्पनेचा उदय झाल्यामुळें पारलौकिक स्थिति व पारलौकिक ध्येयें यांची कल्पना उत्पन्न झाली. दुसरें कारण, रूढ धार्मिक मार्गानें ऐहिक साध्यें प्राप्त होत नाहींत, असा अंदाज येऊ लागल्यानंतर मनानें रूढ धार्मिक मार्गाशीं पारलौकिक ध्येयाची सांगड घातली. तिसरें कारण असें कीं, ज्या कामना व भावना यांची तृप्ति या जीवनांत होणें अशक्य आहे असें दिसतें, त्यांच्या तृप्तीकरितां या जगापेक्षां निराळें जग मनानें निर्मिलें. यासच परलोक म्हणतात. परलोक मनुष्याच्या ऐहिक जीवनांतील दौर्बल्यांतून व वैफल्यांतून जन्मतो. परलोक याच जगांतील परिस्थितीच्या अनुभवांतून निर्माण झालेला असतो. अनुभवाचें जेवढें क्षेत्र व जेवढी कुवत असते, तेवढाच परलोक ते ते समाज निर्माण करतात. प्रत्येक धर्मसंस्थेचा परलोक निराळ्या प्रकारचा असतो. कारण प्रत्येक धर्म निराळ्या विशिष्ट सामाजिक स्थितींत उत्पन्न झाला आहे. चवथें कारण; समाजांत असे वर्ग उत्पन्न झालें कीं, ज्यांचे हितसंबंध किंवा स्वार्थ धर्मांतील पारलौकिक विचारसरणीच्या आधारावर सुरक्षित राहूं शकतात. अशा सत्ताधारी वरिष्ठ वर्गास हितप्रद असणारे चालू समाजरचनेंतील निर्बंध ( Laws ) परमेश्वरानें अथवा अलौकिक शाश्वत नियमांनीं निर्माण झाले आहेत, अशी समजूत कायम राखण्याचा प्रयत्न सत्ताधारी वर्ग करीत असतात. कांहीं काळपर्यंत सामान्य

जनता निरुपाय होऊन या निर्बंधापुढें नम्र होते. त्यांच्या दैन्यास व अधःपातास जी समाजरचना व जे कायदे कारण होतात, त्यापुढें ईश्वरी संकेत म्हणून जनता प्रणाम करीत असते. या जन्मांत सत्कर्मानें वागावें, मृत्यूनंतर सगळें कांहीं बरें होईल; सत्कर्मानें न वागल्यास दैवी कोप होईल; अशी भावना खोल रुजलेली असते. सत्कर्म म्हणजे चालू समाजरचनेस पोषक विधिनिषेध. त्यांना शाश्वतमूल्य व दिव्यत्व दिलेलें असतें. त्यामुळें श्रद्धा व भावना यानांही शाश्वतमूल्य प्राप्त होतें. वस्तुतः श्रद्धा व भावना यांचे विषय व रूपें नेहमीं बदलत असतात. मनुष्य स्वतःच्या कर्तृत्वानें चालू समाज स्थितीपेक्षां श्रेष्ठ समाजस्थिति निर्माण करू शकतो, अशी कल्पना येईपर्यंत धर्मसंस्था स्थिर राहाते, ही कल्पनाच धर्मविरुद्ध व ईश्वरविरुद्ध बंड उत्पन्न करते. समाजशास्त्र जेव्हां मानवी कर्तृत्वावर भरवसा निर्माण करतें, तेव्हां धार्मिक व ईश्वरविषयक स्वप्न विरूं लागतें. ईश्वर व मानवकर्तृत्व यांचा फार जुना झगडा आहे. विज्ञानयुगाचे सामाजिक जीवनांत वर्चस्व झाल्यावरच या झगड्याचा निकाल लागेल. समाजवादी क्रांतीशिवाय विज्ञानाचें वर्चस्व स्थापित होणार नाहीं; व विज्ञानाच्या वर्चस्वाशिवाय समाजांतील जंगलीपणा व पशुत्व नष्ट होणार नाहीं.

पारलौकिक कल्पनांच्या आधारें विश्वाचें तत्त्वज्ञान सांगून समाजनियंत्रण करणाऱ्या धर्मसंस्था पुष्कळ प्रमाणांत सुधारलेल्या समाजांत उत्पन्न झाल्या. या धर्मसंस्थांची पूर्वतयारी रानटी समाजांत झाली. या संस्थांची घडण युगानुयुगें होत होतीं. या संस्थाची

पूर्वतयारी म्हणजेच धर्ममूल होय. या धर्ममूलाचा विचार अनेक पाश्चात्य पंडितांनीं केला आहे. निरनिराळ्या दिशेनें अभ्यास करून प्रत्येकानें पृथक् पृथक् उपपत्ति मांडली आहे. ही प्रत्येक उपपत्ति महत्त्वाची आहे. त्यांच्यामध्यें विरोधापेक्षां परस्पर पूरकतांच अधिक आहे. धर्माच्या एका विशिष्ट अंगावर भर दिल्यामुळें त्यांच्यांत विरोध आलेला असतो. अवलोकनाचें क्षेत्र बदलल्यामुळेंहीं फरक झाला आहे. कांहीं ठिकाणीं मात्र मूलभूत दृष्टिकोनच निराळा आहे. पाश्चात्य पंडितांच्या या धर्मोद्भवविषयक उपपत्तीचा सारांश येथें मांडल्यास अप्रस्तुत होणार नाहीं.

सर टायलरचा मूर्तजीववाद (Animism) किंवा वस्तुपुरुषवाद

ऐतिहासिक दृष्टिकोन लक्षांत घेऊन धर्मोद्भव व धर्मविकास यांचें मनन करण्यास उपयुक्त असें शास्त्र पहिल्यांदा सर एडवर्ड टायलर यानें मांडलें. त्याच्या उपपत्तीस वस्तुपुरुषवाद (Personalism) किंवा मूर्तजीववाद (animism) असें म्हणतात. प्रत्येक सजीव किंवा निर्जीव वस्तूंत कोणीतरी पुरुष, भूत, किंवा जीव, राहात असतो; तोच त्या सजीव किंवा निर्जीव वस्तूला हालचाल करावयास लावतो; तोच त्या वस्तूंचा नियंता असतो; त्या वस्तूपेक्षां तो निराळा असतो; अशी भावना प्राथमिक संस्कृतीतील लोकांच्या ठिकाणीं असते; ही भावना किंवा समजूत त्यांच्या धर्माचा आधार असतो. वस्तुपुरुषवाद किंवा मूर्तजीववाद म्हणजे प्रत्येक वस्तूंत किंवा मूर्त पदार्थांत एक एक पुरुष किंवा जीव असतो, असें मानणारी विचारसरणी होय.

असंस्कृत प्राकृत मानवांच्या अडाणी मनांत ही समजूत उत्पन्न होते. स्वप्नें, भास, उन्माद, ( cataleptic states ) इत्यादि विचित्र मानसिक स्थितींचे विवरण करून हें तत्त्वज्ञान प्राकृत माणसांनीं केलेलें असतें. शरीर घोरत पडलेलें असतें पण स्वप्नांतील अनुभव अगदीं उलटा असतो. देशविदेशांचा प्रवास त्याचवेळीं घडतो; दारिद्र्य असूनही श्रीमंतीचा त्याचवेळीं अनुभव येतो; तो शिकार करतो; साप त्याच्या मानेभोंवतीं विळखा घालतो; त्याच्यावर वाघ झडप घालतो; जागृतींत झिडकारणारी रमणी प्रसन्न होऊन त्यास रतीचा लाभ देतें; देह बंदिस्त असूनही स्वातंत्र्याचा अनुभव मिळतो. देहाशीं विसंगत असणाऱ्या व्यवहारांचा व विषयांचा भोक्ता व साक्षी निराळा आहे, असें त्यामुळें वाटूं लागतें. मुशींत ज्याप्रमाणें रस भरलेला असतो, त्याप्रमाणें हा देहांत समावलेला असतो, असें वाटतें. या देहांत आंत बाहेर येरझारा घालणारा हा पुरुष रस, हवा, धुकें, छाया, प्रतिबिंब, दीप किंवा ज्योति यांसारखा असतो, अशी भावना होते. वरील भावनांस पोषक असें जागृतींत देखील अनुभव येतात. नुकत्याच मेलेल्या प्रियजनाची किंवा आपणच ठार केलेल्या कट्ट्या शत्रूची मूर्ति डोळ्यासमोर येतांना दिसते, मृत प्रियजनांशीं पुनर्मीलन झाल्यासारखें वाटतें, त्यांचा आवाज ऐकूं येतो, हाक मारल्यासारखी वाटते, मारलेला वैरी सूड घेण्याचा धाक घालताना दिसतो. उन्मादांत तर असत्य व नष्ट सृष्टि भोंवताली नाचूंच लागते. नसते रंग, नसत्या आकृति, नसते आवाज, नसते शत्रुमित्र, यांचा प्रत्यय येऊं लागतो. पांच पांच, दहा दहा पिढ्यांपूर्वीच्या व्यक्तींच्या

गाठीभेटी झाल्याचा प्रत्यय येतो. अशा बहुविध मानसिक स्थिती-वरून देहाव्यतिरिक्त पण देहांत राहणारें, वाटेल तसा संचार कर-णारें भूत आहे, असा पक्का ग्रह माणसांचा होतो. त्यास भूत, पिशाच्च, आत्मा, प्राण, किंवा जीव असें म्हणातात. हे जीवात्मे जिवंतपणीं किंवा मेल्यावर पछाडतात, बरें वाईट करूं शकतात अशी कल्पना होते. आयुष्यांतील बरे वाईट प्रसंग यांच्याचमुळें घडतात, अशी भावना होते. कारण त्या प्रसंगांचा वास्तविक उल-गडा झालेला नसतो. अजूनही खेड्यापाड्यांत व भाबड्या कुटुंबांत घरांतील आजारांची उपपत्ति, या भुताखेतांच्याच अस्तित्वानें लाव-ण्यांत येतें. जीवात्म्याच्या या कल्पनेंतून देव, पितर, यक्ष, राक्षस, अमरत्व, स्वर्गनरक मोक्ष यांच्या कल्पना निघाल्या, याच कल्पने-मुळें पशु, वृक्ष, वनस्पति, नद्या, समुद्र, पर्वत, इत्यादिकांच्या ठिकाणीं स्वतः प्रमाणेंच एक जीवात्मा असतो, असें माणसानें कल्पिलें व त्यांच्या हालचाली जीवात्म्यामुळें होतात, असें भाविलें. त्यांचे प्रबळ जीवात्मे आपल्या व्यवहारांत हात घालतात, विघ्नें उत्पन्न करतात, अथवा यशही देतात, असा आपल्या प्रवृत्तीवरून अंदाज बांधतात. त्यांना संतुष्ट करण्याकरितां किंवा त्यांना आपल्या बाजूनें वळविण्या-करितां अनेक धार्मिक विधि उत्पन्न झाले. मृतांच्या जीवात्म्यास संतुष्ट करण्याकरितां किंवा त्यांस नीट गति मिळण्याकरितां अन्त्यविधि, श्राद्ध, पुण्यतिथि, समाधि किंवा कबर बांधणें इत्यादि पितृपूजाधर्म उत्पन्न झाला. सृष्टींतील वस्तूंच्या ठायीं राहणाऱ्या भूतांची आरा-धना म्हणजे देवपूजा किंवा देवयज्ञ होय. सगळ्या धर्मविधींच्या व धर्मशास्त्रांच्या मुळांशीं वस्तुपुरुषवाद किंवा मूर्तजीववाद (animism)

आहे, असें टायलरचें मत आहे. त्यानें ह्याची चर्चा Primitive Culture या ग्रंथांत विस्तारानें व Anthropology मध्यें संक्षेपानें केली आहे.

ही टायलरची विचारसरणी अपर्याप्त आहे, असें या क्षेत्रांत जें नवें नवें संशोधन झालें त्यावरून दिसून आलें. सर जेम्स फ्रेझरनें प्राथमिक संस्कृतींतील धर्मविधींची यातुविद्या ( Magic ) या सदराखालीं विस्तृत मांडणी आपल्या 'सुवर्णशाखा' ( Golden bough ) या ग्रंथांत केली आहे. त्यावरून असें दिसतें कीं, मूर्तजीववादापेक्षां मागासलेली कल्पना प्राकृत धर्मविधींत आहे. त्या स्थितींत मूर्तजीववादासारखा सिद्धांत काढण्याइतकी मननशीलता नसते. मूर्तजीववाद थोड्या प्रगल्भ संस्कृतीत उत्पन्न होतो. पारध, मच्छीमार पशुपालन, शेती व तदुपयुक्त कामधंदे यांतच प्राकृत मन गढून जातें. त्याला विचार करावयास अवसरच कमी असतो. जो अवसर मिळतो त्यांत जमातीचे उत्सव-समारंभ, नाच आणि इतर क्रीडा यांतच जीव रमतो. त्या स्थितींत उत्पन्न होणाऱ्या धार्मिक विधीच्या मुळाशीं असणाऱ्या भावनेचा विषय काय असतो याची चर्चा डॉ मॅरेट यांनें चांगली केली आहे. ती पुढें सांगणार आहोत.

डॉ. मॅलिनोस्की ( Malinowski ) 'विज्ञान, धर्म व वस्तु' ( Science, Religion and Reality ) या अनेक-पंडित-लिखित ग्रंथांत मूर्तजीववादाची स्वतंत्र उपपत्ति सांगितली आहे. ती अशी:— मृत्यूची भीति सगळ्याच प्राण्यांच्या ठायीं

असते, तशी रानटी मनुष्यांतही असते. आत्मरक्षणप्रवृत्ति हें या भीतीचें मूळ होय. मृत्यूनें सर्व संपतें ही कल्पनाच साधारण माणसास सहन होत नाहीं, नेहमीच जगावेसे वाटतें. चिरजीवनाची किंवा अमरत्वाची वासना, मृत्यूचा दरारा, सर्व नाशाचा तिटकारा प्रत्येकांत असतो. हसणारी, खेळणारी, बोलणारी, चैतन्यमय व्यक्ति पाहतां पाहतां, चटदिशी संपलेली दिसते. पण मनांस ती संपली ही कल्पनाच आवडत नाहीं व पटत नाहीं. ती स्थिति नकोशीच वाटते. अशावेळी भावनांचें काहूर माजतें. विषाद, उद्वेग, विरह-वेदना, यामुळें शोकास पारावार राहात नाहीं. जीवन व सर्वांचा निकाल लावणारा मृत्यू हें दृष्टिगोचर होणारें द्वंद्व मनांत विचारांचा झगडा उत्पन्न करते. विरुद्ध भावनांनीं तुडुंब भरलेल्या मनाला मृत्यू द्वेष्य वाटतो. त्यामुळेंच मृत्यूनंतरच्या अस्तित्वाचा व अमरत्वाचा साक्षात्कारच होतो. खात्रीच वाटतें कीं देहनाशाबरोबर व्यक्तित्व नष्ट होत नाहीं. या उत्कट अस्ति-भावनेंतून अनेक सामुदायिक क्रिया अस्तित्वांत येतात, त्यांसच अंत्यविधि म्हणतात. सगळे लोक मरावयाचे अगोदर व मेल्यानंतर जमतात, अखेर त्याची वासलात लावतात. रानटीस्थितींत तर समाजाचा प्रत्येक घटक जमातीला बहुमोलाचा वाटतो. त्यामुळें सगळी जमात शोकांत मग्न होते. निकटच्या लोकांच्या अंतःकरणांतील दुःख त्यामुळें हलकें होतें. जमात ज्या विधींचें आचरण करते त्या विधींच्या योगाने जीवाच्या अस्तित्वाची श्रद्धा बळकट होते. पितरांच्या पूजा, तदर्थ सार्वजनिक भोजनसमारंभ व स्मारक-विधि मृतांच्या अस्तित्वाची खात्री पटवीत असतात.

टायलरची उपपत्ति बुद्धिमूलक आहे व मॅलिनोस्कीची उपपत्ति भावनामूलक आहे. भावना व बुद्धि यांना दोघांच्याही उपपत्तीमध्यें मुख्य किंवा गौणस्थान आहे. नुसती बुद्धि ( intelect ) आणि नुसती भावना ( emotion ) यांचे विलग अस्तित्व मानसशास्त्रास मान्य नाही. मूर्तजीववादाच्या उदयापूर्वी प्राथमिक संस्कृतींतही पहिल्यांदा अलौकिकशक्तिवाद ( Supernaturalism ) असतो, असें डॉ. मॅरेट वगैरे पंडितांचें मत आहे. या वादाची मांडणी करण्याचे अगोदर हा वाद ज्या धर्मचर्चेतून निघाला ती धर्मचर्चा काय आहे तें पाहूं. ही चर्चा सर जेम्स फ्रेझरनें केली आहे. त्यानें तीन महत्वाचें मुद्दे पुढें मांडले आहेत. अलिकडचे मानवजातिशास्त्र या तीन मुद्यांचा विचार केल्याशिवाय पुढें पाऊल टाकीत नाहीं, इतके ते महत्वाचे आहेत. ( १ ) यातुविद्येचा ( Magic ) धर्माशी व विज्ञानाशी संबंध ( २ ) ( Totemism ) कुललक्षणपूजावादावरून निघणारी प्राथमिक संस्कृतींतील समाजधारणा ( ३ ) संतति, कृषि व पशुवृद्धि या करितां करण्यांत येणारे धार्मिक विधि, हे ते तीन विषय होत.

यातुविद्या Magic व धर्म

सुवर्णशाखेच्या पहिल्या आवृत्तींत फ्रेझरनें जादू ( Magic ) ही धर्माची अगदीं प्रथमावस्था होय, असें म्हटलें आहे. पुष्कळशा रानटी जातींतील यातुविधींत मूर्तजीववादाची कल्पना नसते. त्यांत ही कल्पना उशिरा शिरली आहे. म्हणून जादूस धर्माची अगदीं प्राथमिक अवस्था असें म्हटलें. सुवर्णशाखेच्या दुसऱ्या

आवृत्तींत फ्रेझरनें यातुविद्येस विज्ञानाची पूर्वावस्था म्हटलें आहे. सृष्टीतील शक्तींवर कबजा करून त्यांचा आपल्या इष्टसिद्धीकरतां विनियोग करणें हा विज्ञानाचा उपयोग होय. असेंच कार्य करण्याचा जादूचाही उद्देश असतो. निसर्गाच्या नियमांवर विज्ञानाची भिस्त असतें. निसर्गाचे नियम योग्य रीतीनें वापरलें म्हणजे हमखास फलदायीं होतात, अशी विज्ञानाची खात्री असतें. जादुगाराचीही आपल्या मंत्र-यंत्र-तंत्रावर व त्या क्रियेशीं संबद्ध असलेल्या निसर्गांतील वस्तूंच्या स्वभावावर अशीच भिस्त असते. जादूचें वैय्यर्थ्य पटूं लागलें किंवा जाणवूं लागलें म्हणजे धर्म उत्पन्न होतो. निसर्गाच्या अलौकिक शक्ति लहरी स्वभावाच्या आहेत, त्यांना शरण गेलें पाहिजे, त्यांचे मन वळविलें पाहिजे, ही भावना धर्माला जन्म देते. धर्म व जादू यांतील या वैषम्यावर व विज्ञान आणि जादू यांच्या साम्यावर फ्रेझरनें भर देऊन धर्म, जादू व विज्ञान यांतील मानसशास्त्र सांगितलें आहे.

जादू, धर्म व विज्ञान यांचे पौर्वापर्य किंवा साम्यवैषम्य या बाबतींत पंडितांत मतभेद असला, तरी ही गोष्ट निश्चित आहे कीं, यांची बीजें एकत्र सांपडतात. बाबिलोनियांत व भारतवर्षांत वैद्यक, कायदा, जादू व धर्म हे एकाच धंद्यांतून निर्माण झाले. बाबिलोनियांत वैद्यक जादुटोण्याच्या स्वरूपांत पहिल्यांदा होतें, असें इतिहास सांगतो. हिंदुस्थानांतील अथर्ववेदांत सांगितलेले अथर्वे वैद्यक, जादू व पौरोहित्य हीं तिन्हीं कामें करीत. जादू, वैद्यक, [ चिकित्सित ], धार्मिक संस्कार व यज्ञयाग ह्या क्रिया एकत्रित मिसळलेल्या किंबहुना एकजीव असलेल्या स्थितींत अथर्ववेदांत व कौशिक

गृह्यसूत्रांत दिसतात. कायदा' हा सुद्धां हिंदुस्थानांत हजारों वर्षें धर्माचाच भाग होता. त्याचा दैवी क्रियेशीं व पारलौकिक गतीशी संबंध जोडलेला होता. न्यायनिर्णयाचे दिव्य हें एक प्रमाण होतें. न्यायनिर्णयाचा मुख्य अधिकार पुरोहित वर्गाकडे होता.

जादू व धर्म या जोड विषयांचा फ्रेजर नंतर जर्मनींत प्रो. प्रेउस ( Preuss ), इंग्लंडांत डॉ. मॅरेट ( Marett ) व फ्रान्समध्यें ह्युबर्ट एटमॉस (M. M Hubert et mauss ) यांनीं केला. त्यांच्या मतें यातुविद्या ( magic ) व विज्ञान यांत मौलिक विरोध आहे. साम्य जरी असलें तरी तें अगदीं वरवरचें आहे. विज्ञान हें अनुभव व प्रयोग यांतून जन्मतें, त्याच्यावरच अवलंबून असतें, बुद्धिवाद त्याचा निरंतर दिग्दर्शक असतो. निसर्गशक्तींच्या स्पष्ट कल्पनेवर त्याची घडण होत असते व त्याचें अध्ययन करण्याचें द्वार सगळयांना खुलें असतें. यातु विद्येचें सगळेंच याच्या उलट असतें. गूढ भावनेच्या व अंधश्रद्धेच्या वातावरणांत ती जगते. गुप्त रीतीनें शिकविली जाते. अडाणी भोळ्या समजुतीवर तिचें पोषण होतें. निसर्गांत विलक्षण गूढ-विस्मयजनक चमत्कारिक शक्ति आहेत, अशा समजुतीशिवाय तिला अस्तित्वच राहूं शकत नाहीं. तात्पर्य धर्मसंस्थेचें अगदीं प्राथमिक स्वरूप याच दृष्टीनें यातु विद्येला समाजशास्त्रांत स्थान आहे.

डॉ. मॅरेटचा अलौकिक शक्तिवाद ( Supernaturalism )

वर निर्दिष्ट केलेल्या पंडितांनीं सर्व धर्मांच्या मुळाशीं असलेल्या भावनेचा किंवा विचारसरणीचा अर्थ उलगडण्याचा प्रयत्न केला आहे. त्यास ( Supernaturalism ) अलौकिकशक्तिवाद अशी संज्ञा आहे. प्राथमिक संस्कृतींतील जमातींच्या धर्मवि

र्धांचा व भाषांचा त्यांनीं अभ्यास करून वरील तत्त्व निश्चित केलें आहे. निसर्गांतील शक्तींचे मानवावर अनुकूल प्रतिकूल आघात प्रत्याघात होत असतात. अनेक प्रसंग असे असतात कीं, त्यांत भय, विस्मय, चमत्कृति हें विकार उत्पन्न होतात. निसर्गांत विलक्षण गूढ न आकलणारें असें कांहीं तरी आहे, असें सारखें वाटत असतें, जें आपल्या संसाराची विघटना करूं शकतें व त्यास भरभराटही आणतें, असें कांहीं गूढ तत्त्व आहे ही भावना खोल रुजलेली असते. या भावनेच्या पोटीं धर्मसंस्था जन्मास आली. जादू, मंत्र, प्रार्थना, देवता, पवित्र ग्रंथ, सत्पुरुष, तीर्थ, देश व भौतिक व मनुष्याच्या आंत वास करणाऱ्या वस्तू यांची पूज्यता, वंदनीयता, याच भावनेवर सुधारलेल्या व मागासलेल्या धर्मांत अवलंबून असते.

टाबू व माना
( Taboo and Mana )

याच विलक्षण शक्तींना पॅसिफिक द्वीपांत विशेषतः मेलानेशिअन जमातींत माना ( Mana ) असें म्हणतात. हा शब्द मानवजातिशास्त्रांत फार रूढ झाला आहे. प्रो. गिल्बर्ट मरेनें या शब्दाचा थोडक्यांत चांगल्या रीतीनें अर्थ सांगितला आहे. तो म्हणतो 'शक्ति, ओज, आदरणीयता, पूज्यता, पावित्र्य, विस्मयजनकता आणि जादूची करामत असा अर्थ या रानटी जमातीच्या या सुंदर शब्दांत आहे. शूर पुरुष, जमातीचा नायक, वैद्य, लढाईचा तीक्ष्ण परशु, सिंह, उमदा घोडा, औषधी, महानदी, पर्वत, सकस भूमि, मंत्र, जादू, धार्मिक कर्मकांड इत्यादिकांच्या मध्यें ही विलक्षणशक्ति वास करते,

असे ते लोक मानतात. जोपर्यंत या वस्तूंत कार्यक्षमता असते तोपर्यंत त्यांत 'माना' असते. कार्यक्षमता लोपली कीं, माना निघून गेली असें मानतात. गीतेंतील विभूतिवाद, मीमांसकांचा अपूर्ववाद, व वैशेषिकांचा धर्मवाद यांचे बीज या कल्पनेत आहे.

'मानाच्या' उलट 'टाबू' (Taboo) हा एक महत्वाचा शब्द जंगली जमातींच्या संस्कृतिविवेचनांत मानवशास्त्रज्ञ वापरतात. टाबू म्हणजे निषेध किंवा निर्बंध. जादूंत किंवा इतर अनेक धार्मिक आचारांत व व्रतांत अमुक एक पदार्थ खाऊ नये, अमुक पाहू नये, अमक्यास शिवू नये, वगैरे निर्बंध टाबू या सदरांत येतात. टाबू या शब्दाच्या अर्थात, निर्बंधास कारण होणारी त्या त्या पदार्थांची विलक्षण निषेधशक्ति, असाही अर्थ आहे. उदाहरणार्थ कांदा लसूण खाऊ नये, हा निर्बंध कशामुळें उत्पन्न झाला, याचें गमक सांपडत नाहीं. कांदा व लसूण यांत असें कांहीं तत्त्व आहे कीं, त्यामुळें तें खाऊ नये, असा निर्बंध घातला गेला आहे. हें तत्त्व किंवा शक्ति 'टाबू' होय. एस्किमो लोक उत्तरध्रुवाजवळील प्रदेशांत राहातात. बर्फ वितळल्यावर सांबराची शिकार करणें वाईट मानतात व थंडीच्या कडाक्यांत सील माशाची शिकार करणें अयोग्य मानतात. यांस तसें स्पष्ट कारण नाहीं. आई व मुलगा बहिण व भाऊ यांच्यांत झालेला व्यभिचार पुष्कळ अडाणी जातींत सुद्धां फार भयंकर मानतात. त्यांना याचें कारण स्पष्ट सांगतां येत नाहीं. पण टाबूची भीति त्यांना वाटतें. टाबू ही निषेध करणारी वस्तुनिष्ठ शक्ति होय.

पावित्र्य व अपावित्र्य, शकुन व अपशकुन, शुभ व अशुभ लक्षण इत्यादि सुधारलेल्या समाजांतील कल्पनांचे बीज 'टाबू'त सांपडते. माना व टाबू यांचा अर्थ लक्षांत घेतल्यास त्यांत सुधारलेले विधिनिषेध, नीतिशास्त्र ( Moral principles ) व न्याय (justice) या प्रगल्भ वस्तूंचे मूळ आहे, असें कळून येईल. सुधारलेल्या सगळ्या समाजांत व राष्ट्रांत ज्यांची उपपत्ति लावतां येत नाहीं, अशा चालीरीति आढळतात. त्यांचा उगम जंगली स्थितींतील जमातींच्या भ्रांतींत व गैरसमजुतींत सांपडतो. जंगली जमातींच्या विधिनिषेधांचे तत्त्व माना व टाबू या पारिभाषिक शब्दांनीं नीट व्यक्त होतें.

**कुललक्षणपूजावाद किंवा देवकनिष्ठा ( Totemism )**

माना व टाबू यांचा उगम कुललक्षणपूजावादांत किंवा देवकनिष्ठेंत झाला, असें शास्त्रज्ञ सांगतात. वरील दोन कल्पना प्राथमिक अवस्थेंतील मनांत स्वाभाविक व स्वतःसिद्ध नसतात. कुललक्षणपूजावाद ( Totemism ) हें त्यांचें कारण आहे. कुललक्षणपूजावाद मूळ किंवा शुद्ध स्वरूपांत ऑस्ट्रेलियांतील रहिवाशांत सांपडतो. चीन, हिंदुस्थान, इराण, अरबस्थान यूरोप, अमेरिका इत्यादि देशांतील सुधारलेल्या व मागासलेल्या समाजांत कुललक्षणपूजा आढळते. पण ती पाहिजे तशा मौलिक स्वरूपांत शिल्लक नाहीं. नाग, नंदी, अश्वत्थ, वट, शमि, आपटा, तुळस, आवळी वगैरे वस्तूंच्या हिंदुधर्मांतील पूजा मुळांत कुललक्षणपूजेपैकींच होत. त्यांचे विवरण पुढील व्याख्यानांत करावयाचें आहे.

प्राथमिक संस्कृतींच्या सामाजिक संघटनेचा व सामाजिक क्रियांचा अभ्यास करण्यास कुललक्षणपूजापद्धति ( Totemism ) या संस्थेचा अभ्यास करणें अत्यंत अगत्याचे असतें. अनेक लहान लहान गटांची मिळून एक जमात किंवा समाजसंस्था बनते. अवान्तर गट स्वत:स एका रक्ताचा समजतो. एक रक्त समजणारा गट म्हणजे कुल होय. या प्रत्येक कुलाचें एक एक पूज्य प्रतीक असतें. हें प्रतीक स्थावर किंवा जंगम वस्तूपैकीं असतें. तें मुख्यतः वृक्ष, वनस्पति, पक्षी, जलचरप्राणी, पशु व क्वचित् स्थावर जडवस्तु यांपैकीं असते. या पैकीं कोणते तरी एकच निवडलेलें असतें. त्याचेंच नांव त्या कुलाचें नांव असतें. त्या वस्तूंत व आपणांत सजातीयता आहे, अशी भावना त्या त्या कुळांत असते. प्रतीक गरुड, सिंह, नाग, किंवा नारळ असेल तर आपण गरुड, सिंह, नाग, किंवा नारळ यांच्या जातीचें आहोंत असें त्यांना वाटतें. आपलें कूळ त्यांतून उत्पन्न झाले किंवा आपला पूर्वज त्यांतून आला किंवा तोच होय, अशी त्यांची समजूत असते. आपल्या कुळाची संतती वाढावी, त्या पूज्य प्रतीक-पदार्थाची समृद्धि व्हावी व आपल्या कुळाचें संकटापासून संरक्षण व्हावें या भावनेनें त्या पूज्य वस्तूचे अनेक समारंभ किंवा उत्सव तीं कुळें करीत असतात. तें प्रतीक त्या कुळाच्या सगळ्या भावनांचे अधिष्ठान असतें. त्या प्रतीकाच्या साक्षीनें सगळे सामाजिक व धार्मिक विधि चालतात. त्या प्रतीकाच्या जातीची वस्तु, प्राणि किंवा वनस्पति मारावयाची नाही किंवा खावयाची नाहीं, अथवा समारंभानें किंवा विधीनेंच खावयाची किंवा मारावयाची, असा निर्बंध

कसोशीनें पाळला जातो. त्या प्रतीकाच्या संबंधानें पुष्कळच सामाजिक चालीरीति उत्पन्न होतात. सूर्य, चंद्र, नद्या, पर्वत याही वस्तू प्रतीक असूं शकतात. कुलप्रतीकास देवक म्हणतात.

ही कुलप्रतीकोपासना किंवा देवकनिष्ठा ( Totemism ) कशी उत्पन्न झाली. निसर्गांतील वस्तूंची निवड कोणत्या तत्त्वावर प्राथमिक जमाति करितात वगैरे गोष्टींची चर्चा मानवजातिशास्त्रज्ञांनीं विस्तारानें केली आहे. या चर्चेंतून प्राथमिक संस्कृतींतील सामाजिक मानसशास्त्र ( Social Psychology ) निघालें. प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ फ्राईड यानेंहि Totem and Taboo या नांवाचें पुस्तक याच विषयावर लिहिलें आहे.

समुदायश्रद्धावाद, समाजदेवतावाद किंवा सामाजिक भावनावाद ( Cullectivism )

या उपासनेच्या अभ्यासांतून धर्मसंस्थेची ही एक नवी उपपत्ति किंवा तत्त्वज्ञान कांहीं पाश्चात्य विद्वानांनीं निर्माण केलें आहे. सर रॉबर्टसन स्मिथ, प्रो. डुरखिम व डॉ. जेव्हन्स यांच्या मतें धर्म ( Religion ) ही सामाजिक धारणेची संस्था आहे. डुरखीम या फ्रेंच पंडितानें 'धार्मिक जीवनाची प्राथमिक स्वरूपें' ( Elementory forms of religious life ) या ग्रंथांत या संबंधी विवेचन केलें आहे. त्याचें म्हणणें असें, देव म्हणजे प्रत्यक्ष कुल, गण, जमात किंवा समाजच होय, दुसरें तिसरें कांहीं नाहीं. कुलप्रतीकोपासनेच्या सगळ्या विधिविधानांत हेंच तत्त्व प्रत्ययास येतें. सामुदायिक अस्ति-

त्वाची उत्कट संवेदना ( Sublime Social Conscious ) म्हणजेच पवित्र ईश्वरी धार्मिक भावना होय. 'धार्मिक' 'सामाजिक' या दोन कल्पनांत वस्तुत: एकच अर्थ आहे. ईश्वर म्हणजे मनुष्याचे भवितव्य निर्माण करणारी सर्वसमर्थ शक्ति. ही शक्ति वस्तुत: समाजांतच असते. ती म्हणजे समाजाचा आत्मा होय. भक्त देवाचे ठिकाणीं जे गुण आरोपित करतो, ते गुण असले तर समाजांतच असतात. ज्याची आज्ञा मोडली असतां शिक्षा भोगावीच लागते, अशी मनुष्याच्या भोवतीं समाजाशिवाय कोणती वस्तू आहे? ही सगळी वरिष्ठ शक्ति सामाजिक आत्मा होय. न्यायनिवाडा करणारा ईश्वर आहे असें वाटतें पण न्याय म्हणजे काय तें ठरविणारी शक्ति समाजांतच असते. व त्याचा निर्णयही सामाजिक संस्थाच करते. अमरत्वाची आकांक्षा असते, व तें विशिष्ट आचरणानें लाभते, अशी श्रद्धा असते. पण अमरत्व व्यक्तीला लाभणें कधींच शक्य नाहीं. सातत्य, अविच्छेद हे धर्म समाजाला लाभतात. अमरत्व सापेक्षतेनें समाजालाच असतें. विधिनिषेधात्मक धर्मशास्त्र ईश्वरप्रणीत असतें, या कल्पनेला रहस्यमय अर्थ काय आहे? तें समाजप्रणीत असतें, असेंच नव्हे काय ? नाहींतर दुसरें काय असणार ? धार्मिक विधींत सामाजिक भावनांचाच आविष्कार होतो. त्या भावनांच्या आविष्काराकरितांच सामाजिक संकेतानें निर्माण केलेली साधनें म्हणजे धार्मिक कर्मकांड होय.

डुरखीम इत्यादि विचारवंतानी सांगितलेल्या या विचारपद्धतीला पोषक असे विचार महाभारत व स्मृति यांत सांपडतात.

पद्धतशीर पृथक्करण व समन्वय करून सगळें धर्मशास्त्र या दृष्टीनें मांडण्याचा हा प्रयत्न मात्र नवा आहे.

या विचारसरणीला पोषक असा फार मोठा आधार सगळ्याच धर्मसंस्थांमध्यें सांपडतो. यात्रा, तीर्थस्थानें, सण, संस्कार, यज्ञ, मंदिर, भंडारे, उत्सव, भजन, दान, देवता, गुरु, साधुसंत प्रमाणग्रंथ, नीतितत्वें इत्यादि धार्मिक पदार्थ सामाजिकच आहेत. व्यक्ति विशिष्ट संघाची घटक म्हणूनच विशिष्ट धार्मिक आचरण करीत असते. व्यक्तीची कोणतीहि मानसिक किंवा शारीरिक अशी धार्मिक क्रिया व्यक्तीपुरतीच नसते. तिचा देव, मंत्र, तंत्र, व गुरु विशिष्ट समुदायाचा असतो. त्यांत विशिष्ट परंपरा असते. यावरून धर्माचें रहस्य, सामाजिकजीवन, व समाजधारणा होय असा निष्कर्ष वरील पंडितांनीं काढला.

या विचारसरणींत अनेक दोष आहेत. पहिला दोष असा; धार्मिक उपासनेचा व पूजेचा विषय समाज, सामाजिक संस्था, सामाजिक तत्त्व अथवा समाजात्मा ( Social soul ) असतो, हें म्हणणें अग्राह्य आहे. उपासकाच्या कल्पनेचा अर्थ तपासून याचा उलगडा केला पाहिजे. उपासक काय समजतो, काय मानतो, कशाचे ध्यान करतो, कशाची भक्ति करतो, हें तपासावें. त्याचा ईश्वर समाजाहून वेगळा असतो. व्यक्ति किंवा समुदाय ज्याची उपासना करतो, तें स्वतःपेक्षां अगदीं निराळें, विलक्षण गुणधर्माचें, विस्मयजनक व चमत्कारपूर्ण शक्तींचें असें असतें, असेंच व्यक्ति

व समुदाय समजतो. भौतिकसृष्टि व समाज यांच्या पलीकडचे, त्यांचे नियन्त्रण करणारे देव व अद्भुत शक्ति हेच धार्मिक उपासनेचे विषय होत. धार्मिक भावनेचा विषय अलौकिक शक्तीच होय. मग ती शक्ति कल्पित व भ्रांतिमय कां असेना. देवताशास्त्र ( Theology ) हेंच याचें मुख्य प्रमाण होय. देवताशास्त्रांतून सामाजिक अर्थ काढावयास फारच ओढाताण करावी लागेल. दुसरा दोष, धार्मिकता ज्यांत नाहीं अशा अनेक सामाजिक भावना दाखविता येतात. वादविवादाच्या सभा, शिकार, सामुदायिक खेळ, शर्यती यांत सामुदायिक भावना असते, पण ती धार्मिक नसते. तिसरा दोष, एकांतांतील प्रार्थनेंत व उपासनेंत सामाजिक भावनेचा गंधही नसतो. चवथा दोष, सामाजिक आत्मा ( Social Soul ) ही काय चीज डुरखीमनें व जेव्हन्सनें समाजशास्त्रात आणली आहे? समाजशास्त्र हें एक अनुभवनिष्ठ विज्ञान ( Empirical Science ) आहे. त्यांत गूढ तत्त्वास थारा देऊ नये.

**अँड्र्यू लँगचा प्राकृत एकेश्वरवाद ( Primitive Monotheism )**

धर्माच्या उगमासंबंधीं वर मूर्तजीववाद ( Animism ), अलौकिकशक्तिवाद ( Supernaturalism ) व सामाजिकभावनावाद ( Collectivism ) अशा तीन उपपत्ति सांगितल्या. चवथी उपपत्ति अँन्ड्र्यू लँग ( Andrew Lang ) यानें सांगितली. त्याचें म्हणणें असें, एकेश्वरोपासना ( Monotheism ) पहिल्यांदा उत्पन्न झाली. हिंदुस्थान ऑस्ट्रेलिया, आफ्रिका व अमेरिका येथील अनेक प्राथमिक स्थितींतील जमाति एकाच देवाची उपासना करितात.

त्यांनीं त्यांच्या शेजारच्या सुधारलेल्या समाजापासून एकेश्वरोपासना घेतली, असें कोणी म्हणेल पण ज्यांचा सुधारलेल्यांशीं संबंध आला नाहीं, अशा लोकांतही एकच देव सापडतो. अडीच हजार वर्षांपूर्वीच्या सेमाईट ( Semite ) लोकांतील प्रत्येक जातीचा एकच देव असे. हिब्रु लोकांचा पहिला गणदेव ( Tribal God ) यव्हा हा पुढें त्यांच्या धर्माचा मुख्य देव झाला. तोच जगदीश्वर ( Universal God ) झाला. पहिल्यांदा या एकेश्वराचें स्वरूप फारच स्थूल असतें. कांहीं जंगली जमातींत व सुधारलेल्या समाजांत बहुदेवपूजा दिसते हें खरें आहे. पण अनेक जमातींचा संकर झाल्यानंतर देवांचाही संकर होऊन बहुदेवतापूजा ( Polytheism ) त्यांच्यांत रूढ झाली.

जमातीचा व परंपरागत संस्कृतीचा पहिला प्रवर्तक व उत्पादक कोण ? अशी बालसुलभ जिज्ञासा मनुष्यांत स्वाभाविक रीतीनेंच उत्पन्न होते. पहिला प्रवर्तक व जनकपिता कोणीतरी असला पाहिजे असें प्राथमिक लोक कल्पितात. तो आपणापेक्षां बलवान् पराक्रमी व सत्ताधीश असलाच पाहिजे अशी भावना त्याच्याबद्दल होते. त्याच्या शासक शक्तीमुळेंच, आपण परंपरेचें उल्लंघन करीत नाहीं, असें वाटूं लागते. त्याच्याबद्दल भीति वाटते व त्याची भक्ति करावीशी वाटते. तो कल्पित देवच जमातीच्या जीवनाचा भवितव्याचा व देशाचा स्वामी होतो. त्याच्या पितृत्वामुळें जमातींत बंधुभावना रुजते. जमातीवर संकटें त्याच्या शापामुळें येतात व जमातीचें कल्याण त्याच्या कृपेमुळें होतें. सगळ्या सामाजिक संबंधांचा तोच प्रणेता असतो.

अँड्रयू लँगचें हें मत पुष्कळ पंडितांना संमत नाहीं. ‘ अनेक देवांची उपासना ’ अनेक जमातींच्या आपसांतील संकरामुळेंच अस्तित्वांत येते, असें म्हणण्याचें कांहीं कारण नाहीं. अनेक अलौकिक शक्तींची व व्यक्तींची समुचित उपासना करण्याची प्रवृत्ति मनुष्याच्या स्वभावास न जुळणारी आहे असें कांहीं म्हणतां येत नाहीं.

स्पेन्सरचा पितृपूजा–प्राथम्यवाद (Ancestor-cult)

सर हर्बर्ट स्पेन्सरनें धर्मोद्भवाची निराळीच उपपत्ति सांगितली आहे. पितृपूजा ( ancestor-cult ) हा प्राथमिक धर्म होय, असें स्पेन्सरचें म्हणणें आहे. पहिल्यांदा मातृप्रधान किंवा पितृप्रधान कुटुंबसंस्था समाजांत असते. पूर्वजांची त्यांच्या हयातींत कुळांतील सगळ्या व्यक्तींवर सत्ता असते. म्हणून पूर्वजांबद्दल आदर आणि भय या दोन्ही भावना बालपणापासून रुजलेल्या असतात. त्यांना संतुष्ट करण्याचा प्रयत्न मनुष्य नेहमीं करतोच. प्राथमिक समाजांत जमातीचे व उपजमातीचे नायक असतात. त्यांच्याबद्दलही वडिलांप्रमाणेंच भावना असतात. जमातीचा नायक, राजा, नवरा, आईबाप, कुटुंबांतील किंवा कुळांतील वडील माणसें, शूर स्त्रीपुरुष यांचे भय ते मेल्यावरही वाटत असतें. त्यांनीं कांहीं वाईट करू नये म्हणून त्यांना संतुष्ट करण्याकरितां त्यांची पूजा सुरू होते. सगळे सुधारलेले विद्यमान धर्म पितरांच्या पूजेतूनच निर्माण झाले आहेत. सर्वशक्तिमान् एकेश्वराची पूजा पितृपूजेतूनच उद्भवली. ख्रिश्चन धर्मांत देवास पिता म्हणतात. हिंदुधर्मांत मेलेले

प्राचीन राजे व वीर परमेश्वर म्हणून पूजिले जातात. उदाहरणार्थ राम व कृष्ण. मुसलमान ईश्वरावर सार्वभौम राजाचे गुण आरोपित करतात.

ही उपपत्ति अव्याप्ति दोषानें ग्रस्त आहे. वैदिककाळीं निसर्गातील शक्तींची अलौकिक दिव्यशक्ति म्हणून उपासना प्रचलित होती. सूर्य, वरुण, उषस्, अग्नि, मरुत् इत्यादि वैदिक देवतांची उदाहरणें पहावी.

आतां मार्क्सवाद्यांची धर्मोद्भवविषयक उपपत्ति सांगून धर्म-

ऐतिहासिक—
वस्तुविपर्यासवाद

लक्षण या विषयाकडे वळावयाचे आहे. वरील सर्व उपपत्तींचा मार्क्सवादी उपपत्ति समजण्यास चांगलाच उपयोग होईल, म्हणून त्यांची अगोदर मांडणी केली. वर मांडलेल्या धर्मविषयक उपपत्तीशिवाय इतरही पुष्कळ प्रकारच्या उपपत्ति पाश्चात्य विद्वानांनीं सांगितल्या आहेत. पण त्या ऐतिहासिक पद्धति स्वीकारून सांगितल्या नाहींत, तसेंच, जगांतील सुधारलेल्या धर्मानांच लागू पडतील अशा त्या आहेत. हिंदुधर्माचें प्रत्यक्ष विवरण करीत असतां त्यांचा संक्षेपानें प्रसंगत: उल्लेख पुढें करावयाचा आहे.

मार्क्सवाद्यांची धर्मविषयक उपपत्ति ऐतिहासिक भौतिकवादाचाच एक भाग आहे. निसर्ग व समाज यांच्या बद्दलचें सगळें तत्त्वज्ञान ऐतिहासिक भौतिकवाद या एका कल्पनेनें व्यक्त केलें

आहे. मार्क्सनें समाजाच्या रचनेचे दोन भाग सांगितले आहेत. एक भौतिक अधिष्ठान व दुसरा त्या अधिष्ठानावर अवलंबून असलेला अध्यात्मसंस्कृतीचा महाल. या दुसऱ्या भागांत धर्माचा अंतर्भाव होतो.

मार्क्सवाद्यांची धर्मविषयक उपपत्ति अशी आहे–आज धर्माचें स्वरूप पाहिलें तर त्याचा समाजाच्या भौतिक जीवनाशी कांहीं संबंध असेल अशी शंका सुद्धा येत नाहीं. तो भौतिक जीवनापासून अगदी दूर आहे. इतकेंच नव्हे तर अगदी विरुद्ध आहे, असें वरवर पाहिले तर वाटतें. पण धर्म भौतिक जीवनांतच उपजला, ही गोष्ट हिंदुस्थान व युरोप यांच्या प्राचीन धर्मांच्या तुलनात्मक अभ्यासानें सिद्ध होते.

निसर्गशक्ति ( Natural forces ) व सामाजिकशक्ति ( Social forces ) यांचे मानवी अंतःकरणावर उमटलेलें विपर्यस्त भ्रांतिमय प्रतिबिंब म्हणजे धर्म होय[१]. मनुष्याचें जीवन बनविणाऱ्या या दोन शक्ति होत. हेंच जीवनाचें अधिष्ठान, मनुष्याच्या सगळ्या जीवनावर या दोन शक्तींची सत्ता चालते. त्यांचे अंतःकरणावर आघात प्रत्याघात निरंतर चालू असतात. अंतःकरणांतील विकार, विचार, आकांक्षा व भावना या आघात-प्रत्याघातांतूनच उत्पन्न होतात. जोपर्यंत त्या शक्तींचे नियंत्रण मानवी जीवनावर चालतें,

---

१ Anti-Dhuring. pp. 353–55. Ludwig Feuerbach, pp. 65–69.

त्यांच्यावर मानवाची सत्ता चालत नाहीं, आणि त्यांचें स्वरूप, कार्यकारणभाव व व्यापार यांचा नीट उलगडा होत नाहीं, तोपर्यंत त्या शक्तींबद्दल विपरीत भ्रांतिमय कल्पना तयार होतात. पहिल्यांदा नैसर्गिक शक्तींबद्दल विपर्यस्त कल्पना तयार होतात. अनियंत्रित नैसर्गिक शक्तींबद्दलच्या विपर्यासांतून, अलौकिक शक्ति ( Supernatural forces ) विश्वांत भरून आहेत, हा भास तयार होतो. अलौकिक शक्ति म्हणजे भ्रांतिग्रस्त मनानें नैसर्गिक शक्तींचे केलेलें विपर्यस्त रूपांतर होय. याच दैवी, आसुरी किंवा इतर प्रकारच्या अलौकिक शक्ति होत.

निसर्गशक्तींबद्दलचा विपर्यास प्राथमिक स्थितींत पहिल्यांदा होतो. सामाजिक शक्तीबद्दलचा विपर्यास धर्मांत उशिरा, कांहीं प्रमाणांत विकास झाल्यानंतर प्रवेश करतो. इतिहासाच्या प्रारंभी, समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत, शरीरधारणार्थ लागणाऱ्या भौतिक वस्तूंच्या प्रयत्नास सर्वस्वी प्राधान्य असते. म्हणून नैसर्गिक शक्तींकडेच अंतःकरण अधिक खेंचलें जातें. शरीरधारणार्थ त्यांचीच अज्ञानजन्य उपासना प्रथमतः अस्तित्वांत येते. भौतिक शक्तींच्या पराक्रमानें विस्मित झालेलें जंगली मन त्या शक्तींच्या ठिकाणी अज्ञानामुळें दिव्यत्वाचा आरोप करते. अगदीं स्थूल पदार्थ देखील गूढ व चमत्कारपूर्ण वाटतात. त्यामुळें वृक्ष, वनस्पति, पशु, पक्षी, सरीसृप, पाषाण, भूमि, नद्या, पर्जन्य, मेघ, विद्युत्, सूर्य, चन्द्र, समुद्र, वायु, वादळ, आकाश इत्यादि निसर्गपदार्थांची प्राथमिक धर्मांत साधना व आराधना सुरू होतें. यातुक्रिया (Magic) कुललक्षणपूजा (Totemism) व निसर्गपूजा ( Nature-worship ) याचवेळीं सुरू होते.

या अलौकिक शक्तींचा सामाजिक परिस्थितीवर परिणाम घडत असतोच. सामाजांतील पुष्कळशा घटना मागासलेल्या मनाला अगम्य वाटतात, त्यांचे नियंत्रण करणें कठीण असतें, त्यामुळें सामाजिक शक्तींच्या ठायीं अलौकिकत्वाचा आरोप अंतःकरण केल्याशिवाय राहात नाहीं. निसर्गशक्ति हळूं हळूं सामाजिक रूपें धारण करूं लागतात. समाजांतील घडामोडींचे कर्तृत्व त्यांच्यावर लादलें जातें. युद्धांतील जयविजय त्यांच्या इच्छेवर अवलंबून आहेत असें वाटूं लागतें. जमातीला नायक असतो, म्हणून देवही जमातीचा नायक होतो. मातृप्रधान कुटुंबपद्धतींत देवता, माता किंवा देवी बनते. पितृप्रधान पद्धतींत देव, पिता किंवा स्वामी बनतो. निसर्गशक्तींच्या ठायीं व्यक्तित्वाचा आरोप करण्याची प्रवृत्ति अप्रगल्भ मनामध्यें असते. त्याप्रमाणें नदी, पर्जन्य, मेघ यासुद्धां जाणत्या आपल्यासारख्याच अहंभावयुक्त व्यक्ति आहेत, असें असंस्कृत बालमनास वाटतें. त्या त्या जमातींची जी जी परिस्थिति असेल, त्या परिस्थितीप्रमाणें त्यांच्या धार्मिक कल्पना घडविल्या जातात. नेहमींच युद्ध्यमान असणाऱ्या जमातींचा देव सेनापति असतो. पशुपालन स्थितींत शांतताप्रधान जीवन घालविणाऱ्या प्राचीन आभीर लोकांचा देव मुरली धारण करणारा गुराखी मुलगा होता. सामाजिक परिस्थितींची अगणित स्वरूपें असल्यामुळें त्या त्या स्थितीस अनुरूप धार्मिक कल्पनाही अगणित प्रकारच्या आहेत.

मानव्याची अंशतः महती पटल्यानंतर व सामाजिक संस्थांना अधिक महत्व येऊं लागल्यानंतर दैवी शक्तींच्याठायीं मानवीगुणांचा

अतिशयोक्तिपूर्वक आरोप होऊं लागतो. स्थावरजंगम सृष्टींतील रूप-गुणांचे व मानवी गुणांचे एकमेकांत मिश्रण होऊन देवता तयार होतात.

देवही आपल्यासारखेच असतात, ही कल्पनासुद्धा यावयास समाजास संस्कृतीचा बराच प्रवास करावा लागतो. क्षुद्र संस्कृतीचे लोक देवांचे ठायीं पशु, पक्षी, जलचर, स्थावर किंवा जडवस्तु यांच्याच गुणधर्मांचा आरोप करतात किंवा त्यांनाच देव समजतात. हिंदुस्थानांत सुधारलेल्या समाजांतही तसले देव शिल्लक आहेत. जेव्हां मानवी गुणांची श्रेष्ठता पटण्याइतकी मनाची प्रगति झालेली नसते, मन व बुद्धि फारच कोती व अवनत असते, तेव्हांच स्थावर व जंगम देव बनतात. ग्रीक तत्त्ववेत्ता झेनोफनेस (xenophanes) यानें मानवगुणधर्मांचा देवावर आरोप करणाऱ्या धर्मांची थट्टा केली आहे. तो म्हणतो– 'मर्त्य मानव, देवांचे जन्मोत्सव करितात. देवाला आपल्या सारखेच नाक, डोळे, हात, पाय आहेत असें समजतात, देवांचेंहि आपल्यासारखेच कपडेलत्ते व बोलणें चालणें असतें, असें मानतात; खरोखर घोडे, सिंह, बैल किंवा हत्ती यांना चित्र काढतां आलें असतें तर त्यांनीही देवाचें चित्र घोडा, बैल, सिंह किंवा हत्ती अशासारखेंच काढलें असतें.' झेनोफनेसला जुन्या ग्रीकधर्मांतील पशुदेवांची माहिती नव्हती म्हणून त्यानें अशी थट्टा केली. जगांतील इतर मोठमोठ्या धर्मांत अजूनही पशुपूजा शिल्लक आहे, हें जर त्यास माहित असतें तर त्यानें या प्रकारची थट्टा केली नसती. देवाला आत्मवत् मानण्याइतकींसुद्धां प्रगति व्हावयास मनुष्यास फार काळ लागला.

सृष्टींतील व्यापार एकमेकांत गुंतलेले व परस्परावलंबी आहेत, सगळ्या जगांत एकच व्यवस्था आहे, इतकें समजण्याची पात्रता आल्यावर अगणित देवांतून एक सर्वगुणसंपन्न व सर्वशक्तिमान् देव माणसानें निर्माण केला. बाकीचे देव त्या देवांत लुप्त होतात किंवा त्या देवांत समाविष्ट होतात किंवा त्याचे अंश बनतात. किंवा त्या देवापेक्षां कमी ठरून त्यांचे पार्श्वगण बनतात. एकेश्वरवादी विचारसरणी उत्पन्न होण्यास विशिष्ट समाजपरिस्थिति अनुकूल असावी लागते. निरनिराळे समाज किंवा राष्ट्र एकमेकांच्या संस्कृतींची व भौतिक साधनांची देवघेव करूं लागली किंवा एकमेकांच्या संसर्गांत येऊं लागली व त्यांचे व्यवहार एकमेकांत गुंतू लागले, म्हणजे एकदेव जन्माला येतो. सामाजिक परिस्थिति दुबळी असेल, तर इतर देवता टिकाव धरतात, नाहींतर इतर देवतांचा लोप होतो.

अनियंत्रित अशा भौतिक व सामाजिक शक्तींचे अंतःकरणावर जें विपर्यस्त प्रतिबिंब पडतें किंवा विकृत भ्रांतिरूप परिणाम घडतात, त्यांतूनच जगांतील विद्यमान मोठे धर्मही उत्पन्न झाले. उदाहरणार्थ हिंदु, बौद्ध व जैन या धर्मांचा कर्मविपाक हा मूल सिद्धान्त पहावा. व्यक्तीची, समाजाची व विश्वाची जी परिस्थिति असते तीस व्यक्तींचें पूर्वजन्मांतील कर्म कारण असते, असें कर्मविपाकाचें एक तत्त्व आहे. वर्तमान सगळ्या घडामोडी व सुखदुःखें, प्रारब्ध कर्माची फळें होत; संचित, क्रियमाण व प्रारब्ध अशी तीन तऱ्हेची कर्में होत; कर्मविपाकाचा हा गूढ सिद्धान्त समाजांतील परिस्थितीला हिंदुधर्मशास्त्रानें पूर्ण लागू केला आहे. चातुर्वर्ण्य व जातिभेद

ही संस्थाच कर्मविपाकावर उभारलेली आहे. शूद्र व दलित जाति यांनीं आपल्या दास्यांतच समाधान मानिलें पाहिजे, कारण तें प्रारब्ध-कर्माचें फळ आहे; उच्च जातींनीं व वर्णांनीं आपलें वर्चस्व स्वामित्व गाजविलेंच पाहिजे; कारण तें त्यांना पूर्वपुण्याईनें लाभलें आहे असें धर्मशास्त्र सांगतें. आज, समाजांतील सुखदु:खें व व्यक्तींची स्थानें यांची कारणें आजची समाजशास्त्रें उत्तम रीतीनें सांगतात. आज कर्मविपाकाचा सिद्धान्त शुद्ध वेडेपणाचा ठरला आहे; कारण सामाजिक शक्तींचे गूढत्व सामाजिक विज्ञानानेंच नष्ट केलें आहे.

ख्रिश्चन, मुसलमान, पारशी व यहुदी यांचे धर्म एकेश्वर-वादी आहेत. एकेश्वरवाद वर सांगितल्याप्रकारें विपर्यासग्रस्त मनोभूमिकेंतच निर्माण झाला. चालू स्थिती ईशसंकेतानें प्राप्त झाली आहे; या जन्मांत चांगलें वागलें, म्हणजे देव शेवटी, न्यायाच्या दिवशीं, योग्य निर्णय देईल, ही या धर्मांच्या मुळाशीं भावना आहे. आपल्या भवितव्याचें नियंत्रण करणाऱ्या शक्तींचे अगम्यत्व व गूढत्व हाच ईश्वरी संकेताचा पाया आहे.

वर्गविग्रह व अंत:कलह जोपर्यंत समाजांत राहील, तोपर्यंत समाजांत धर्म राहणारच. खाजगीं संपत्तीची संस्था समाजांत अस्तित्वांत जेव्हांपासून आली, तेव्हांपासून धर्मसंस्थेची सूत्रें सत्ताधारी वर्गाकडे गेली व धर्मसंस्थेला सत्ताधारी वर्गानेंच संघटित स्वरूप दिले. समाजांतील परस्पर विरोधी हितसंबंधांचे रक्षण करणें हें कार्य धर्मसंस्थेनें केलें, व समाजांत ज्यांच्या हातीं संपत्तीची साधनें

असतांत, त्यांचे हात बळकट करण्याचे कार्य धर्मानें केलें. संपत्ति व अधिकार यांच्या वैषम्यामुळें उत्पन्न होणारा अंतःकलह धर्मानें वेळोवेळीं दाबून टाकला. वैषम्यमूलक समाजरचना व कायदा यांना पावित्र्य व शाश्वत मूल्य धर्मानेंच दिलें. आर्यांनीं अनार्यांना किंवा शूद्रांना, हिंदूनी अंत्यजांना, ग्रीक रोमन इत्यादि पश्चिमेकडील लोकांनी जित लोकांना, धर्माच्या व ईश्वरी संकेताच्या आधारावर दास्यांत व हीन स्थितींत राखण्याचे प्रयत्न केले.

जोपर्यंत समाजांत मनुष्यांना आपलें भवितव्य निश्चित आखण्याची सोय असणार नाहीं, समाजांत अललेली आर्थिक साधनें पद्धतशीर रीतीनें सगळया समाजाच्या ऐहिक कल्याणार्थच वापरली जातील अशी समाजसत्तेची व्यवस्था ( Plan ) अस्तित्वांत येणार नाहीं, तोपर्यंत धार्मिक मनःस्थिति राहणारच. धार्मिक परिस्थिति हा मानवांचे भवितव्य बनविणाऱ्या पण मानवी बुद्धीच्या व कृतीच्या आटोक्यांत नसलेल्या परिस्थितीचा विपाक होय. आजच्या भांडवलदारी समाजरचनेत देखील खालच्या व वरच्या वर्गांतील व्यक्तींच्या भवितव्यावर अकल्पित व अनिश्चित रीतीनें घाला घालणाऱ्या दुर्दैवाची तरवार लटकत असतेच. आर्थिकमंदी, दिवाळें, तोटा, कर्ज, बेकारी व इतर आर्थिक संकटें यांचा धाक सगळ्यांनाच कायमचा असतो. पुनः जागतिक महायुद्धाचें भय हें निराळेंच. समाजवादी पद्धतीनें समाजाची पुनर्घटना केल्याशिवाय म्हणजे क्रांतीशिवाय सामाजिक बेबंदशाही व दुरवस्था यांचा कायमचा निकाल लागणार नाहीं. एकदां का क्रांति झाली म्हणजे धार्मिक मनस्थितीच

शिल्लक राहणार नाही. कारण धार्मिक मनस्थिति ही व्यक्तीच्या जीवितावर गूढ रीतीनें सत्ता चालविणाऱ्या सामाजिक शक्तीचे विकृत प्रतिबिंब होय. समाजवादी क्रांतीनंतरच्या स्थितींत बिंबच नाहीं तर प्रतिबिंब कोठून रहाणार?

यावर असा आक्षेप येणें शक्य आहे कीं, ज्यांच्यावर मनुष्यांचें नियंत्रण चालत नाहीं, अशा शक्ति थोड्याबहुत नेहमींच राहणार. कारण विश्वाचें संपूर्ण ज्ञान मनुष्यास होऊं शकत नाहीं. विश्व हें अनंत आहे. त्यावर उत्तर असें आहे. विज्ञानाच्या योगानें निसर्गांतील व समाजांतील पुष्कळ शक्तींचा वास्तविक अर्थ आज कळला आहे. त्यांत अपुरेपणा आहे, पण धर्म ज्या तऱ्हेचा विकृत व विपर्यस्त कल्पनांतून उत्पन्न होतो, त्या तऱ्हेच्या कल्पना करण्यास आतां जागा राहिली नाहीं. जीवनावर नियंत्रण करणाऱ्या सामाजिक शक्तींचे तर गूढ पूर्ण उकललें आहे. त्याप्रमाणें अंमलबजावणी केल्यास धार्मिक मनोभावनाच उत्पन्न होणार नाही व धर्मापेक्षां श्रेष्ठ भावना व धर्मापेक्षां उच्च दर्जाची मानसिक संस्कृति समाजांत अवतरेल!!

---

व्याख्यान दुसरें

# धर्मलक्षण व धर्मप्रमाण

## ( १ ) धर्मलक्षण

आतांपर्यंत ऐतिहासिक धर्मसमीक्षेची सामान्य तत्त्वें व धर्मोत्पत्तिविषयक अनेक मतें यांचा उहापोह केला. ऐतिहासिक पद्धतीशीं जुळणाऱ्या मतांचाच तेवढा वर परामर्श घेतला आहे. भाववादी–अध्यात्मवादी ( idealistic ) उपपत्तींचा परामर्श धर्मप्रमाणपरीक्षेंत घ्यावयाचा आहे. धर्माची व्याख्या ठरविण्यास वरील उपपत्तींचा पुष्कळ उपयोग आहे, म्हणून त्यांची वर मांडणी केली. भारतीय आचार्यांनीं धर्माच्या ज्या व्याख्या केल्या आहेत त्यांचा उहापोह आतां करावयाचा आहे.

धर्माच्या व्याख्या व धर्ममूलभूत कल्पना यांची समीक्षा करण्याची भारतीय प्रथा फार प्राचीन आहे. इतर संस्कृतीत धर्मसमीक्षेचा उदय भारतापेक्षां उशिरा झाला. याचें कारण धर्मविकास जगांतील कोणत्याही संस्कृतींच्या अगोदर भारतांत झाला. पहिला विश्वधर्म ( Universal religion ) जो बौद्धधर्म, तो येथेंच प्रथमतः उदयास आला. विश्वधर्म ही धर्मसंस्थेची आत्यंतिक परिणति आहे. या परिणतिनंतर धर्मात अनेक सुधारणा होतात; पण त्याचें मौलिक स्वरूप कायम राहतें. विश्वधर्मोत्पत्तिनंतर धर्माचें मौलिक परिवर्तन

संभवत नाहीं. जर धर्मात त्यानंतर मौलिक परिवर्तन झालें, तर धर्माचें धर्मत्वच नष्ट होतें. विश्वाकडे व जीवनाकडे पाहण्याचा विज्ञानशुद्ध दृष्टिकोन म्हणजेच विश्वधर्माच्या पुढील प्रगतीची पायरी. या पायरीवर आल्यावर धर्मसंस्थेचें मूळच नष्ट होतें. कारण धर्मसंस्थेचें मूळ दिव्यदृष्टि ( Super-natural form of thought ) होय. विज्ञानाशीं याचा विरोध आहे.

हिंदुस्थानांत बौद्धधर्माच्या उदयानंतर जी धर्मसमीक्षा ( Criticism of Religion ) उदयास आली, तिचा हेतु धर्माच्या मूलभूत तत्त्वांची चिकित्सा करणें हा होता. दर्शनशास्त्रें धार्मिक गूढ तत्त्वांची छाननी करितात. छाननी सुरू झाली म्हणजे तीं तत्त्वें डळमळूं लागतात. इन्द्रधनुष्य हातीं लागत नाहीं, जवळ जाण्याचा प्रयत्न केल्यास दूर जातें किंवा लुप्त होतें, तसेंच गूढ तत्त्वांचें आहे. ही छाननी भारतीयांनीं सगळ्यांच्या अगोदर सुरू केली.

धर्माचें लक्षण म्हणजे धर्माची व्याख्या. धर्मलक्षणाची चर्चा धर्मशास्त्रांत व महाभारतात केली आहे. धर्मसूत्रें बुद्धपूर्वकालीन असण्याचा संभव आहे. वैशेषिक दर्शनाशिवाय इतर दार्शनिक सूत्रें, मन्वादि स्मृति व महाभारताचा बराचसा भाग बुद्धोत्तरकालीन आहे. या वाङ्मयांतील धर्मचर्चा आपणास तपासावयाची आहे. त्याच्या अगोदर धर्माचें सामान्य व विशेष लक्षण कथन करून मग उपरिनिर्दिष्ट ग्रंथांतील धर्मलक्षणें तपासावयाची आहेत.

**धर्माचें सामान्य लक्षण**

अलौकिक शक्तीच्या कल्पनेवर आधारलेलें व श्रेयस्कर मानलेलें मानवी आचरण म्हणजे धर्म होय. कांही धर्मसंस्था एकच अलौकिक शक्तीची कल्पना करतात व कांहीं अनेकांची करतात. हें धार्मिक आचरण वैयक्तिक किंवा सामुदायिक असें दोन्हीं तऱ्हेचें असतें. तसेंच हें आचरण म्हणजे शारीरिक किंवा मानसिक अशी दोन्ही तऱ्हेची क्रिया होय. श्रेयस् म्हणजे व्यक्तीचें, वर्गाचें किंवा समाजाचें हित होय. हें हित अलौकिक शक्तींच्या साहाय्यानें प्राप्त होतें, ही कल्पना सर्व धार्मिक आचरणाच्या मुळाशीं असते.

विष्णूची किंवा शिवाची कल्पना म्हणजे अलौकिक शक्तींची कल्पना. शिवविष्णुविषयक प्रीति, भय, आनंद, नम्रता, शरणागति, विरहवेदना, दर्शनाची किंवा कृपेची उत्कंठा ह्या मानसिक क्रिया होत. मंदिर बांधणें, स्तोत्र रचणें, पूजन, यात्रा, भजन, वंदन, नर्तन इत्यादि शारीरिक क्रिया होत. या क्रियांनी जीवाला श्रेयस् व सद्‌गति प्राप्त होते अशी कर्त्याची भावना असते.

सत्य, परोपकार, अहिंसा इत्यादि नैतिक आचरण सुधारलेल्या धर्मांच्या दृष्टीनें धर्माचा गाभा आहे. पण त्यांत सुद्धां नैतिक मूल्यांच्या मुळाशीं ईश्वरी संकेत, आत्मप्रसाद किंवा अदृष्टकर्मविषयक सिद्धांत गृहीत धरलेला असतोच. ईश्वर, आत्मा किंवा अदृष्ट या अलौकिक शक्तीच होत. विद्यमान सगळ्या धर्मसंस्था नीतीची स्थापना अलौकिक शक्तींच्या अधिष्ठानावरच करितात. आणि नीतीचा

संबंध पारलौकिक जीवनाशीं जोडतात. हिंदुधर्मात नीति ही चित्त-शुद्धिद्वारा मोक्षाचें कारण मानलें आहे.

वेदांतील यज्ञधर्माच्या मुळाशीं इन्द्र, वरुण, प्रजापति, पूषन्, विष्णु इत्यादि दैवी शक्तींची कल्पना आहे. स्मृतींतील वर्णाश्रम-धर्माचा समाजधारणेशीं प्रत्यक्ष संबंध आहे. त्यांतील भाग वैयक्तिक किंवा सामाजिक जीवनाचे कायदे ( law ) सांगतो. परंतु हे सगळे स्मार्तधर्म पारलौकिक कल्पनांनी अवगुंठित आहेत. वर्णाश्रमधर्माचा मरणोत्तर होणारा कर्मविपाक स्मृति सांगतात. केवळ लक्षणेनें, अलंकारिक अर्थानें किंवा अर्थवाददृष्टीनें पारलौकिक कल्पनांचे अधिष्ठान तेथें वर्णिलेलें नाहीं. वर्णाश्रमधर्मातील संस्कार-विधि म्हणजे व्यावहारिक लौकिक क्रिया नव्हेत. देवता, मंत्र, होम, जप या गोष्टी संस्कारांत आवश्यक म्हणून अंतर्भूत होतात. स्मृतींनी धर्माचा इहपराशी संबंध स्पष्ट रीतीनें सांगितला आहे. स्मृतीतील जन्मसिद्ध चातुर्वर्ण्याचें समर्थन ईश्वर व कर्मविपाक या दोन तत्त्वावर आधारलेलें आहे. 'उभौ लोकौ अभिजयति' (आपस्तम्ब धर्मसूत्र २।२९।१५) वर्णाश्रम धर्मानें दोन्ही लोक जिंकता येतात, अशी धर्मशास्त्राची फलश्रुति आहे. हिदु, जैन व बौद्ध यांचे धर्म पुनर्जन्माचा सिद्धांत मानून प्रवृत्त झाले आहेत. यहुदी, ख्रिश्चन, पारशी, मुसलमान यांचे धर्म ईश्वर-कल्पनेवर व स्वर्गनरकावर भर देतात. श्रुति स्मृति व पुराणें यांचे कोणतेंही धर्मानुशासन शाश्वत आत्मा व अदृष्ट पापपुण्य या दोन अलौकिक तत्त्वांस प्राधान्य देतें.

वरील धर्मलक्षण सुधारलेल्या व मागासलेल्या सगळ्या सामाजिक स्थितींतील धर्मसंस्थांना व्यापणारें आहे. प्राथमिक (Primitive)

स्थितीतील धर्माला सुद्धा हें लक्षण लागू पडतें, म्हणून यास सामान्य धर्मलक्षण असें म्हटलें आहे.

अलौकिक म्हणजे काय? याचा थोडक्यांत उलगडा असा आहे. लौकिक म्हणजे सर्वसाधारण असलेल्या प्रत्यक्षानें व अनुमानानें सिद्ध होणारी वस्तू. अनुभव व प्रयोग यांच्यायोगे व इन्द्रियांच्या साहाय्याने ज्यांचे गुणधर्म अवगत व निश्चित करून घेतां येतात, त्या लौकिक वस्तू होत. तर्कशास्त्राच्या नियमांच्या आधारानें बुद्धिद्वारा, किंवा अनुभवानें व प्रयोगानें, ज्या वस्तूंची तपासणी करितां येत नाहीं, अशा वस्तु अलौकिक होत. मृत्यूनंतरही राहणारा अमर आत्मा, देवता, जगत्कारण ईश्वर, निर्गुण किंवा पूर्ण ब्रम्ह, कर्मजन्य अपूर्व, मंत्रसामर्थ्य, स्वर्ग, नरक व मोक्ष या धर्मशास्त्रोक्त वस्तू बुद्धिगम्य नाहींत म्हणजे पदार्थविज्ञान, इन्द्रियविज्ञान, रसायन, ज्योतिष, गणित इत्यादि विज्ञानांतील वस्तूंच्या अवगतीकरितां जी बौद्धिक पद्धति वापरावी लागते, तिचा या अलौकिक वस्तूंच्या अवगतीला कांहीं उपयोग होत नाही. शंकराचार्य व कुमारिलभट्ट यांनी या मुद्याचे उत्तम समर्थन आपल्या ग्रंथांत केलें आहे. सामाजिक शास्त्रांत ज्या तऱ्हेची बौद्धिक पद्धति स्वीकारलेली असते त्याचाही या तत्त्वाशी कांही संबंध पोचत नाहीं. म्हणूनच या वस्तूस अलौकिक असें म्हटलें आहे. कांही तत्त्ववेत्ते वरील वस्तूंची बौद्धिक सिद्धि करण्याचा प्रयत्न करतात. पण त्यांचा तो खटाटोप व्यर्थ असतो. दिव्यदृष्टीचे ऋषि, त्रिकालज्ञ महात्मे, योगी, ईश्वर-प्रेषित, अवतार हेच या वस्तूंच्या बाबतींत प्रमाण होत. या वस्तूंची

अचिन्त्यता, विलक्षणता, व चमत्कृतिपूर्णता सगळ्या धर्मग्रंथांनी वर्णिलेली आहे. या विषयाचा सविस्तर विचार धर्मप्रमाण या सदरांत करावयाचा आहे.

वरील सामान्य धर्मलक्षणावरून सुधारलेल्या समाजांच्या धर्माचें वैशिष्ट्य अवगत करून घेतां येत नाही. त्याकरितां सुधारलेल्या धर्मांचें विशेष लक्षण शोधलें पाहिजे. उच्च धर्मांच्या ऐतिहासिक कार्यांचा अर्थ समजण्यास हें सामान्य लक्षण अपुरें पडतें.

धर्मांचें विशेष लक्षण

सगळ्या विश्वाच्या घडामोडींच्या मुळाशीं गृहीत धरलेल्या अलौकिक शक्तींच्या कल्पनेवर आधारलेलें श्रेयस्कर मानलेलें मानवीय आचरण म्हणजे धर्म होय, अशी सुधारलेल्या धर्मांची व्याख्या आहे.

प्राथमिक समाजांच्या ( Primitive Societies ) धर्मांत विश्वव्यापक तत्त्वाची कल्पना नसतें. प्राथमिक मनुष्याचें मन दैनंदिन योगक्षेमाच्या विवंचनेतच गढलेलें असतें. त्यामुळें त्या मनास विश्वाचा विचार करण्यास अवसर नसतो, व तितकी योग्यताही नसते. त्या मनानें निर्मिलेला धर्म त्याच्या व्यावहारिक गरजांपुरतांच मर्यादित असतो. प्रगल्भ समाजसंस्थेत विश्वाचा व जीवनाचा विचार करण्यास मन सुरवात करतें. जीव व जगत् यांचा संबंध शोधून त्यावर आधारलेला धर्म सुधारलेल्या समाजांतच निर्माण होतो. जीवनांतील भौतिक गरजा भागविणाऱ्या वस्तू उत्पन्न करण्याचे कार्य करण्याची

जबाबदारी ज्यांच्यावर नसते, असे वर्ग सुधारलेल्या समाजांत उत्पन्न होतात. त्याच वर्गांत व्यापक विचार उत्पन्न करणारें मन निर्माण होतें; कारण त्या समाजांत दास व दाससम वर्गच भौतिक पदार्थांची निर्मिति करण्याकरितां राबविले जातात. सत्ताधारी वर्ग भौतिक उत्पादनाची कला उत्पन्न झाल्यावरच निर्माण होतात; कारण त्यावेळीच सगळ्या समाजघटकांच्या शारीरश्रमाची गरज समाजाच्या निर्वाहास लागत नाही. योगक्षेमार्थ कराव्या लागणाऱ्या शारीरिक मेहनतीतून मुक्त झालेला वर्ग उच्च धर्मसंस्था निर्माण करतो. त्या धर्मास लागणारें विश्वविषयक तत्त्वज्ञान निर्माण करण्याची फुरसत त्यालाच लाभलेली असते. हिंदु, बौद्ध, जैन, चिनी, पारशी, ज्यू, ख्रिश्चन, मुसलमान इत्यादि सुधारलेल्या समाजांचे धर्म विश्वतत्त्वज्ञानावर आधारलेले आहेत, व त्यांची निर्मिति सत्ताधारी वरिष्ठ वर्गानेंच केलेली आहे.

हे सगळे सुधारलेले धर्म, विश्व हें एक नैतिक राज्य आहे, व धर्म हा त्या नैतिक राज्याचा कायदा होय, असें मानतात. बौद्ध व जैन ईश्वर मानीत नाहीत पण विश्वाच्या मुळाशी असलेला सुकृतदुष्कृतांचा अदृष्ट कायदा हिंदुधर्माप्रमाणेंच मानतात. कर्मविपाकवादांतील कर्म म्हणजे दृश्य मानवी आचरण नव्हे, तर मानवी आचरणाचा अदृष्ट परिणाम होय. त्यासच अपूर्व किंवा अदृष्ट असें पूर्वमीमांसक म्हणतात. जगांतील सगळ्या घटना या अदृष्ट कर्मशक्तींचा परिपाक होय, असा कर्मविपाकाचा सिद्धान्त आहे.

या जन्मांतील शरीर, बुद्धि, मन, कुल, धन, जाति इत्यादि पूर्वजन्मांतील कर्मांचें फळ होय, असें कर्मवाद सांगतो. या सिद्धान्ताचें मूळ वेदांत व उपनिषदांत सांपडतें. पर्जन्य, शत्रुनाश, रोगनिवारण, दीर्घायुष्य, मरणोत्तर देवलोक किंवा पितृलोक यांची प्राप्ति ही यज्ञाचीं प्रयोजनें होत, असें वेद सांगतो. यज्ञसामर्थ्य म्हणजेच अदृष्ट, अपूर्व, सुकृत किंवा पुण्य होय. हा यज्ञ म्हणजे व्यावहारिक क्रिया नसून होम–हवनादिरूप धार्मिक क्रिया होय. याच वेदोक्त कर्मवादाची व अपूर्ववादाची मांडणी पूर्वमीमांसेने केली आहे. कर्मवाद किंवा दैववाद पूर्वमीमांसकांनीं स्वतःच्या कल्पनेनें निराधार असा काढला नाही. वेदांचाच तो खरा मथितार्थ आहे. कर्मसिद्धान्त व तन्मूलक पुनर्जन्मवाद हा हिंदुधर्माचा आत्मा होय. कर्मविपाक सिद्धान्त न मानल्यास हिंदुधर्म शिल्लक राहात नाही. वेदांतील यज्ञ, स्मृतींतील वर्णाश्रमधर्म, विशेषतः संस्कार व प्रायश्चित्त, पुराणांतील व्रतें व यात्रा, आगमतंत्रांतील उपासना या सर्वांचें अधिष्ठान अपूर्ववादच आहे. पूर्वमीमांसकांनीं सांगितलेल्या अपूर्ववादाशिवाय वरील धर्मग्रंथांतील विधिनिषेध निरर्थक ठरतात. मन्वादिस्मृति, महाभारत व भगवद्गीता यांतील नीतिशास्त्र कर्मविपाकसिद्धान्तावरच अवलंबून आहे.

जगांतील इतर धर्मसंस्था ईश्वरवादी आहेत. ईश्वरसंकेताने सगळें विश्व व मानवजीवन चाललें आहे, असें ते मानतात. धर्म वा अधर्म म्हणजे ईश्वरी संकेत होय, असें ख्रिश्चन, पारशी, ज्यू व मुसलमान मानतात. ब्रह्मसूत्रांतील[1] धार्मिक विचार ईश्वर–संकेतालाच महत्त्व देतात.

(१) फलमत उपपत्तेः । ब्रह्मसूत्र ३।२।३८.

आचार्यांची धर्मलक्षणें

आतां हिंदुधर्मशास्त्रांतील धर्मलक्षणांचा परामर्श घेऊ. जैमिनी, व्यास व कणाद यांची धर्मलक्षणें अत्यंत सुप्रसिद्ध आहेत. आपस्तंब, वसिष्ठ, बोधायन इत्यादि स्मृतिकारांनींहि धर्मलक्षणें सांगितली आहेत, पण तीं जैमिनी, व्यास व कणाद यांच्या धर्मलक्षणांची पूरक आहेत. जैमिनीने पूर्वमीमांसेंत, व्यासाने महाभारतांत व कणादाने वैशेषिक दर्शनांत धर्मव्याख्या सांगितल्या आहेत. त्यांचा क्रमाने विचार करूं.

जैमिनीचें धर्मलक्षण

" चोदनालक्षणोऽर्थो धर्मः " हें जैमिनीचें लक्षण होय. " उपदेशानें, आज्ञेनें किंवा विधीनें ज्ञात होणारी श्रेयस्कर क्रिया [ अर्थ ] म्हणजे धर्म होय. " चोदना म्हणजे उपदेश, आज्ञा, विधि, प्रेरणा. चोदना शब्दाचा प्रेरणा हा धात्वर्थ होय. ही प्रेरणा दोन तऱ्हेची[1] असते. शाब्दी भावना व आर्थी भावना. कुमारिलभट्टानें तंत्रवार्तिकांत ( २।१।१ ) या प्रेरणेचें व्यवस्थित विवेचन केले आहे. शाब्दी भावना म्हणजे शब्दाच्या पाठीशी असणारी आज्ञापक शक्ति. अमुक एक क्रिया तूं किंवा तुम्ही केलीच पाहिजे, किंवा करतां कामा नये, असें कोणी-तरी लौकिक किंवा अलौकिक वाणी सांगत असते. आपणापेक्षां श्रेष्ठ अशी ती वाणी असते. ती वाणी अनिष्ट निवारणाचें व

---

(१) तेन भूतिषु कर्तृत्वं प्रतिपन्नस्य वस्तुनः। प्रयोजकक्रियामाहुर्भावनां भावनाविदः ॥
अभिधा भावनामाहुरन्यामेव लिङादयः। अर्थात्मभावना त्वन्या सर्वाख्यातेषु गम्यते ॥
तंत्रवार्तिक २।१।१

श्रेय:प्राप्तीचें आश्वासन देत असते; आणि आज्ञाभंग झाल्यास दण्ड-भयही दाखविते. पूर्वमीमांसकांच्या मतें धर्माची आज्ञापक वाणी वेदच होत. ते वेद शाश्वत व अनादि आहेत. ते कोणी केलेले नाहीत. त्यांचा कर्ता मनुष्य देव इत्यादि कोणीहि नाहीं, ते स्वयंभू आहेत. ईश्वरवादी तत्त्ववेत्ते ही धर्मोपदेश करणारी वाणी ईश्वराची असते असें मानतात व ईश्वर हीच ती आज्ञापक शक्ति होय असें मानतात. कांहीं धार्मिक संप्रदाय, योगसामर्थ्यानें संपन्न असे ऋषि मुनि हेच धर्मोपदेशाचे मुख्य प्रणेते होत, असें मानतात. पूर्वमीमांसकांच्या मतें वेदशब्दांच्या ठिकाणीच ही आज्ञा-पक शक्ति म्हणजे शाब्दी भावना आहे.

आर्थी भावना म्हणजे मी अमुक क्रिया केलीच पाहिजे कारण त्यांत माझें श्रेय आहे अशा भावनेनें उत्पन्न होणारी प्रवृत्ति. कर्तव्योन्मुखता म्हणजेच आर्थी भावना. धार्मिक पुरुषांच्या ठिकाणीं जी भावना असते, त्यास धर्मसंबंधीं आर्थी भावना, असें म्हणतां येईल.

जैमिनीची धर्मव्याख्या जगांतील सर्व धर्मांस नीटपणें लागू पडते. झरतुष्ट्र, मोझेस्, कनफ्यूशस्, येशू ख्रिस्त, किंवा महंमद यांना ईश्वरसंकेताचा साक्षात्कार ( Revelation ) झाला, आणि त्या-प्रमाणें त्यांनीं उपदेश दिला, अशी त्या त्या धर्मसंस्थांची दृढ श्रद्धा आहे. हा दैवी उपदेश ( Divine inspiration ) म्हणजेच चोदना होय.

श्रेयस्कर आचरण कोणतें हें ठरविण्याचें काम मानवबुद्धीचें नसून तें केवळ या दिव्य अलौकिक शक्तींचेंच आहे असें सर्व धर्म म्हणतात. जैमिनीच्या मतें वेदानेंच श्रेयस्करता सिद्ध होते. श्रेयस् म्हणजे इष्ट. या जन्मांतील व परलोकांतील इष्टांची प्राप्ति व अनिष्टांचा परिहार हेंच श्रेयस् होय. धर्मानें या जीवनांत इष्टसिद्धि झाली नाहीं, तर परलोकीं तरी खात्रीनें कल्याण होईल, असें आश्वासन धार्मिक ग्रंथ देतात.

व्यासाची धर्ममीमांसा व जैमिनीचें धर्मलक्षण

व्यासाचें धर्मलक्षण जैमिनीच्या धर्मलक्षणापेक्षां अगदी निराळ्या भूमिकेवरून निर्माण झालेलें दिसतें. जैमिनीच्या धर्मविचारांत शब्दप्रामाण्य परमावधीला गेलेलें आहे. व्यासानें शब्दप्रामाण्याला कित्येक वेळां महत्त्वच दिलें नाहीं. "श्रुतिधर्म इति ह्येके नेत्याहुरपरे जनाः। नच तत्प्रत्यसूयामः नहि सर्वं विधीयते॥" [ भारत शान्तिपर्व १०९।१३ ] "कोणी म्हणतात श्रुतीतच धर्म सांगितला आहे, कोणी म्हणतात नाहीं. या बाबतींत आम्हांस पक्षाभिनिवेश नाहीं. कारण सगळेंच कांही श्रुतींत सांगणें शक्य नसतें."

महाभारतांतील शांतिपर्वांत सांगितलेली धर्ममीमांसा ही बुद्धिवादी आहे, असें दिसतें. श्रौतस्मार्त परंपरेवर विश्वास कमी होऊन, नवे धर्मविचार उदयास येण्याच्या काळीं हे विचार प्रकट झालेले दिसतात. वैदिक पशुयागांचे निंद्यत्व, एकेश्वरभक्ति, व वर्णव्यवस्थेचें

(१) भारत शांति. अ. १४१, १४२, २४२.

अस्थिरत्व शांतिपर्वांत प्रतिपादिलें आहे. राज्यसंस्था व वर्णव्यवस्था यांची बुद्धिवादी उपपत्ति सांगितली आहे. सामाजिक दुरवस्था व वर्णव्यवस्था यांचा संबंध राज्यव्यवस्थेशी जोडलेला आहे. नैतिक तत्त्वांची श्रद्धामूलक धार्मिक आचारांच्या पेक्षां श्रेष्ठता प्रतिपादिली आहे. नैतिक तत्त्वें हीं सर्व धर्मांचा आधार[1] होय, असें वारंवार उपदेशिलें आहे. सर्व मानवांना परमार्थ साधनांचा सारखाच अधिकार आहे व सर्वभूतहितें हेंच सर्व धर्मांचे सार आहे, असे अनेक वेळां घोषित केलें आहे. धर्मनिर्णयाचें प्रमाण केवळ वैदिक शब्दच नव्हे तर सर्वांच्या हिताचा विचार करणाऱ्या साधूंचे विचार आणि मानवबुद्धि होय, असा उदार विचार शांतिपर्वांत आला आहे.

उत्तरहिंदुस्थानांतील नवधर्मोदयाच्या आंदोलनाचे हे पडसाद होत. दिल्लीजवळच्या प्रदेशांत म्हणजे आर्यावर्तांत एकेश्वरवादी नारायणीय धर्म विकास पावत होता व दुसऱ्या बाजूस बिहारकडे नीतितत्त्वांना सार्वभौम वरिष्ठत्व देणारे बौद्ध व जैन धर्म उदयाचलावर येत होते. याच काळांतील हे विचार होत. त्यामुळें व्यासांचे धर्मलक्षण हें धार्मिक विचारांच्या कळसास पोहोचलें. तेथें पारलौकिक कल्पनांना उतरती कळा लागली, व वास्तविक जीवनाला महत्व देणारी विचारप्रणाली उद्भूत झाली. तीस परिपक्वता मात्र मुळींच आली नाहीं, त्या विचारसरणीचा सांगोपांग विचार झाला नाहीं, ती मध्येंच खुरटली. बुद्धिवादी वस्तुनिष्ठ विचारांना महाभारतांत नुसता अंकुर

---

(१) भारत शांति. २५९, अनुशासन. १६२, २३.

(२) ,, ,, २६२, ३५.

फुटला आहे. पण त्याला प्रगल्भता मुळींच आली नाहीं; कारण स्वर्ग, नरक, देवता, कर्मविपाक इत्यादि पारलौकिक कल्पनांच्या बंधनांतून महाभारतीय विचार मुळींच मुक्त झाले नाहींत. हें महाभारतातील शांतिपर्वांत व अनुशासनपर्वांत शेकडों उदाहरणांनीं दाखवितां येतें.

व्यासाचें धर्मलक्षण

"धारणाद्धर्म इत्याहुः धर्मेण विधृताः प्रजाः। यः स्याद्धारण-संयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥" (भारत-शांतिपर्व १०९।११) "धारण करतो म्हणून धर्म असें म्हणतात. कारण धर्मानेंच प्रजेचें धारण होतें; म्हणून जो धारणसंयुक्त असतो तोच धर्म, असा सिद्धांत आहे." अहिंसा व प्रभव [ विस्तार वाढ सामर्थ्य ] ही धर्माचीं लक्षणें लगेच पुढील श्लोकांत सांगितली आहेत. या जगांत लोकयात्रा म्हणजे लोकव्यवहार नीट चालविणें हेंच धर्माचें खरें प्रयोजन होय, असें व्यासानें पुनः एकदां सांगितलें आहे. "लोकयात्रार्थमेवेह धर्मस्य नियमः कृतः[1]" या जगांत लोकव्यवहार नीट चालावे म्हणूनच धर्माचा नियम केला आहे" या व्यासाच्या विचारावर अर्थशास्त्रज्ञ[2] बृहस्पतीच्या व उशनाच्या विचारांची छाप पडलेली दिसते. कौटिलीय अर्थशास्त्रांत विद्यांची परिगणना करण्याचे प्रसंगी धर्मविद्या (त्रयी) बृहस्पतीनें स्वतंत्र कां परिगणित केली नाहीं, याचें कारण असें

---

(१) शांति २५९।४; लोकव्यवहारस्थापनं धर्मशास्त्रस्य विषयः। न्यायभाष्य ४।१।६२

(२) शांति. १४२; ३३५।४५–४९

सांगितलें आहे कीं, लोकयात्रेच्या तत्त्वज्ञानाचा विचार करणाऱ्यांच्या दृष्टीनें धार्मिक आचार म्हणजे लोकांना सन्मार्गाला[1] लावण्याची युक्ति होय, त्यांत पारलौकिक तथ्य कांहीं नाहीं. व्यास या ठिकाणी आणखी असें सांगतो कीं, समाजधारक कर्मांनेंच सिद्धि प्राप्त होते.

व्यासाच्या विचारांची बुद्धिवादी भूमिका

शांतिपर्वातील हे धर्मविषयक विचार असे सूचित करतात कीं, त्यावेळीं धर्ममीमांसा ही समाजधारणा-शास्त्र बनण्याच्या मार्गास लागली होती. हें भारतांतील पुढील महत्वाच्या मुद्यांवरून निश्चित करतां येतें. ( १ ) राज्यसंस्थेचा विचार कर-णारीं अर्थशास्त्रें हीं धर्मनिर्णयाचें महत्वाचें साधन म्हणून भारतकार निर्दिष्ट करतात,[2] ( २ ) भारतकार म्हणतात, धर्म केवळ आगमानें संपूर्ण अवगत होत नाहीं,[3] ( ३ ) आगम म्हणजे ऋषींनीं गोळा केलेले अनेक लोकांचे विचारच होत,[3] ( ४ ) आगमांना आपद्धर्मांचें संपूर्ण परिगणन करतां येणें शक्य नाहीं,[4] ( ५ ) युगभेदाने धर्मपरिव-र्तन होते, उ० वर्णसंस्था व वर्णधर्म हे शाश्वत नसून ते एका विशिष्ट कालींच समाजांत अस्तित्वांत आले आहेत, पूर्वी एकदां चातुर्वर्ण्य नव्हते व एकच वर्ण होता.[5] ( ६ ) विशिष्ट स्थितींत राजा व

(१) संवरणमात्रं त्रयी लोकयात्राविद इति । कौटिलीयार्थशास्त्र, विद्यासमुद्देश.

( २ ) शांति. १४२।११; २५९।३

( ३ ) शांति. १४२।३

( ४ ) शांति. २६०।३

( ५ ) महाभारत – वन. १८०; शांति. १८६; २६०; अनु. १४३

राज्यसंस्था यांच्या वाचून समाजसंस्था सुरळीत चालत [1]होती, (७) चार वेद नसताना सुद्धां समाज उच्च स्थितींत राहिला होता[2], (८) विवाहसंस्थेंत सवर्णांतील व्यभिचारास मान्यता होती, यावरून विवाहसंस्थेंत अनेक परिवर्तनें घडलीं आहेत[3], (९) वेदांतील पशुयज्ञ-संस्था, पापी व लोभी माणसांनीं प्रवृत्त केली आहे[4], (१०) सत्य, अहिंसा, संयम, इत्यादि नैतिक परमधर्म सुद्धां पूर्ण नाहींत, तर त्यांचेंही तारतम्य पाहूनच आचरण करावें लागतें; मानवी जीवनाच्या सर्वंकष परीक्षणानेंच त्याचें मूल्य ठरतें[5]. त्यांना सापेक्ष प्रामाण्य आहे, स्वतःसिद्ध श्रेयस्करत्व नाहीं. वरील मूलगामी विचार भारतकार सांगतात. या विचारावरून असें सहज प्रत्ययास येतें कीं, भारतीय मीमांसा दोन हजार वर्षांपूर्वी वैचारिक विकासाच्या बऱ्याच वरच्या पायरीवर गेली होती. विशेषतः परम धर्म म्हणून मानलेल्या नैतिक मूलभूत कल्पनांच्या सापेक्षव्यवस्थेचा विचार तर भारतीय टीकात्मक ( Critical ) दृष्टीचें सर्वगामित्वच शाबित करतात.

या विवेचनावरून असा एक प्रश्न उत्पन्न होतो कीं, भारत-कारांची धर्ममीमांसा पूर्णपणें बुद्धिवादी व वस्तुनिष्ठ विचारसरणीवर

---

(१) शांति. ५९।१४-१५

(२) भागवत स्कं. ११ अ. १७

(३) भारत आदि. १२२।३-२१

(४) भारत, शांति. २६२।३७-५२

(५) भारत आदि. ८२; शांति. १५; १३९; ३२९.

उभारली गेली होती असें कां म्हणूं नये ? याचें उत्तर अगदीं सोपें आहे. महाभारतांत विशेषतः शांति व अनुशासन पर्वांत परलोक, पुनर्जन्म, कर्मविपाक, देवता, ईश्वर, त्रिकालज्ञ योगी, दिव्यदृष्टीचे ऋषि, परमेश्वराचे अवतार, पापपुण्य, स्वर्गनरक इत्यादि अलौकिक पदार्थांची भरमसाट वर्णनें कमी नाहींत, केवळ सामान्य लोकांना सत्पथास लावण्याकरितां ठरविलेले हे संकेत आहेत असें कोणी म्हणेल, परंतु या म्हणण्यास कोठेंहि प्रत्यक्ष आधार नाहीं. उलट मोक्षधर्म प्रकरणांत सांगितलेला वेदांत व गीतेंतील तत्त्वचर्चा पारलौकिक व अलौकिक कल्पनांचे महत्व स्थापित करते. गीता व मोक्षधर्म-पर्व यांतील श्रद्धेय तत्त्वांची चर्चा गौणार्थी मानणें म्हणजे मूळ ग्रंथ-काराच्या विचारांवर अत्याचार करणें होय.

विद्वद्रत्न दप्तरींची धर्ममीमांसा

धर्मलक्षणासंबंधीं कांहीं आधुनिक धर्मसमीक्षकांची विचारसरणी येथें उध्दृत करणें आवश्यक आहे. ज्या तऱ्हेची विचारसरणी येथें उध्दृत करावयाची आहे, ती हिंदुस्थानांतील पुष्कळ विद्वानांनीं मांडली आहे. ज्यांनीं यासंबंधानें विचार स्पष्ट व सुव्यवस्थित रीतीनें मांडले आहेत त्यांच्यापैकीं निवडक व्यक्तींचाच येथें उल्लेख करतो. ते म्हणजे लो. टिळक, श्री. विद्वद्रत्न के. ल. दप्तरी व श्री. ह. कृ. मोहनी हे होत. लो. टिळकांच्या विचारांचा परामर्श धर्म-प्रमाण या प्रकरणांत करावयाचा आहे. श्री. दप्तरी यांची धर्म-मीमांसा बुद्धिवादावर आधारलेली आहे. त्यांनीं आपलें विचार गणितासारखे स्पष्ट व सुव्यवस्थितपणें " धर्मरहस्य " व " धर्म-

विवादस्वरूप " या ग्रंथांत मांडले आहेत. त्यांचें म्हणणे असें. धर्म दोन प्रकारचा आहे. एक निःश्रेयसलक्षण व दुसरा चोदनालक्षण. आत्यंतिक सुख व दुःखनाश म्हणजे निःश्रेयस. निःश्रेयसाचे जें साधन तो धर्म होय. कोणतें कर्म निःश्रेयसाचें साधन असतें व कोणतें नसतें, हें मनुष्याच्या बुद्धीसच अवगत होऊं शकते. एकाग्र चित्तानें निःस्वार्थीपणें विचार केल्यास धर्माधर्माचा निर्णय करतां येतो. स्थिरबुद्धीचे निःस्वार्थ साधु धर्मनिर्णय करतात, त्यांनीं निर्णय करून प्रतिपादिलेला धर्म म्हणजे चोदनालक्षण धर्म होय. निःश्रेयसलक्षण धर्म हा चोदनालक्षण धर्माचा खरा आधार होय.

सुख म्हणजे वासनाक्षय किंवा वासनाभाव होय. ऐहिक व पारलौकिक अशा सर्व सुखांचे हेंच एक स्वरूप होय. हें सुख वासनाक्षय करण्याच्या प्रयत्नानें व इतर जीवांच्या प्रेम संपादनानें प्राप्त होतें. ऐहिक व पारलौकिक सुखाचें स्वरूप सारखेंच असल्यामुळें, इहलोकीं सुख ज्या कर्मानें प्राप्त होतें त्याच कर्मानें परलोकीं सुख प्राप्त होतें. म्हणून परलोक बुद्धिगम्य नसला, तरी ऐहिक दृष्टीनें सुखसाधक होणारा धर्म परलोकीं सुखसाधक होणारच.

श्री. दप्तरींचे विचार संक्षेपानें वर मांडले आहेत. त्यांतील एक महत्त्वाचा मुद्दा मान्य करण्यासारखा आहे. तो हा कीं, धर्म हा मनुष्यबुद्धिगम्यच आहे. याचा अर्थ श्री. दप्तरींनीं असा केला आहे कीं, सगळे विधि-निषेध, वेद स्मृति, पुराणें, मनुष्यबुद्धीनेंच निर्माण केली आहेत. आक्षेप घेण्यासारखे दुसरे अनेक मुद्दे शिल्लक

राहातात. दुसरींचे धर्मविवेचन एका दृष्टीनें अपुरें दिसते. त्यांनीं श्रुति-स्मृति-पुराणांतील सगळ्या कल्पना मानुष बुद्धीतून निघाल्या आहेत, असें म्हटलें आहे, पण त्याच विचारांची तर्कप्राप्त दुसरी बाजू त्यांनीं मांडली नाही. ती अशी—धर्मग्रंथ मनुष्यबुद्धिजन्य आहेत असें मानलें कीं, त्यांतील सगळ्या कल्पनांची सत्यासत्यतेच्या दृष्टीनें पारख करावी लागते. ही पारख सुरू केली की, धर्मग्रंथांतील म्हणजे चोदनालक्षण धर्माच्या प्रतिपादनांतील कल्पनांची भ्रांतिमयता किंवा मिथ्यात्व डोळ्यासमोर येतें. त्यांतील फार महत्वाच्या म्हणून मानलेल्या कल्पना मूर्खपणाच्या व वेडगळ दिसतात. अथर्ववेदांतील शेकडो विधि म्हणजे जादूचे प्रयोग व जारणमारणउच्चाटनादि क्रिया बालिश व भ्रांतिकल्पित आहेत, हें काय सांगावयास पाहिजे ? वेदांतील मुख्य प्रतिपाद्य धर्म यज्ञ होय. त्या यज्ञाच्या आधारभूत असलेल्या कल्पना म्हणजे केवळ भ्रांतीची भेंडोळीच होत. सृष्टिविषयक कार्यकारणभावाच्या तत्कालीन गाढ अज्ञानाचें हे वैदिक यज्ञ महान् प्रतीकच होत. दर्शपूर्णमासेष्टीने धन धान्य पशु, कारीरीष्टीने पर्जन्य, पुत्रेष्टीने पुत्र, उद्भिद्यागाने पशु, श्येनयागाने शत्रुनाश इत्यादि फळें मिळतात, असें वेद सांगतो. हे यज्ञ व तज्जन्य फल यांचा कार्यकारणभाव सांगणारे वेद भ्रांतिमूलक आहेत असेंच म्हटलें पाहिजे. वेद जर मनुष्यकृत असतील तर ते भ्रांतिजन्य आहेत, ही गोष्ट सिद्ध होण्यास मुळीच अडचण पडणार नाही; व त्यामुळें बराचसा वेदराशी भ्रांति-प्रमादांचा सागर आहे असें सहज ठरवितां येईल. जरीआई, मरीआई, खंडोबा, बहिरोबा, शितळा देवी इत्यादि देवतांच्या कोपामुळे बालमृत्यू व साथीचे रोग

येतात, अशी खेडवळांची समजूत असते व ते त्याप्रमाणें त्या देवतांची बलिसमर्पणपूर्वक आराधना करितात. हे वैदिक यज्ञ तसेच आहेत असें दत्तरींनीं स्पष्ट कां म्हणू नये? वैदिक यज्ञ वासना-नाशाकरितां जीवप्रीतिसंपादनार्थ सांगितले आहेत, असें दत्तरी म्हणू शकतील. पण त्याला पुरावा नाही. वैदिक धर्म हे साधूंच्या शुद्ध बुद्धीचे निर्णय आहेत कीं, ते प्राचीन भ्रांतिग्रस्त आर्यांच्या धार्मिक चालीरीती आहेत? निसर्गातील कार्यकारणभावांचे अज्ञान व तज्जन्य भ्रांति यामुळेंच वैदिक यज्ञ व देवता अस्तित्वांत आल्या ही गोष्ट दत्तरींनी आपल्या शुद्ध बुद्धीच्या द्वारें मान्य करावी.

शुद्धबुद्धीच्या साधूंनी दिलेला निर्णय म्हणजे स्मृति होत असें दत्तरी धर्मरहस्यांत सांगतात. शूद्रांना ज्ञान व मान देऊ नये; त्यांच्या धनाचा अपहार निर्धन ब्राह्मणांनी व द्विजांनीं यज्ञप्रसंगीं किंवा दुष्काळांत खुशाल करावा; शूद्रांनी आपत्कालीं वरच्या वर्णांचे उद्योगधंदे केल्यास त्यांना कठीण व क्लेशकारक देहदंड द्यावा, वरच्या वर्णांनी आपत्कालीं उपजीविकेकरितां खालच्या वर्णांची कामें करावी पण खालच्या वर्णांनीं उलट तसें करतां कामा नये, त्यांनी तसें केल्यास निर्घृण उपायांनीं त्यांचा निग्रह करावा; शूद्रवर्णानें उच्च वर्णीयांची निर्भर्त्सना केल्यास अगर शिवीगाळ केल्यास त्यांची जिव्हा छेदावी पण उच्च वर्णाने तसें केल्यास नुसती समज देऊन मोकळें सोडावे; ब्राह्मण जातीच्या इसमाला कोणत्याही महापराधांत सुद्धां देह-दंडाची शिक्षा करूं नये; ब्राह्मणेतराने किंवा शूद्राने आर्यवर्णाच्या किंवा ब्राह्मणवर्णाच्या स्त्रीशीं संमतीने जरी संभोग केला किंवा लग्न केलें तर

त्यास चव्हाट्यावर गवतांत जाळावे पण आर्याने किंवा ब्राह्मणाने खालच्या वर्णाच्या किंवा शूद्राच्या स्त्रीशीं संग केल्यास त्यास कसलीही शिक्षा करू नये, शिक्षा करावयाचा प्रसंगच आल्यास धनदंडच करावा; शूद्राने मुद्दाम वेद ऐकल्यास शिशाचा तप्त रस त्याच्या कानांत ओतून त्यास ठार करावे; त्याने वेद पाठ केल्यास त्याला करवतीनें चिरावें; इत्यादि शेकडों कायदे गौतम, मनु, याज्ञवल्क्य, नारद, बृहस्पति, कात्यायन इत्यादि प्रसिद्ध स्मृतिकारांच्या धर्मशास्त्रांत सांगितले आहेत. हे धर्म निःपक्षपाती शुद्धचित्त आर्य साधूनींच सांगितले आहेत असें जर कोणी दप्तरींचे अनुयायी त्यांच्या धर्मनिबंधावरून म्हणू लागले, तर त्यांची वाहवाच करावी लागेल ! वरील उदाहरणें केवळ दिग्दर्शनार्थच उद्धृत केली आहेत. श्रुति, स्मृति, पुराणें, महाभारत इत्यादि धर्मवाङ्मयांत सांगितलेले दप्तरींचे चोदनालक्षण धर्म स्थितप्रज्ञ साधूंच्या बुद्धीचे निर्णय आहेत असें श्री. दप्तरी सिद्ध कसें करणार ? श्री. दप्तरींनी ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे की, कोणतेहि रूढ धर्मशास्त्र, मग तें आर्यावर्तातील असो अगर म्लेच्छदेशीय असो, तें तत्कालीन विशिष्ट सत्ताधारी वर्गाच्या हितसंबंधांचे रक्षण केल्याशिवाय राहात नाही. त्यांत कोणत्या व्यक्तीचें नेतृत्व आहे हा प्रश्न गौणच ठरतो. मग ती व्यक्ति ऋषि, बुद्ध, खिस्त, महंमद, शंकराचार्य किंवा गांधी यापैकीं कोणीही असो.

श्री. दप्तरींनी धर्मलक्षणाच्या निरूपणप्रसंगीं केलेली सुखाची उपपत्ति अत्यंत चिन्त्य आहे. लो. टिळकांनीं गीतारहस्यांत ही उपपत्ति

थोडक्यांत चांगली खोडली आहे. [ गीतारहस्य, सुखदुःखविवेक प्रकरण पहा. ] वासनाभाव हेंच सुखाचें स्वरूप होय, असें त्यांचें म्हणणें आहे. सुख हें अभावात्मक नाही, मनाची ती एक भावरूप ( Positive ) संवेदना आहे. (१) मनांत कोणतीही वासना, आकांक्षा किंवा उत्कंठा नसतांना, आकस्मिक रीतीने विषयसंसर्ग घडल्यास सुखसंवेदना निर्माण होते. समुद्राचा, सूर्यास्ताचा, वनश्रीचा, सुस्वरूप स्त्रीचा किंवा फुलांचा आकस्मिक इन्द्रियजन्य अनुभव आल्याबरोबर, आगाऊ अपेक्षा नसतानाच, सुखसंवित्तीचा उन्मेष होतो. ( २ ) भिन्न भिन्न इन्द्रियानें होणारी सुखसंवेदना भिन्न भिन्न जातीची असते. सुख हा जर अभाव असेल तर सगळेच अभाव स्वरूपतः सारखेच असतात. त्यांच्यांत वैचित्र्याचा अनुभव कसा येणार ? सुखांचें वैचित्र्य सर्वसंवेद्य आहे. नुसतें इन्द्रियवैचित्र्यामुळेंच सुखवैचित्र्य निर्माण होत नाही. ( ३ ) विषयवैचित्र्यांत सुद्धां सुखवैचित्र्य असते. ( ४ ) तसेंच सुखसंवेदनेत तारतम्यसुद्धां पुष्कळ असते. ( ५ ) मानसिक आनंदाचें सुद्धां असेंच आहे. गणितजन्य व काव्यजन्य आनंदात विजातीयता असते. ( ६ ) आनंदाचें स्वरूप विचित्र व अनंत प्रकारचें असतें. आस्वाद घेणाऱ्या व्यक्तीची परिस्थिति, आस्वाद्य विषय व साधनें यांच्या अगणित प्रकारांमुळें सुखाचेंही अगणित प्रकार होतात. ( ७ ) जी गोष्ट सुखाची तीच दुःखाची. दुःखाचें स्वरूप विवरून पाहावे म्हणजे सुखाच्या स्वरूपाचें विवरण बरहुकूम तसेंच करावें लागेल. दत्तरींचा सुखसिद्धांत अगदी अपुरा आहे. वासनाभाव हेंच एक संपूर्ण इष्ट नाही, वासनाभाव मनुष्याच्या अनेक इष्टांपैकीं विशिष्ट परिस्थितीतलें एक

इष्ट आहे. कित्येक वेळा वासनासुद्धा मनुष्यास इष्ट असते. महत्वाकांक्षेची जग प्रशंसा करते. भुकेकरिता व कामवासनेच्या उद्दीपनाकरिता वैद्यशास्त्रात उपाय सांगितले आहेत. वासना ही एका विशिष्ट स्थितीतच दुःखकारक व दुःखरूप बनते.

सुखसाधकता हें धर्माचें मुख्य लक्षण दसरी सांगतात. हें धर्माचें लक्षण होऊ शकत नाही, कारण पुष्कळशी सामाजिक कर्तव्यें अशी असतात कीं, त्यात व्यक्तीस दुःख व संकटें यांचाच लाभ होतो, तरी तीं पार पाडावी लागतात. यावर कोणी असें म्हणेल कीं, कोणत्याही व्यक्तीची कर्मप्रवृत्ति सुखार्थ किंवा दुःखनिवारणार्थ असते. परहितार्थ निरंतर रत असलेले साधू व निव्वळ स्वार्थी कृपण माणसें या दोघांच्याही प्रवृत्ति सुखार्थच असतात. फासावर जाणाऱ्या देशभक्तासही एक प्रकारचें सुखच प्राप्त होत असते. यावर उत्तर असें कीं, मग सुखसाधकता ही धर्म्य व अधर्म्य ठरविण्याची कसोटी होऊ शकत नाही. कारण एकच क्रिया कित्येक व्यक्तीस सुखसाधन व कित्येकास दुःखसाधन होते. यज्ञांतील पुरोहितास दान करणें ही क्रिया वेदावर श्रद्धा असणाऱ्या यजमानास समाधान प्राप्त करून देते व तीच क्रिया वेदावर श्रद्धा नसलेल्या माणसास विषाद व असमाधान उत्पन्न करते. कर्तव्य करण्यापासून होणारा आनंद हा सापेक्ष असतो. कारण विशिष्ट कर्तव्याचें मूल्य विशिष्ट सामाजिक स्थितीतच उत्पन्न होतें; सनातन धर्माच्या परंपरेवर विश्वास असणाऱ्या महारास अस्पृश्यतेच्या गुलामगिरीचे नियम पाळण्यात अत्यंत समाधान वाटते व त्यावर श्रद्धा नसलेल्या महा-

रास दुःख व पाप वाटतें. एवंच सुखसाधकता हें धर्मलक्षण होऊं शकत नाही. समाजाच्या सुखाचा व सुखसाधनांचा विचार एकंदरीत करून जो सुखसाधक ठरेल तो धर्म, अशी व्याख्या केल्यास ती अधिक विचारार्ह ठरेल. जॉन स्टुअर्ट मिलने नीतीची हीच व्याख्या केली आहे.

दप्तरींचा सुखवाद संन्यासमार्गी आहे. कारण सुखाचा अर्थ वासनानाश असा त्यांनी केला आहे. समाजधारणाशास्त्राशी हा सिद्धांत विसंगतही आहे. कारण वासनाक्षय हेंच ध्येय ठरल्यानंतर मोठ-मोठ्या सामाजिक व्यवहारांना व सुधारणाना रजा देणेच कर्तव्य ठरतें. कदन्नावर किंवा कन्दमूलादिकांवर कसाबसा उदरनिर्वाह करून वासनामय जीविताच्या क्षयाची वाट पाहणें व मृत्यूचें अभिनंदन करणें, हाच धर्ममार्ग किंवा परमधर्म ठरतो; बाकीचे सारे खटाटोप व्यर्थ होत. मरेल तो सुटला, जगेल तो अधर्मात जगला. कारण जीवन ही वासनेची जळती ज्योत आहे.

श्री. दप्तरी धर्मशास्त्रातील अलौकिकवस्तुविषयक कल्पनांची कांहीच मीमांसा करीत नाहीत. देवता, आत्मा, स्वर्गनरकादि पर-लोक कर्मविपाक इत्यादि अलौकिक वस्तूंची मीमांसा केल्याखेरीज धर्ममीमांसा पुरी होत नाही. या अलौकिक वस्तूंच्या कल्पनांना इतिहास आहे व तो इतिहास ज्योतिषशास्त्राच्या इतिहासासारखा नाही. ज्योतिषशास्त्रात साधारणपणे माणसाने, पहिल्यापासून, लहान सत्यापासून मोठ्या सत्याकडे, प्रवास केला आहे. अलौकिक कल्पनां-

मध्ये मनुष्यजातीच्या भ्रांतीचाच बराचसा इतिहास आहे. इतिहासाच्या निरनिराळ्या कालखंडात या कल्पनांची स्वरूपें स्थूल किंवा सूक्ष्म रूपाने अगदी भिन्न भिन्न होत आली आहेत.

श्री. मोहनी यांचा सनातन धर्म

श्री. ह. कृ. मोहनी यांनी " आमचा सनातन धर्म " या पुस्तकात धर्मलक्षणाचा विचार केला आहे. तो असा— " धर्म म्हणजे समाजधारणेचे नियम किंवा सामाजिक जीवनाचे कायदे. हे कायदे समाज संस्थेचे जीवभूत असतात. जैमिनीने सांगितलेला चोदनालक्षण धर्म म्हणजे हेच कायदे होत. म्हणून पूर्वमीमांसा हेंच समाजधारणाशास्त्र होय. आध्यात्मिकशास्त्र हें समाजधारणाशास्त्राहून निराळें शास्त्र आहे. आत्मा, ईश्वर, स्वर्ग व मोक्ष यांचा विचार अध्यात्मशास्त्र करते. उत्तरमीमांसा हेंच तें अध्यात्मशास्त्र. अध्यात्म हें वैयक्तिक असते. धर्म हा सामाजिक असतो. यज्ञ, संस्कार, वर्णाश्रमधर्म हाच समाजधारक धर्म होय. समाजधारणाशास्त्र व अध्यात्म यांची पूर्ण फारकत केली पाहिजे. "

श्री. मोहनी म्हणतात त्याचप्रमाणें समाजधारणाशास्त्र व आध्यात्मिक गूढतत्त्वें यांच्यांत फारकत केली पाहिजे, हें आम्हांस पूर्ण मान्य आहे. परंतु श्रुतिस्मृतींतील धर्मशास्त्र आध्यात्मिक कल्पनांनी म्हणजेच अलौकिक पदार्थांच्या कल्पनांनी ओतप्रोत भरलें आहे. मोहनी म्हणतात त्याप्रमाणे आम्हास अध्यात्म व वैदिक स्मार्त धर्म यांच्यात पृथक्त्व दिसत नाही, त्यांच्यात पूर्ण

मिलाफ झालेला आहे. पूर्वमीमांसेत तर समाजधारणेच्या तत्त्वांचें कोठेहि विवरण नाही. तें वेदांचा अर्थ लावणारें शास्त्र आहे. वेदांतील यज्ञ म्हणजे समाजधारणेची सर्वश्रेष्ठ संस्था असें म्हणतां येत नाही. त्यात देवता, परलोक, पापपुण्य, वगैरे सगळ्या आध्यात्मिक कल्पनांचा संग्रह आहे. सर्व यज्ञ याच कल्पनांवर उभारलेले आहेत. ज्या कर्मकाण्डाचें महत्त्व पूर्वमीमांसेला आहे, ते ब्राह्मण-ग्रंथातील यज्ञ होत. हें कर्मकाण्ड म्हणजे नुसतें थोताण्ड आहे असें आजच्या समंजस सुशिक्षितास सहज कळून येईल. वैदिक यज्ञ हे फार मागासलेल्या समाजसंस्थेचे द्योतक आहेत.

कणादांचें धर्मलक्षण

" यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः " (वैशेषिक दर्शन १।१।२) ज्याच्या योगें अभ्युदय व निःश्रेयस यांची प्राप्ति होते तो धर्म होय. " हें लक्षण फार गाजलें आहे. अभ्युदय म्हणजे ऐहिक किंवा पारलौकिक आनंद व त्याची साधनें. ज्या स्थितीत अनिष्टापेक्षा इष्टच अधिक असतें अशी स्थिति म्हणजे अभ्युदय. निःश्रेयस म्हणजे मोक्ष, शाश्वत किंवा सर्वोच्च अंतिम साध्य. ज्या स्थितीत कशाचीच अपेक्षा राहात नाही, व संपूर्ण समाधान होतें अशी स्थिति निःश्रेयस होय. हीं दोन साध्यें ज्या साधनांनी प्राप्त होतात, तो धर्म होय.

वैशेषिकांच्या मताचे मुख्य स्थापक आचार्य कणाद होत. त्यांनी लिहिलेल्या सूत्रातील वरील लक्षण आहे, वैशेषिकांच्या मतें धर्म म्हणजे प्रत्यक्ष आचरण किंवा क्रिया नव्हे; तर आचरणाचा

कर्त्याच्या आत्म्यावर होणारा अदृष्ट असा शुभ संस्कार किंवा पुण्य-परिणाम होय; व अधर्म म्हणजे याच्या उलट असदाचरणाचा पाप-रूप अशुभ अदृष्ट परिणाम होय. हा मतभेद केवळ शब्दार्थाबद्दलचा आहे. यास वस्तुतः काही महत्त्व नाही; कारण सदाचरणाचे व असदाचरणाचे अदृष्ट परिणामच मनुष्यास किंवा जीवास प्राप्त होणाऱ्या सुस्थितीचे व दुःस्थितीचे खरे कारक होत, असें सगळे आस्तिक वादी मानतात. त्यांत षड्दर्शनकार आचार्य आणि बौद्ध व जैन आचार्य हे येतात. चार्वाक बृहस्पति इत्यादि देहात्मवादी नास्तिकच तेवढे अदृष्ट मानीत नाहीत. या अदृष्टासच पूर्वमीमांसक अपूर्व असें म्हणतात. ईश्वरकृपा ही सुद्धा अदृष्टाचाच परिणाम होय, असें शैव व वैष्णव आचार्य मानतात. जे सदाचरणाचा परिणाम ईश्वरकृपा व असदाचरणाचा ईश्वरकोप असें मानतात त्यांच्याशी अदृष्टवादाचा विरोध नाही. कारण ईश्वराचा कोप व कृपा हा सुद्धां आचरणाचा अदृष्टच परिणाम होय. तत्त्वतः त्यांत विरोध नाही.

सदाचरण व दुराचरण ठरविण्याचें साधन कोणतें, या बाबतीत म्हणजे धर्मप्रमाणाच्या बाबतीत षड्दर्शनकार बौद्ध व जैन यांच्यात अवांतर मतभेद आहेत. ते धर्मप्रमाण या प्रकरणात विचारात घेऊ.

वैशेषिकांच्या ह्या लक्षणात मानुष बुद्धीस गम्य असा कर्माचा कार्यकारणभाव गृहीत धरला नाही, हें वैशेषिक सूत्रांतील विचार-

प्रणालीवरून दिसून येतें. धर्मक्षेत्र मानुष बुद्धीस अदृष्ट आहे, असेंच त्याचें तात्पर्य निघते. मात्र वैशेषिक दर्शनाचा मुख्य विशेष हा आहे कीं, त्यात विश्वाच्या स्वभावाची व कार्यकारणभावाची बौद्धिक उपपत्ति अत्यंत व्यापक रीतीने मांडली आहे. त्यामुळे धर्माच्या चर्चेचा बौद्धिक पाया तयार केला. परंतु प्रत्यक्ष धर्मचर्चा करताना अदृष्टाचा त्याग केला नाही.

## ( २ ) धर्मप्रमाण

धर्मलक्षणविचार व धर्मप्रमाणविचार हे अन्योन्याश्रित असल्यामुळे धर्मप्रमाणाच्या स्वरूपाचें विवेचन करणे आवश्यक आहे. धर्मप्रमाण म्हणजे धर्माच्या प्रमितीचें-ज्ञानाचें साधन.

लौकिकप्रमाणवाद व अलौकिकप्रमाणवाद

या संबंधी दोन पक्ष अस्तित्वांत आहेत. एक पक्ष असें म्हणतो कीं, धर्म हा मानवबुद्धिगम्य आहे. धर्माधर्म मानवबुद्धीच ठरविते; कोणतेंही धर्मशास्त्र मनुष्याच्या अनुभवातून व विचारातून उदय पावलें आहे. वेद, अवेस्ता, बायबल, कुराण इत्यादि धर्मग्रंथ मनुष्यबुद्धीचाच प्रसाद आहे. कृषि, वाणिज्य, शिल्प, राज्यव्यवहार, जादू, वैद्यकीय मंत्रतंत्र हे ज्याप्रमाणे मनुष्याच्या मानसिक क्रियेतून उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें सर्व धर्म उत्पन्न होतात. मनुष्याच्या व्यावहारिक किंवा लौकिक बौद्धिक व्यापाराप्रमाणेच त्याचे धार्मिक किंवा आध्यात्मिक मानसिक व्यापार आहेत.

या विचारसरणीस लौकिकप्रमाणवाद म्हणता येईल. दुसरा पक्ष अलौकिकप्रमाणवादाचा होय. या पक्षाचें म्हणणे असें आहे; धर्माधर्माची अवगति असाधारण किंवा अलौकिक अशा बौद्धिक किंवा मानसिक व्यापारानेच होते. या अलौकिक साधनास दिव्यचक्षु, दिव्यदर्शन, अपौरुषेय शब्द, आध्यात्मिक साक्षात्कार, अतींद्रिय यौगिक प्रत्यक्ष, आर्ष प्रज्ञा अथवा सिद्धांची त्रिकालदृष्टि असें संबोधितात.

लौकिकप्रमाणवादाचे दोन भेद ऐतिहासिक व अनैतिहासिक

या दोन्ही पक्षात अवांतर अनेक भेद आहेत. पहिल्या पक्षात ऐतिहासिक व अनैतिहासिक असे दोन भाग पडतात. ऐतिहासिक पक्षाचें स्वरूप पहिल्या व्याख्यानात सांगितलें आहे. या पक्षाप्रमाणे मनुष्याच्या अगदी प्राथमिक स्थितीपासून तो आधुनिक सुधारलेल्या काळापर्यंत समाजात जशी परिवर्तनें झाली आहेत, त्या प्रमाणे धर्मातही झाली आहेत. कारण या सामाजिक विकास क्रमातच मनुष्याच्या मनाची व बुद्धीचीही परिणति झाली आहे; व मानसिक परिणतिप्रमाणेच धर्मातही परिणति झाली आहे. धार्मिक अनुभव हा मनुष्याच्या साधारण अनुभवाचाच एक प्रकार आहे. अलौकिकत्व, दिव्यत्व, हा एक आरोप आहे. ती वस्तुस्थिति नव्हे.

अनैतिहासिक धर्मसुधारणावादी पक्ष हिंदुस्थानात हल्ली उत्पन्न झाला आहे. या पक्षाच्या दृष्टीने धर्म हा प्रगल्भ मानवबुद्धीचा विषय आहे. संयमी, मननशील, निःस्वार्थी साधु लोक समाज-

धारणा किंवा मनुष्याचें उच्च सुख ध्यानात घेऊनच वेळोवेळी धर्मसंस्थापना करीत असतात. या सात्त्विक बुद्धीच्या स्थितप्रज्ञ साधूंनाच धर्मनिर्णयाचा व धर्मपरिवर्तनाचा अधिकार आहे. त्यांच्या शुद्ध व सात्त्विक बुद्धिद्वाराच, समाजधारक व श्रेयस्कर कर्म कोणतें, हें ठरतें. ऐहिक दृष्ट्या श्रेयस्कर जें कर्म तेंच परलोकीं श्रेयस्कर होय. परलोकाचें स्वरूप जरी निश्चित करणे कठीण असलें, तरी इहलोकीं श्रेयस्कर कर्मच परलोकी श्रेयस्कर असणार; कारण श्रेयस्करतेचा कार्यकारणभाव दोन्हीकडे सारखाच असणार. हा पक्ष उत्तम तऱ्हेने विद्वद्रत्न के. ल. दप्तरी यांनीच मांडला आहे. महाराष्ट्रात तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी या संज्ञेचा सुशिक्षितांचा एक गट तयार झाला आहे. त्यापैकींच दप्तरी हे एक होत. त्यांच्या मतांचें पर्यालोचन मागें " धर्मलक्षण " प्रघट्टकांत संक्षेपाने केलेंच आहे.

प्राचीन भारतीयांचा लौकिकप्रमाणवाद— बृहस्पतिपक्ष व व्यासपक्ष

हिंदुस्थानांतील बृहस्पति, चार्वाक, उशना इत्यादि प्राचीन अर्थशास्त्रज्ञ तत्त्ववेत्ते धर्माची उत्पत्ति मानवी बुद्धीतूनच झाली असें प्रतिपादित असत. चार्वाक व कांही बृहस्पतीचे अनुयायी असें प्रतिपादत असत कीं, सगळ्या पारलौकिक अलौकिक धार्मिक कल्पना, मानवी भ्रांति प्रमाद व विप्रलिप्सा–लोकांना फसविण्याची इच्छा, यांतूनच जन्मल्या आहेत. धार्मिक ग्रंथ म्हणजे अनृत, व्याघात व पुनरुक्ति यांचे जडजंबाल आहे.[1]

---

(१) तदप्रामाण्यम् । अनृतव्याघातपुनरुक्तदोषेभ्यः । न्यायसूत्र

नीति हाच धर्माचा गाभा आहे. संयमजन्य श्रेय व सर्वभूत-सुख हेंच मनुष्याचें श्रेष्ठ ध्येय आहे, असें मानणारे तत्त्ववेत्ते प्राचीन काळी होते असें महाभारतावरून दिसतें. ह्या तत्वज्ञांच्या मतें धर्मनिर्णयास अलौकिक शास्त्रप्रमाणाची आवश्यकता नव्हती. हा भारतोक्त पक्ष प्राचीन काळी होता, याची दखलगिरी कुमारिल भट्टांनी पूर्वमीमांसेच्या श्लोकवार्तिकात घेतली आहे.[१] त्या पक्षाचें सार असें सांगितलें आहे, लोकहितकारक व लोकसुखकारक जें कर्म तो धर्म होय व लोकदुःखकारक जें कर्म तो अधर्म होय. हें सार ज्याला कळलें त्याला शास्त्राची काय जरूरी आहे? व्यर्थं शास्त्रप्रयोजनम्। हा पक्ष कुमारिल भट्टांनी अमान्य केला आहे. त्याचें कारण उघड आहे. कारण श्रुतिस्मृतीतील व परंपरेतील पुष्कळसे विधिनिषेध या कसोटीस उतरणारे नाहीत. श्रौतस्मार्त परंपरेला धक्का देणाराच हा पक्ष अतिप्राचीन अवैदिक परंपरेत निर्माण झाला होता व वैदिकांत तो रूढ होऊ लागला होता.

श्लोकवार्तिकांत उल्लेखिलेला व्यासपक्ष महाभारतांतील शांति- व अनुशासन पर्वांतील * धर्मचर्चेत प्रतिबिंबित झाला आहे. मात्र ही चर्चा पाहिजे तितकी विशद व संदेहहारक नाही.

---

(१) श्लोकवार्तिक १।१।५।१–३

* श्री. के. ल. दप्तरी यांनीं लोकशिक्षण मासिकात [ १९३७ [ व वागीश्वरी मासिकात [ नागपूर ] " तात्त्विक मीमांसा पद्धति " व " शांति व अनुशासन पर्व यातील बुद्धिगम्य धर्म " या निबंधात ही चर्चा सुंदर रीतीनें मांडली आहे.

त्या चर्चेचें थोडक्यांत स्वरूप असें आहे; दीर्घकालपर्यंत तत्परतेने कार्यकारणभावांचे अवलोकन व मनन करून धर्माचा निश्चय करता येतो [ अनुशासन १६२ । ७ । ८ ]. वेद, अनुभव व परंपरागत आचार या तीन साधनांनी धर्माची अवगति होते हें जरी खरें असलें तरी या तिन्ही साधनांत मूलतः फरक नाही. आचार केवळ परंपरेने चालत आले म्हणून प्रमाण नाहीत, त्यांच्या सुद्धा कारणांची चिकित्सा केली पाहिजे [शांति २६२।५४]. धर्माधर्मनिर्णयाकरितां बुद्धीचेंच अवलंबन करणें जरूर आहे [ शांति १४१।१०२ ]. बुद्धीने खोटें ठरणारें शास्त्रवचन निरर्थक होय [ शांति १४१।२२ ]. नुसत्या शास्त्रवचनाने व नुसत्या बुद्धीने धर्मज्ञान होत नाही, तर उभयांचें परस्पर साहाय्य घेतलें पाहिजे. कारण शास्त्रवचनातही कांही युक्तिवाद असतोच [ शांति १४२।१७ १८ ]. धर्मज्ञान नुसत्या शास्त्रवचनाने होणें शक्य नाही, कारण धर्मशास्त्र हें भिन्न व समविषम परिस्थितीतील विविध धर्म कसें सांगू शकेल ? सर्व आपत्तींची गणना ग्रंथकारास कशी करता येईल ? वेद युगमानाप्रमाणे ऱ्हास पावत आलेले आहेत. वेद हेच धर्माचें प्रमाण होय, ही केवळ लोकांची समजूत आहे [ शांति २६०।१–१० ]. जीवांना आनंददायक आचरण म्हणजेच धर्म होय, हेंच धर्मलक्षण साधूंना मान्य आहे. दुसऱ्यानें आपणांशी जसें वागू नये, असें आपणांस वाटतें, तसें दुसऱ्याशी न वागणे आणि आपणाशी दुसऱ्याने जसें वर्तन करावें असें आपण इच्छितो, तसेच दुसऱ्यांशी वागणे हेंच धर्माचें सार आहे [ शांति १०९ व २५९ ]. द्रोह व लोभ न करणें, इन्द्रियदमन,

अध्ययन, तप, भूतदया, सत्य, सहानुभूति, क्षमा व धैर्य हेंच सनातन धर्माचें निरपवाद मूळ होय [ अनुशासन १६२।११६ ]. प्रसंग विशेषी परिणामांचा विचार करून नित्य नैतिक तत्त्वाना सुद्धा अपवाद करावा लागतो ( शांति १०९ व २५९ ).

महाभारतातील हा धर्म विवेचक बुद्धिवादावर आधारलेला नैतिक धर्म आहे. धर्मातील श्रौतस्मार्त कर्मकाण्डाला गौणत्व देणारा हा विचार आहे. विश्वधर्म ( Universal religion ) जन्माला येण्याचा हा महाभारताचा काळ दिसतो. विशिष्ट जमाति व राष्ट्रें यांच्या पलीकडे जाऊन मानव्याचें महत्व ज्यावेळी वाढू लागलें, त्यावेळी या विचारांना श्रेष्ठत्व आलें. याच विचारांनी विश्वधर्माचा पाया घातला. ही मनुष्येतिहासातील महान् संक्रमणावस्था होती. या वेळी, ईश्वर, आत्मा, स्वर्ग व निःश्रेयस या पारलौकिक कल्पना, नैतिक धर्माच्या सेवेकरितां हजर झाल्या. या पारलौकिक कल्पनांनी नैतिक आचरणाला शाश्वत मूल्य दिलें. या परलोककल्पनांच्या प्रामाण्याबद्दल स्पष्ट व तर्कशुद्ध अशी चर्चा भारतात आढळत नाही. त्या कल्पनांचे प्रामाण्य श्रद्धेने गृहीत धरलें आहे. नैतिक आचरणाचा अव्यभिचारी संबंध मात्र या आध्यात्मिक व पारलौकिक तत्त्वांशी भारतकारांनी जोडलेला दिसतो.

या ठिकाणी ही गोष्ट ध्यानांत ठेवणे आवश्यक आहे की, महाभारतांत परस्परविरोधी सिद्धांतांची खूप सरमिसळ आहे. त्यामुळे बुद्धिवादी विचारसरणीच्या विरुद्ध असलेला अलौकिक प्रमाणवादही

त्यात जोरावलेला दिसतो. त्रिकालज्ञ, योगदृष्टि, दिव्यज्ञान, ईश्वराचा व ईश्वराच्या विभूतीचा उपदेश या अलौकिक धर्मप्रमाणांचा स्वीकार ठिकठिकाणी केलेला आढळतो. गीतेत यास भरपूर पुरावा आहे. गीतेचा उपदेष्टा भगवान् कृष्ण हा तर परमात्म्याचा पूर्ण अवतार आहे. वेद ही स्वयंभू परमात्म्याची अनादिनिधन वाणी आहे, असें व्यास सांगतात. मानुष बुद्धीच धर्मावगतीचें अंतिम प्रमाण होय, असें निखालसपणे भारतकारानी कोठेच सांगितलें नाही.

महाभारत ही एककालीन व एकव्यक्तिनिर्मित कृति नाही. त्यामुळे त्यास गंभीर व उथळ, उदात्त व फाल्तुक कल्पनांचा संस्कार झाला आहे. एकीकडे पौराणिक भाकड कल्पनांचा फोलकट पसारा व दुसरीकडे मानव्याचे व विश्वाचे गहन सिद्धान्त असा देखावा भारतात दिसतो.

वेदांतील वेदप्रमाणविषयक विचार

वेद हे अलौकिक दिव्यप्रमाण आहे कीं साधी मानवकृति आहे, याबद्दल वेदात प्रत्यक्ष काय म्हटलें आहे तें पाहू. वेदांचें ईश्वरप्रणीतत्व व अपौरुषेयत्व हे उशिरा आलेले विचार आहेत. वेदकवि किंवा वेदकर्ते आपल्या कृतीबद्दल अनेक प्रकारे बोलत आहेत. कांही ठिकाणी असे म्हणतात कीं, आपलें कवन सुताराच्या रथासारखे विणकराच्या वस्त्रासारखे गवळ्याने काढलेल्या लोण्यासारखे किंवा नावाड्याच्या नौकानयनासारखे आहे [ ऋग्वेद १०।११६।९ ]. एका ठिकाणी म्हणतातः— हे मंत्र आम्ही मनाने बनविले आहेत व मुखाने उच्चारिले आहेत

[ऋग्वेद १।१७१।२,२।३५।२,६।३२।१]. एक मंत्रकवि म्हणतो– हा अमुक मंत्र मला सापडला [ ऋ. १०।६७।१ ]. दुसरा म्हणतो– सोमरस यथेच्छ प्राशन केल्यावर आलेल्या तंद्रीतील ही एक उत्कृष्ट स्फूर्ति आहे [ ऋ. ६।४७।३ ]. तिसरा म्हणतो– मी आपलें कवन म्हणजे ढगापासून फुटून बाहेर येणारी पावसाची सरच समजतो [ ऋ. ७।९४।१ ]. वायू ज्याप्रमाणें मेघांना वाहून नेतो, त्याप्रमाणें माझा जीव कवितेला वाहून नेतो. कांही काळाने यापेक्षा निराळे विचार मंत्रद्रष्टे सांगू लागले– ते असें मानू लागले कीं, " कवीच्या बुद्धीस देव जागृत करतो, मित्राप्रमाणें साहाय्य करतो " [ ऋ. १।३७।४, ६।४७।१०, ७।८८, ८।५२।३ ]. शेवटी तर हे ऋषि असें समजू लागले कीं देव स्वतःच द्रष्टे व कवि आहेत; ते देवच माणसाला कवनें शिकवितात, व मनुष्याच्या तोंडून ती बाहेर पडतात [ ऋ. १।१७९।२, ७।७६।४.]

सूत्रकालापासून भाष्यकालापर्यंतची वेदप्रामाण्यमीमांसा

सूत्रकाली वेदप्रामाण्याबद्दल वाद उत्पन्न झाले. निरुक्तामध्ये यास्काने ( १।१५ ) कौत्स ऋषीचें मत दिलें आहे. तो म्हणतो– वेद निरर्थक म्हणजे अर्थहीन आहेत. यास्काच्या मते अलौकिक शक्तीच्या ऋषींना धर्माचा साक्षात्कार झाला, त्याच ऋषींनी स्वतःस लाभलेले मंत्र खालच्या दर्जाच्या लोकाना शिकविले, कणादाच्या वैशेषिक सूत्रांत याच तऱ्हेचें मत सांगितलेलें दिसतें. वेद हे बुद्धीतून निर्माण झाले आहेत, असें कणाद म्हणतो. मात्र अनेक पुण्यांच्या सामर्थ्यामुळे ऋषींना प्राप्त झालेली दिव्यदृष्टि हेंच त्या बुद्धीचें

स्वरूप[१] होय. पाणिनीच्या काळी वेद हे लोकविलक्षण आहेत, अशी समजूत होती. पाणिनी भाषेचे लौकिक व वैदिक असे विभाग पाडतो. पतंजलीच्या काळी वेद अनादिनित्य आहेत, अशी समजूत होती. पतंजलीने या समजुतीचा स्वतःच्या दृष्टीने अर्थ सांगितला आहे, तो म्हणतो, वेदांचा अर्थ नित्य आहे, पण वेदांचे शब्द अनित्य आहेत. याचा अर्थ असा कीं, वैदिक धर्मीय लोकांत रूढ असलेले विधिनिषेध, यज्ञ-विधि व इतर कर्मकांड म्हणजे वेदांचा अर्थ होय; ही वैदिक परंपरा कथन करणारे जे वैदिक शब्द ते निरनिराळ्या वेळी निर-निराळ्या स्वरूपाने अस्तित्वांत येत असत. अव्याहत परंपरेची पुरो-हितानी सांगितलेली माहिती म्हणजे वेद होत. पुरोहितांच्या या शब्दात फरक पडत असे, पण परंपरा मात्र बदलत नसे, असा पतंजलीच्या म्हणण्याचा आशय दिसतो.

परंपरेने चालत आलेले वैदिक मंत्र व विधिनिषेधांची मा-हिती सांगणारी वाक्यें म्हणजे ब्राम्हणग्रंथ हा वेद होय. हा वेदरूप शब्दराशीच अनादिनित्य आहे, अशी समजूत याज्ञिक पुरोहितांनी रूढ करण्यास सुरवात केली. परंपरेच्या आदि कारणाची स्मृति लोकांना नसते. कारण ही परंपरा अतिप्राचीन काळापासून हळू हळू उत्पन्न होत असते व वाढत असते. कोणत्याही देशातील लोकांच्या बऱ्याचशा धार्मिक चालीरीतींचे व समजुतींचे प्रथम प्रणेते लोकांना फारसे ठाऊक नसतात, त्यामुळे परंपरेचे कर्तृत्व कोणत्या

(१) " आर्षं सिद्धदर्शनं धर्मेभ्यः " ( वैशेषिकसूत्र ९।२।१३ )

तरी अलौकिक कारणाकडे लोक सोपवितात; तीच गोष्ट वेदांची.

वेदांच्या प्रामाण्याची स्थापना पुढे वर्णिलेल्या तीन प्रकारांनी वैदिक आचार्यांनी केली. कांही आचार्य असें म्हणत– ऋषींना दिव्यदृष्टि प्राप्त झाली व त्यानी वेद निर्माण केले; नैयायिक, शैव व वैष्णव असें म्हणत कीं, ईश्वराच्या प्रसादाने वेद किंवा धर्मज्ञान मनुष्यास प्राप्त झालें; पूर्वोत्तरमीमांसक असें सांगत असत कीं, वेद हे देव किंवा मनुष्य यापैकी कोणीच केले नाहीत. ते अपौरुषेय व अनादिप्रवृत्त आहेत.

वेदांचे अलौकिक प्रामाण्य वैदिक आचार्यांनी कां स्थापन केलें हा महत्त्वाचा प्रश्न आहे. वेद हे माणसांनी केले आहेत, या उघड गोष्टीच्या समर्थनार्थ फारसा अट्टहास करण्याची मुळीच जरूरी नाही. मग मनुष्य स्वतःच्या कर्तृत्वावर पाणी सोडावयास कां तयार व्हावा ? व अगदी उघड असणारी गोष्ट इतकी गूढ का करून सोडावी ? याचें उत्तर अगदी सोपें आहे. त्याचें उत्तर सामाजिक परिस्थितीच्या मीमांसेत सांपडतें. वैदिक त्रैवर्णिक आर्यांच्या धार्मिक चालीरीतींचें व सामाजिक कायद्यांचें मूळ वेदात आहे. वैदिक पुरोहित वर्गाचे म्हणजेच ब्राह्मणांचे वरिष्ठत्व आणि शूद्रांचे दास्य हें जिचे मुख्य लक्षण आहे, अशा समाजसंस्थेला स्थैर्य आणण्याकरिता वेदास अलौकिक प्रामाण्याच्या पदवीस पोहोंचविले. त्या समाजसंस्थेच्या कायद्यांचें, चालीरीतींचें, आचारमार्गांचें, कर्मकाण्डाचें व विचारपद्धतीचें स्थैर्यावर त्या समाजसंस्थेचा प्राण अवलं-

नून होता. त्यांचे पूर्णत्व व अबाध्यत्व स्थापित करण्याकरितां आर्यांनी त्यांना वेदमूलक ठरविलें, आणि वेदांना अनादिनित्यत्व व स्वतः प्रामाण्य अर्पण केलें.

जैमिनीने पूर्वमीमांसेच्या प्रारंभी धर्मप्रमाणांचा निर्णय केला आहे. त्याने प्रत्यक्ष व अनुमान हीं धर्मप्रमाणें नव्हेत असें पहिल्यांदा सांगितलें; नंतर, वेदरूप उपदेश हेंच धर्माचें स्वतःसिद्ध इतरनिरपेक्ष प्रमाण होय, व ब्रह्मसूत्रकार बादरायणाचेंही हेंच मत आहे, असें[1] म्हटलें; स्मृतीसुद्धां वेदानुवादक आहेत म्हणून धर्मनिर्णयाचें साधन होत असें जैमिनी सांगतो. वैदिक लोकांच्या चालीरीतिसुद्धा वेदमूलक असल्यामुळे प्रमाण होत, असें मीमांसक गृहीत धरतात.

**शबरस्वामी कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांची प्रमाणोपपत्ति**

शबरस्वामी व कुमारिलभट्ट यांनी जैमिनीय सूत्रांचा अर्थ विस्ताराने उपपन्न केला आहे. जैमिनीय सूत्रें इ. स. पूर्व पहिल्या शतकाच्या सुमारास झाली असावीत असें ऐतिहासिक लोक म्हणतात. शबरस्वामी व कुमारिलभट्ट यांचा काळ अनुक्रमें चवथें व सातवें शतक होय.

या आचार्यांच्या मते मनुष्यबुद्धीस अगम्य कार्यकारणभाव सांगण्यास वेद प्रवृत्त झाले आहेत. मानवबुद्धिगम्य तत्त्वेंच वेद सांगतात, असें मानलें तर वैदिक संस्थाचें उन्मूलन होईल; अशी भीति या आचार्यांस वाटत होती. कुमारिलभट्ट म्हणतात कीं, [ तन्त्रवार्तिक १।१।३ ]

---

(१) औत्पत्तिकस्तु शब्दस्यार्थेन संबंधस्तस्य ज्ञानमुपदेशोऽव्यतिरेकश्चार्थेऽनुपलब्धे, तत्प्रमाणं बादरायणस्यानपेक्षत्वात् । जैमिनीसूत्र १।१।५.

एकदा मनुष्यबुद्धीस वेदात स्थान दिलें म्हणजे नास्तिकविचारांचे प्राबल्य होऊन वैदिक मार्ग नष्ट होईल. तसें होऊ नये म्हणून वेदांचा अदृष्ट हाच विषय मानला पाहिजे. कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांच्या पूर्वी ईश्वर, आत्मा, पुनर्जन्म, अदृष्ट इत्यादि धर्ममूलभूत कल्पनांचे युक्तिवादाने समर्थन करणारे आचार्य पुष्कळ होते, परंतु हीं तत्त्वें मानवबुद्धिगम्य नाहीत, ही गोष्ट कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांनी बुद्धिवादाच्या व्यापक व सूक्ष्म तत्त्वांच्या आधारे सिद्ध केली. शंकराचार्यांनी हीं तत्त्वें वेदगम्यच होत या मुद्यावर फार भर दिला. याचें कारण उघड आहे, एकतर हीं तत्त्वें मनुष्याच्या नुसत्या कल्पनांचा आभास किंवा खेळ होय, किंवा हीं तत्त्वें मनुष्यबुद्धिगम्य नव्हेत, यापैकीं कोणती तरी बाजू स्वीकारली पाहिजे. परंपरागत धर्मसंस्थेच्या स्थैर्याकरिता व स्वतःस पूर्णपणे मान्य असलेल्या अध्यात्मवादाच्या समर्थनाकरिता दुसरापक्ष कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांनी स्वीकारिला; आणि केवल वेदगम्यत्व त्या तत्त्वास अर्पण केले. वेद हे मानवकृत आहेत, ही गोष्ट मान्य केल्यावर हीं तत्त्वें निराधारच ठरतात हें येथे विसरून चालणार नाही.

भारतीय अवैदिकांच्या धर्मप्रमाणविषयक कल्पना

हिंदुस्तानात वैदिक परंपरेइतकेच जुने अवैदिक धर्मसंप्रदाय अस्तित्वात आहेत. त्या अवैदिक परंपरेतच शैव, वैष्णव, बौद्ध, जैन इत्यादि संप्रदाय उत्पन्न झाले. शैव व वैष्णव प्रत्यक्ष ईश्वरच धर्मोपदेश करतो, असें मानतात; धर्म हा उच्चतम, शुद्ध व पूर्ण

परिणत मानवबुद्धीनेच अवगत होतो, असें बौद्ध व जैन मानतात. शैववैष्णवांचा ईश्वर व बौद्धजैनांचा परिणतप्रज्ञ सर्वज्ञ अस्तित्वातच असू शकत नाही असें कुमारिलभट्टानें श्लोकवार्तिकात सिद्ध केलें आहे.

धर्मात परिव्रज्येस स्थान देणाऱ्या बौद्धजैनांच्या वेदविरोधी संप्रदायांनी वेद ही मनुष्यकृति ठरविली; याही पुढे जाऊन त्यांनी असें ठरविलें कीं, कामक्रोधादि विकारांनी ग्रस्त अशा हीन मनाचीच वेद ही कृति आहे म्हणून वेद हे धर्मप्रमाणच नव्हे. धर्माधर्माचा निर्णय करण्याचें साधन वीतराग अंत:करणच होय. राग म्हणजे कामक्रोधादि विकार. हे विकाररूपी मल ज्यांनी धुवून टाकले आहेत त्यांचें अन्तःकरणच धर्म निर्णयाचें साधन होय; ध्यानधारणेत निमग्न होणारें, वीतराग झालेलें आणि त्यामुळे योगशक्तीचा लाभ होऊन सर्वज्ञ बनलेलं मन धर्माचा मार्ग सांगते. जिन किंवा बुद्ध ही पदवी याच मनास लाभतें. मनुष्याचें प्राकृत मनच प्रयत्नाने ह्या उच्च परिणतीस पोहोचते.

या विचारसरणीचें खंडन मीमांसकांनी केलें आहे. वीतरागस्थिति व सर्वज्ञता या दोन्ही गोष्टी मनुष्याच्या मनास प्राप्त होणे अशक्य आहे असें ते म्हणतात. विकार हा मनाचा अबाधित स्वभावधर्म आहे, आणि सर्वज्ञता, मनाच्या व इन्द्रियांच्या ज्ञानविषयक स्वाभाविक मर्यादा लक्षात घेतल्यास, अशक्य गोष्ट आहे.

---

( १ ) सर्वज्ञवन्निषेध्या नः कर्तुः सद्भावकल्पना । श्लोकवार्तिक १।१।५ पत्युरसामञ्जस्यात ब्रह्मसूत्र २।२

प्राचीन भारतीयांची वैदिक व अवैदिक धर्मपरंपरेतील धर्म-प्रमाणविषयक विचारसरणी आतापर्यंत वर उद्धृत केली. गेल्या बाराशे वर्षांतील धर्मशास्त्रकारांच्या मांडणीचा कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांचे विचार हाच खरा आधार होय. या आचार्यांनी जैन–बौद्धादि-कांच्या विचारसरणीवर हल्ला करीत असता जो बुद्धिवादाचा निकष वापरला आहे, तो वेदप्रामाण्याच्या बाबतीत वापरला नाही. तसेंच जैन बौद्धांनी वैदिक मार्गाचें खंडण करीत असताना जें श्रेष्ठ तर्क-शास्त्र वापरलें त्याचा स्वपक्षमंडनार्थ कमी उपयोग केला आहे. दोन्ही पक्षातील बुद्धिवाद एकत्र केला तर धर्मसंस्थेचें अधिष्ठान असलेलें अलौ-किक प्रमाणच नष्ट होतें, मग तें अपौरुषेय वेद, ईश्वर, योगी, अवतार, विभूति, प्रेषित, वीतराग मुनि यांपैकी कोणतेंहि असो.

आधुनिक कालात नव्या धर्ममीमांसा उत्पन्न झाल्या आहेत.

धर्मप्रमाणविषयक आधुनिक उपपत्तींचा

त्यातील धर्मप्रमाणचर्चेचा आता थोड-क्यात परामर्श घेऊ.

परामर्श

टिळक व राधाकृष्णन्

आधुनिक भारतीय धर्ममीमांसकांचे गीतारहस्यकार लो. टिळक हे अग्रणी होत. त्यांनी व्यवस्थित, स्पष्ट व उपपत्तियुक्त असें धर्मतत्त्वविवेचन केलें आहे. त्याचप्रमाणे स्वामी दयानंद, राजा राममोहन राय, विवेकानंद, रामतीर्थ, केशवचन्द्र सेन, रानडे, भांडारकर, राधाकृष्णन् इत्यादि-कांनी सुद्धा प्रगल्भ व सुंदर धर्मचर्चा केली आहे. स्वामी-दयानंदांचे विचार हिंदुधर्माची जुजबी सुधारणा करण्यास अत्यंत उपयुक्त आहेत; पण त्यात धर्मतत्त्वांची बुद्धिवादी व मूलगामी चिकित्सा नाही. विवेकानंद, रामतीर्थ, रानडे, भांडारकर इत्यादिकांचे विचार

मननीय आहेत, पण ते त्यांच्या निरनिराळ्या व्याख्यानांत विखु-रलेले आहेत, त्यांची त्यांनी विषयवारीने संगतवार ग्रंथरूपाने मांडणी केली नाही. प्रो. राधाकृष्णन् आज पाश्चात्य विद्यापीठात तत्त्वज्ञ म्हणून मान्य व प्रथितयश झाले आहेत. कल्पनांची समृद्धि, भाषेचें लालित्य, अलंकारिकता, वक्तृत्व, बहुश्रुतत्व, गूढगुंजनी कवित्व इत्यादि गुणसंपत्तीने त्यांचें लेखन नटलेलें आहे. परंतु History of Hindu Philosophy हा ग्रंथ सोडल्यास बाकीचे त्यांचे ग्रंथ सैलभोंगळ मांडणीचे आहेत. विचारपरिणतीची ऐतिहासिक मीमांसा करण्याची पद्धति त्यांना माहीत असूनही ती त्यांनी हस्तगत केली नाही. जीं तत्त्वें प्रतिपादावयाची, ती क्रमवार, नीटनेटकी, संकररहित, तर्कसंगतियुक्त व सुव्यक्त पद्धतीने त्यांना सांगता येत नाहीत. Eastern religions and Western thought व Hindu View of life या पुस्तकांत प्रो. राधाकृष्णन् यांचें हें वैगुण्य फारच उघडकीस आलें आहे. याच्या उलट टिळकांच्या लेखनात वरील सारे गुण आहेत. लो. टिळकांचें गीतारहस्य हें भारतीयांच्या धार्मिक विचारांचें श्रेष्ठ विद्यास्थान आहे. त्यांतील मध्यवर्ती कल्प-नेचा येथे परामर्श घ्यावयाचा आहे.

लोकमान्य टिळकांच्या प्रतिदनाचें सार असें आहेः—आत्मा-नात्म विवेकाने संपन्न अशी बुद्धि, हेंच धर्मनिर्णयाचें साधन होय. सर्वव्यापी एक आत्मा ज्याला ओळखता येतो, तो स्थितप्रज्ञ मनु-ष्यच आपल्या शुद्धबुद्धीने धर्मनिर्णय करण्यास समर्थ होतो. आत्मौ-पम्यबुद्धि किंवा आत्मानात्मविवेक हीच धर्माधर्म व नीतिअनीति

ठरविण्याची कसोटी होय. आपलाच आत्मा दुसऱ्याचे ठायी आहे, असें ज्यास प्रत्ययास येतें, तोच इतरांशी कसें वागावें, याचा निर्णय करू शकतो. आपणास जें इष्ट, हित व श्रेयस्कर असतें तेंच दुसऱ्यासही असतें, असें समजून स्थितप्रज्ञ वागत असतो. त्याचें वर्तन नेहमीच सत् असतें.

यावर असें म्हणणें आहे; वर आत्मा या संज्ञेची जी वस्तु लो. टिळकांनी सांगितली आहे, ती कशी आहे व त्याचा धर्माधर्माशी संबंध कसा पोचतो, हे प्रथमतः तपासलें पाहिजे. सगळ्यांचा आत्मा एक आहे, असें गृहीत धरल्यावर, सगळ्यांची सगळ्यांशी कर्तव्यें एकरूप असतात, असें मानावे लागेल. कारण त्या सर्वव्यापी आत्म्याशी कर्तव्याकर्तव्याच्या निर्णयाची सांगड टिळक घालतात. हा वेदांतील आत्मा चराचर पदार्थांत सर्वत्र समान, निर्विकार व सुखदुःखातीत आहे; तो मनुष्य, पशु, पक्षी, वृक्ष, कीट, पाषाण, तारका इत्यादि सजीव-निर्जीव सृष्टीत सारखाच समावलेला आहे; असें पटलें, कळलें, किंवा दिसलें म्हणून त्याच्या योगाने पिता-माता, पति-पत्नी, पुत्र-कन्या, आर्य-शूद्र, गुरु-शिष्य, राजा-प्रजा, मतदार-प्रतिनिधि, अध्यक्ष-सभासद इत्यादि विविध व विचित्र नात्यांनी भिन्न परिस्थितीत प्राप्त होणाऱ्या विविध व विचित्र कर्तव्याकर्तव्याचा निश्चय कसा होणार? निर्विकार व अलिप्त आत्म्याचा कर्माशी व कर्मफलाशी कांहीच संबंध पोहोचत नाही. तसेंच माणसात जो आत्मा आहे तोच दगडात आहे अथवा सोन्यात दगडात व लोखंडात एकच आत्मा आहे, असें

कळलें तर त्यामुळें सोनें दगड व लोखंड यांच्या संबंधी घडणाऱ्या मनुष्याच्या वर्तनात पूर्वीपेक्षा काय फरक पडणार ? त्या वर्तनाचा धर्माधर्माशी काय संबंध ? त्या त्या वस्तूच्या वैशिष्ट्यावर व वैचित्र्यावर त्या वस्तूविषयी घडणाऱ्या क्रियेचें स्वरूप अवलंबून असतें. त्यातील सर्वसामान्य एकजिनसी तत्वाशी त्या क्रियेचा संबंध नसतो. भिन्न देशकालपरिस्थितीत व भिन्न भिन्न सामाजिक संस्थेत व्यक्तीची व समुदायाची परस्परसंबंधी कर्तव्यें भिन्न होतात. दिक्कालातीत आत्म्याशी त्या कर्तव्यांचा काही संबंध नसतो.

यावर कोणी असें म्हणेल की, आत्मीयत्व व परकीयत्व या दोन भावनांमुळे कर्तव्याकर्तव्यात फार मोठा फरक पडतो. कुटुंब, जाति, राष्ट्र, वर्ग इत्यादिविषयक व्यापक किंवा संकुचित आत्मीयत्वबुद्धीनेच तद्विषयक कर्तव्यें मनुष्य पार पाडतो. आत्मबुद्धि किंवा अहंबुद्धि जितकी व्यापक असते, त्या मानाने कर्तव्याची श्रेष्ठताही अधिक असते. कुटुंबविषयक कर्तव्यापेक्षां जातिदेशादिविषयक कर्तव्यें अनुक्रमाने अधिक उच्च व उच्चतर मानली जातात. यावर उत्तर असें की, या आत्मीयत्वाचा किंवा आत्मत्वाचा अथवा अहंकाराचा सुख-दुःखादि परिणामांशी, इष्टानिष्टाशी, जयपराजयाशी व लाभालाभाशी संबंध असतो. या आत्मीयतेत किंवा अहंकारात सविकारता असते. ही एक वृत्ति आहे. यास अहंभाव म्हणता येईल. हा अहंभाव म्हणजे गीतेतील व गीतारहस्यातील कूटस्थनित्य आत्मा नव्हे; अथवा या अहंभावाचा विषयही हा आत्मा नव्हे. अहंभाव ही एक मनोवृत्ति आहे व तिचें आलंबन, व्यक्ति, कुटुंब, वर्ग, राष्ट्र, समाज

इत्यादि इन्द्रियगोचर वस्तू होत. या अहंभावाला इतिहास आहे, वाढ व घट आहे.

दुसरा आक्षेप असा कीं, सामान्य नीतितत्त्वांशी या वेदांतीय आत्मवस्तूचा काही संबंध नाही. धुकें, समुद्र, पर्जन्य, मृत्पाषाण, सुवर्णादि धातू वगैरे सुखसंवेदनारहित असलेल्या वस्तूतही हा निर्विकार आत्मा समावला आहे; परोपकार व अहिंसा या सामान्य नीतिधर्मांचा या आत्म्याशी काही संबंध नाही; कारण या आचारणाचा संबंध केवळ सुखदु:खसंवेदनक्षम सृष्टीशीच पोहोचतो. सजीव व अजीव अशा दोन्ही तऱ्हेच्या सृष्टीत भरून राहिलेल्या आत्म्याला कशाचीच बाधा होत नाही. त्याच्या दृष्टीने उपकार व अपकार, हिंसा व अहिंसा, हीं सर्व सारखींच होत. पापपुण्याचा संपर्क त्याला नसतो.

तिसरा आक्षेप असा कीं, यज्ञ, पूजा, व्रत, यात्रा, जप, होम भजन इत्यादि क्रियांशी या आत्म्याचा काही संबंध नाही. साधकापेक्षा उच्च अशा शक्तीची आराधना हेंच क्रियांचे स्वरूप होय. सर्वात्मबुद्धि प्राप्त झाली म्हणजे आराधना संपते, कारण आराध्याहून मी निराळा आहे, अशी भेदबुद्धीच आराधनेचें अधिष्ठान आहे.

चवथा आक्षेप असा कीं, त्या आत्मतत्त्वाचें अस्तित्व सिद्ध कसें करावयाचें ? शब्दप्रमाणानें कीं बुद्धिवादाने. ज्याची श्रद्धा

असेल तो शब्दप्रमाण मानील ज्याची नसेल त्यास बुद्धिवादानेच उत्तर दिलें पाहिजे. कूटस्थ नित्य आत्मवस्तु किंवा ईश्वर वगैरे गहन तत्त्वें ज्याने सिद्ध होतील असा युक्तिवाद सापडत नाही. ही गोष्ट बादरायण, कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांच्या सारख्या आत्मवादी तत्त्वज्ञान्यांनी स्पष्टपणे मान्य केली आहे. "तर्काप्रतिष्ठानात्" या ब्रम्हसूत्रात, बृहदारण्यक भाष्याच्या प्रस्तावनेंत आणि "तन्तु औपनिषदं पुरुषं पृच्छामि" या उपनिषद्वाक्याच्या चर्चेंत शंकराचार्यांनी हा मुद्दा नीट रीतीने उपपादिला आहे.

पांचवा आक्षेप असा कीं, गीतेत स्थितप्रज्ञाची जी स्थिति वर्णिलेली आहे, ती गीतारहस्याचा गाभा होय, ती स्थिति संभवते ही गोष्ट शब्दप्रामाण्याचा किंवा गूढवादाचा आश्रय केल्याशिवाय मान्य करता येणार नाही. विकाररहित मनःस्थिति केव्हांच असणें शक्य नाही. निद्रा व मूर्च्छा हे विकारच होत. उपदेश वासनाजन्य असतो. सत्याचा उपदेश करणारा स्थितप्रज्ञ वासनेशिवाय उपदेश कसा करू शकेल? यावरून गीतारहस्य हें गीतेच्या शब्दप्रामाण्यावरच आधारलेलें आहे, बुद्धिवादावर नव्हे, हें आपोआप सिद्ध होतें.

सहावा आक्षेप असा कीं, कर्तव्याकर्तव्यनिर्णय करावयास सामाजिक परिस्थितीच्या व कर्मविषयक कार्यकारणभावाच्या ज्ञानाची आवश्यकता असते, वैराग्याशी त्याचा काही संबंध नाही. वैराग्य असलें तरी हें ज्ञान होईलच असें नाही, व नसलें तरी तें होईलही.

उलट कोणत्याही समाजांतील किंवा वर्गातील कर्तृत्ववान् व विधिनिषेध सांगणारे पुरुष भावना व आकांक्षा यांनी संपन्नच असतात; पूर्ण विकारयुक्त असतात; कृष्ण, बुद्ध, महंमद, ख्रिस्त, शंकराचार्य इत्यादि व्यक्ति तर उच्चतर विकारविचारांच्या सरस मूर्तीच होत्या !

लो. टिळकांच्या विचारसरणीनंतर प्रो. राधाकृष्णन् यांच्या विचारसरणीचा परामर्श घेऊ. त्यांनी "पौर्वात्य धर्म व पाश्चात्य विचार" या पुस्तकांत धर्मविषयक अनेक गूढ व गंभीर विचार मांडले आहेत. त्या मांडणीत सैलपणा असल्यामुळे पुष्कळच गोंधळ आहे. त्यांना धर्माच्या बाबतीत शब्दप्रमाण, विशिष्ट संप्रदाय किंवा विशिष्ट परंपरा पूर्ण मान्य नाही; पण जगातील सगळे धर्मसंस्थापक व साधुसंत सामान्यतः मान्य आहेत. गूढ अध्यात्मवाद किंवा गूढानुभववाद त्यांच्या विचारसरणीचा पाया आहे.[१] ते जगातील धार्मिक विचारातील किंवा अनुभवातील विसंगतीची उपपत्ति न लावता त्या विसंगतीस गौण ठरवितात.[२] धर्माचा समाजविषयक व विश्वविषयक विज्ञानें आणि बुद्धिवाद यांच्याशी अविरोध आहे, असेंही ते सांगतात.[३] प्रसंगी सगळ्याच धर्मांना ते महत्व देतात, आणि कित्येक वेळा हिंदुधर्माला सर्वश्रेष्ठ ठरवितात. काही ठिकाणी जुन्या धर्मसंस्था, आतापर्यंतच्या सगळ्या धर्मसंस्था, जीर्ण झाल्या

---

(१) Eastern religion and Western thought, pp. 82–84 by Prof. Radhakrishnan.

(२) Ibid. Preface VIII–IX.

(३) Ibid. p. 294.

आहेत असें म्हणून त्यांचा परित्याग करून नवा गूढाध्यात्मवाद ( Mysticism ) हाच नवा विश्वधर्म होय, असेंही सांगतात. नवी शास्त्रें व नवा टीकात्मक बुद्धिवाद अत्यंत प्रभावी झाला आहे, म्हणून त्यांचा स्वीकार करावा, असेंही म्हणतात. त्यांना जुने धर्मग्रंथ आवडतात, आधुनिक बुद्धिवाद आकर्षितो, वैज्ञानिक विचारसरणीशी ते प्रणय करतात, आध्यात्मिक अस्पष्ट गूढ कल्पनांशीहि ते रमतात, आर्थिक पुनर्घटना करणाऱ्या समाजवादावरही ते खूष होतात, आणि ऐहिक भौतिक जीवनाला क्षुद्र मानून व भांडवलशाही किंवा कोणतीहि वर्गदास्यमूलक समाजरचना मान्य करणाऱ्या परलोकपरायण अध्यात्मवादालाही दृढ अलिंगन देतात.[1] या विसंगत, अव्यवस्थित, चवचाल व खुशालचेंडू विचारप्रवृत्तीचा परामर्श घेणें, मोठें अवघड काम आहे. प्रो. राधाकृष्णन् यांच्या लेखनात सद्गुण एवढाच आहे कीं, औदार्य आणि गोडवा ओतप्रोत भरून राहिला आहे. विसंगतीतही एकप्रकारच्या गहन वनाप्रमाणे शोभा आहे.

त्यांच्या एकाच विधानाची दिग्दर्शनार्थ थोडक्यात समीक्षा करणें येथें शक्य आहे. ते म्हणतात— " हिंदुधर्म बुद्धिवादाच्या साह्यानेंच धर्मवस्तूंची पारख करतो. त्यात मानवी जीवनातील घटनांचा विज्ञानदृष्टीने अभ्यास करण्याचा प्रयत्न असतो. या घटना म्हणजे आध्यात्मिक अज्ञानाच्या निद्रेत गाढ झोपलेल्या लोकांच्या बाह्य जयापजयाच्या घटना नव्हेत, तर जीवनात अत्यंत खोलवर दडलेल्या घटना होत.[2] " " आध्यात्मिक अज्ञानाची निद्रा " आणि

---

( १ ) Ibid. pp. 35, 48.

( २ ) Ibid. pp. 20–21.

" खोल घटना " या शब्दांनी विज्ञान व बुद्धिवाद या शब्दांचे प्रसिद्ध अर्थ बदलून टाकले. परलोकविषयक परमात्मदर्शी संवेदना हीच खरी बुद्धि ( Reason ) व विज्ञान-दृष्टि ( Scientific Spirit ) होय, असा याचा अर्थ होतो. कारण दुसरीकडे त्यांनी असें प्रतिपादले आहे कीं, "गूढ परमार्थदर्शन व परलोकपरायणवृत्ति ( Otherworldliness ) हाच धर्माचा मुख्य प्राण होय. हें जग नुसतें वरपांगी गौण व क्षुल्लक सत्य आहे. परलोक व परमात्मा हेंच परमसत्य होय. या सत्याचा शोध हेंच बुद्धिवादाचें व विज्ञानदृष्टीचें ध्येय होय. इन्द्रियगोचर विश्वाचा आणि ऐहिक जीवनाचा शोध व बोध घेणारा बुद्धिवाद व विज्ञान वरील दृष्टिकोन लक्षात ठेवता क्षुद्र व गौण ठरतें." याचें तात्पर्य एवढेंच ठरतें कीं, विज्ञानापेक्षा व बुद्धिवादापेक्षा गूढ आध्यात्मिक अनुभव व भावना याच श्रेष्ठ होत, असेंच प्रो. राधाकृष्णन् यांचें मत आहे. पण तें उघडपणे प्रतिपादण्याचें धैर्य व खंबीरपणा प्रो. राधाकृष्णन् यांचे ठिकाणी नाही, असें म्हणणें भाग पडतें. असें धैर्य पाश्चात्य पंडित विल्यम् जेम्सने दाखविलें आहे.

आधुनिक पाश्चात्यांची धर्मप्रमाणविषयक चर्चा; जेम्सचा दिव्यानुभववाद व फायरबाखचा मानव्यवाद

पाश्चात्य देशात अलीकडे पुष्कळच धर्ममीमांसक झाले आहेत. त्यातील दोन प्रख्यात पंडितांचे विचार मांडून हा विषय संपवितो. ते दोन पंडित विल्यम् जेम्स ( William James ) व लुडविक फायरबाख ( Ludwig - Feuerbach ) हे होत. जेम्सने " धर्मानुभवाचें वैचित्र्य " ( The Varieties of religious experience ) या प्रख्यात

ग्रंथात आपले विचार मांडले आहेत. त्यात त्याने पौर्वात्यांचे व पाश्चात्यांचे अर्वाचीन व प्राचीन धार्मिक विचार उध्दृत करून त्यांचें परिशीलन केलें आहे. त्याने प्राचीन भारतीयांच्या आध्यात्मिक विचारसरणीचेच आधुनिक वेषात विवरण केलें आहे. संघटित धर्मसंस्थांपेक्षा त्या संस्थातील व बाहेरील मानवांच्या खाजगी ( private ) धार्मिक अनुभवाना व भावनाना जेम्सने महत्त्व दिलें आहे. धर्माचे तो दोन विभाग करतो. एक संघटित धर्म ( Institutional religion ) व दुसरा वैयक्तिक अनुभवनिष्ठ धर्म ( Religion of experience ). त्याच्या सगळ्या म्हणण्याचें सार असें आहे [ १ ] मानवी अनुभवाचे दोन प्रकार पडतात. लौकिक व अलौकिक; लौकिक अनुभवाचें आलंबन दृश्य बाह्य विश्व होय. अलौकिक व गूढ अनुभवांचें आलंबन या बाह्याच्या पलीकडचें आतलें विश्व होय. धार्मिक अनुभव किंवा भावना खालटी स्थितीपासून तो सुधारलेल्या स्थितीपर्यंतच्या अनंत मानवांचे ठायी दिसून येतात; या अनुभवात व भावनात वैचित्र्य व वैविध्य आहे. वैचित्र्य व वैविध्य दोन कारणास्तव येतें. एक, अनुभव घेणाऱ्या मनाच्या प्राकृत किंवा सुसंस्कृत परिस्थितीतील तारतम्याने, आणि दुसरें, त्या अंतर्यामी अनंत विश्वाचा विविध व विचित्र आविर्भाव होतो, त्यामुळे. [२] हें अंतर्यामी विश्व, बाह्य विश्वापेक्षा अधिक विशाल, चिरंतन, मंगल, कल्याणमय व सत्य आहे. या बाह्य विश्वांतील घडामोडीना कारणीभूत अशा चैतन्य शक्तींचा

( १ ) The Varieties of religious experience, pp. 28-29, 485, 486.

अनंत अगाध असा संचयच तें होय. त्यासच देव, ब्रह्म व विश्वाचा खरा कायदा [ Law ] म्हणतात. [३] त्या महान् विश्वब्रह्माशी या अल्प जगाचें व जीवनाचें संवादित्व व मीलन करणे, हेंच आपलें परमध्येय किंवा निःश्रेयस होय. [४] त्याच्या भक्तीने व ऐक्यात्म्यानुभूतीने त्याच्यातील चैतन्यशक्ति प्रसन्न होऊन उसळतात, उच्चतर मानसिक सुखाला प्रसवितात आणि या जगात भौतिक इष्टकामसिद्धीसुद्धा करून देतात. [५] अशा स्थितीत विलक्षण धैर्य व उत्साह उत्पन्न होतो; जीवनात संगीत दुमदुमू लागतें व जादू भरून राहाते; अलौकिक पराक्रमाची स्फूर्ति होते; प्रेमाने भरलेली दृष्टि भोवतालच्या जगाला मार्दव ऋजुता व आर्द्रता आणते; अभयाचें आश्वासन लाभतें व मन चिरशांतीत व शाश्वत समाधीत मग्न होतें.

जेम्सचें वरील धर्मप्रवचन ऐकावयास गोड आहे. त्याने वरील विधानांच्या समर्थनार्थ एक नवीन युक्तिवाद रचला आहे. विज्ञान व बुद्धिवाद यांचा आश्रय घेऊन धर्मावर आक्षेप घेणाऱ्यांचें या नव्या युक्तिवादाने त्याने खंडन केलें आहे. हा युक्तिवाद म्हणजे फलवाद किंवा प्रयोजनवाद ( Pragmatism ) होय.

कोणताही अनुभव किंवा ज्ञान सत्य आहे म्हणजे काय या संबंधी ज्या अनेक उपपत्ति प्रसिद्ध आहेत, त्यापैकी फलवाद ही एक उपपत्ति आहे. कोणताही अनुभव किंवा ज्ञान सत्य असतें म्हणजे तें कार्यक्षम असतें, फलजनक असतें, असा याचा अर्थ आहे. परि-

णामावरून, फलावरून, कार्यक्षमतेवरून ज्ञानाची सत्यता सिद्ध होते. व्यवहार्यता, उपयुक्तता किंवा समाधानकारकता हीच सत्यतेची कसोटी होय. मृगजळाचें ज्ञान खोटें कां, तर आपणास त्याप्रमाणे वागल्यास फळ मिळत नाही म्हणून.

या फलवादाचा आधार घेऊन, जेम्स तार्किकांचे व भौतिकवाद्यांचे खंडण करितो. तो म्हणतो, आपल्या जीवनास भौतिकवादाची कल्पना उपयुक्त आहे कीं अध्यात्मवादाची, याचें उत्तर आपल्या भावनांचा तपास केल्याने मिळतें. भौतिकवादाप्रमाणे हें दृश्य जग जडशक्तीतून उत्पन्न झालें आहे, व तें त्याच शक्तींच्या संग्रामात केव्हां तरी नष्ट होणार आहे, तसेंच, देहविनाशानंतर सगळाच वैयक्तिक अनुभव संपतो. ही विचारसरणी सत्य मानल्यास आपल्या शाश्वत आनंदाच्या आकांक्षा व आपण चिरंतन मानलेली ध्येयें ढासळून पडतात, आणि निःश्रेयसाची आशा स्वप्नवत् विरते. उलट अध्यात्मवाद ( Spiritualism or Idealism ) खरा मानल्यास सगळ्यांची चिंता वाहणारा द्रष्टा ईश्वर स्वर्गांत बसला आहे, त्याच्या कृपेने श्रेयस् शिल्लक राहील, व शाश्वत कल्याण होईल, असें आश्वासन जीवास लाभते, म्हणून अध्यात्मवाद अधिक फलदायी अतएव सत्य होय.

जेम्सची ही सत्याची व्याख्या अपूर्ण व सदोष आहे, पण ह्या विषयाच्या विवेचनाचें हें स्थळ नव्हे. खोट्या व थोतांडी कल्पना विशिष्ट परिस्थितीत उपयोगी पडतात, म्हणून त्या सत्य होत,

असें समर्थन केलें, म्हणजे वेड्याच्या इस्पितळात डॉक्टरने मानसिक रोग्यास मारलेल्या गोड उपयोगी थापा सत्य आहेत, असें मानण्याची पाळी येईल. सगळ्या मनुष्यजातीस आजारी समजून व सगळ्या समाजास रोग्याचें इस्पितळ मानून, धार्मिक मिथ्या कल्पनांचा मानसोपचार करू इच्छिणाऱ्या या धर्मोपदेशक डॉक्टरांस असें सांगणे भाग आहे की, अगोदर स्वतःचा भ्रांतिरोग नाहीसा करा, व मानवजातीस तिचा उपसर्ग पोहोचू देऊ नका.

फायरबाखच्या धर्ममीमांसेत पाश्चात्यांच्या आणि पौर्वात्यांच्या सगळ्या आधुनिक धर्मोपपत्तींची समीक्षा साठविलेली आहे. कॅन्ट, हेगेल, काम्टे, श्लीरमाखर ( Shleiermacher ), जेम्स्, जॉन डयूई ( Dewy ) इत्यादि पंडितांच्या मूलभूत कल्पनांचाही परामर्श त्यात अंतर्भूत होतो.

सामाजिक मानसशास्त्र ( Group psychology ) आणि मानवजातिशास्त्र ( Anthropology ) यांतील धर्मसंशोधनाने ती उपोद्बलित ( Vindicated ) झाली आहे. "ख्रिश्चनधर्माचें रहस्य" ( Essence of Christianity ) या ग्रंथात त्याने आपली धर्मोपपत्ति मुख्य मांडली आहे. तिचें तात्पर्य असें आहे.

( १ ) जगातील प्रचलित धर्मकल्पना मनुष्यास कोणत्याही अलौकिक दिव्य विभूतींकडून प्राप्त झाल्या नाहीत. त्या मनुष्याच्या मनानेच घडविलेल्या आहेत. मानवी मनातील स्वाभाविक भाव-

नांनी ( Emotions or feelings ) व आकांक्षांनी बुद्धीच्या द्वारे त्या घडविल्या आहेत. अपरिमित, अनिर्बंध व न शमणाऱ्या भावना आणि अतृप्त असलेल्या सुप्त व प्रकट वासनाच धर्मासंबंधी अवास्तव कल्पनाना प्रसवितात. वासना व भावना ही बीजशक्ति होय. कल्पना हा आविष्कार होय हीच धर्मवस्तूची मुख्य कारणसामग्री होय.

मनुष्यास विज्ञानाच्या व तत्त्वज्ञानाच्या साहाय्यानेच भावना व वासना यांची वास्तविक पूर्ति करता येते. त्यांची पूर्ति करण्यास समर्थ असें विज्ञान किंवा तत्त्वज्ञान जेव्हां प्राप्त झालेलें नसतें किंवा अपुरें पडतें, तेव्हा प्रछन्न व प्रकट भावनांनी व वासनांनी बद्ध असलेलें मन विपर्यस्त व भ्रांतिमय असे अनुभव, कल्पना व विचार यांस निर्माण करतें. या भौतिक विश्वाच्या व त्यातील मनुष्य-पिण्डाच्या वास्तविक नियमांचे अज्ञान असल्यामुळे ज्या स्थितीत आपलें उद्दिष्ट सिद्ध करण्याची कुवत नसते, अशा वेळी परिस्थितीवर सत्ता चालविण्याच्या पोकळ महत्वाकांक्षेमुळे अंतःकरण आभासमय असें विश्व निर्माण करतें. या खोट्या मायावी व कल्पित विश्वाशी संबंध ठेवण्याचा प्रयत्न म्हणजे धर्म होय.

( २ ) या वास्तविक जगापेक्षा त्या धार्मिक जगात अद्‌भुत चमत्कार करणाऱ्या, भौतिक नियमाना कुंठित व बाधित करणाऱ्या व भौतिक विश्वावर कुरघोडी करणाऱ्या जादूमय शक्तींचा संचय असतो, तें या जगापेक्षा अधिक विशाल व प्रभावी असतें, कारण तें

( १ ) From Hegel to Marx, p. 235. by Sidney Hook.

संकल्पमात्रेंकरून निर्माण झालेलें असतें. संकल्पात व कल्पनेत वाटेल तें अघटित घडू शकतें. कविकल्पनेत काय कमी चमत्कार निर्माण झाले आहेत? या वास्तविक जगात जें इष्ट वाटतें पण पाहिजे तेवढें लाभत नाही, तेंच त्या कल्पनामय जगात मिळतें. अमरत्व, शाश्वत शांति, नित्यानंद ( Eternal happiness ) व कल्याणगुणघनता ( Virtues ) तेथे असते. सुधारलेल्या मानवी जीवाला याच ध्येयांची तळमळ लागलेली असते व त्या तळमळीमुळेच मनाने कळत वा न कळत ती निर्माण केलेली असतात. जें नसतें, पण पाहिजे असतें, तें असतेंच, असें धर्मसंस्थापकांनी गृहीत धरलेलें असतें. कॅन्टची सुद्धा धर्ममीमांसा याच चमत्कारिक रीतीची आहे. तो म्हणतो "अनंत सद्गुणांची ( Virtues ) आणि अमर्याद आनंदाची ( happiness ) मनुष्याला कायमची गरज भासते व ते प्राप्त होतील अशी नैतिक खात्री असते. सद्गुण व आनंद अनंत व अमर्याद आहेत, म्हणून ते भोगणारा जीवात्मा अमर असला पाहिजे. अमर्यादित गुण व आनंद यांची पूर्णता ज्यात झाली आहे अशी मूलभूत वस्तु ( The highest original good ) असली पाहिजे. ती वस्तु म्हणजे ईश्वर होय." या मांडणीतला दोष उघड आहे. हें म्हणणें खरें मानल्यास, जें पाहिजे, तें असतेंच, असें मानण्याची पाळी येईल.

( ३ ) धर्मात मनुष्याचा ध्येयवाद विपर्यस्त रीतीने प्रति-

---

( १ ) Introduction to kant's Philosophy, 279-282, by Clark.

बिंबित झालेला असतो. ध्येयवादात मनुष्याच्या स्वभावाचा निष्कर्ष उतरलेला असतो. अपूर्ण अशा शक्तींना व गुणांना पूर्णता आणण्याचा आणि मानवी जीवनातील, सामुदायिक व वैयक्तिक व्यवहारातील उणिवा भरून काढण्याचा प्रयत्न त्या ध्येयवादात समावलेला असतो. हा ध्येयवादच भ्रातिग्रस्त मनात देववाद ( Theology ) बनतो. सुधारलेल्या धर्मांतील व विशेषतः ख्रिश्चन धर्मातील ईश्वर म्हणजे मानवी सद्गुणांची उदात्त मूर्ती होय. ज्ञान, कला, नीति, मांगल्य, सौंदर्य यांचाच अतिशयोक्तीने कल्पिलेला समुच्चय कोठें तरी दुसरी-कडे आहे, अशी कल्पना म्हणजेच ईश्वराची कल्पना होय. उप-निषदातील ब्रह्म तरी काय आहे ? ज्ञान, आनंद आणि सत्य यांची पूर्णता हेंच ब्रह्म होय; ख्रिश्चन परमेश्वर प्रेमाची व कारुण्याची मूर्ति आणि पितृत्वाची परम सीमाच होय; अनंत ज्ञान, आनंद, मांगल्य, कर्तृत्व, कारुण्य, पितृत्व, मातृत्व, नेतृत्व इ. मानवी विशेषणेंच एकत्र करून ईश्वर बनविला आहे.

( ४ ) धर्माचें अलौकिक व दिव्य स्वरूप वस्तुस्थितीच्या विपर्यासातून निर्माण झालें आहे. भाबड्या व वेड्या मनाचें तें काव्यमय वेड आहे. सत्य नियमांच्या अज्ञानातून जन्मलेला तो भ्रम आहे, तें दिवास्वप्न किंवा जागृतीतील स्वप्न होय. हा भ्रम किंवा हें स्वप्न केवळ शून्यावर अथवा अभावावर आधारलेलें नाही. नेहमीच्या स्वप्नांचे मनन केल्यास असेंच दिसून येईल. स्वप्न हें याच खऱ्या पृथ्वी-

---

(१) Ibid. p. 244.
(२) Ibid. p. 246.

वरील सत्य अनुभवांचे विकृत व विसंगत रूपांतर असते. खऱ्या वस्तूंतच उलटापालट व गोंधळ होऊन स्वप्न बनलेलें असतें. धर्म-स्वप्नही असेंच आहे. अलौकिक, दिव्य किंवा पारलौकिक वस्तूंचे नीट सावधगिरीने पृथक्करण व परीक्षण करावें, म्हणजे असें दिसून येईल कीं, अलौकिक हें लौकिकाचें, दिव्य हें भौतिकाचें व पारलौकिक हें इहलोकाचेंच कळत वा न कळत, गफलतीने, विपर्यासाने निर्मिलेलें मानसिक चित्र होय.

( ५ ) धार्मिक विपर्यासाच्या पोटात मानवामानवातले जे गोड व श्रेयस्कर संबंध झाकलेले आहेत, तोच खरा धर्म होय, तेंच खरें ध्येय होय. ध्येयाकरिता वैयक्तिक जीवनाला तृणवत् मानून झटणारे लोकच खरे धार्मिक होत; मग तें ध्येय कोणतेंही असो. या भौतिक पिण्डाची आस्था न बाळगता विश्वाचे म्हणजे मानवामानवांचे संबंध प्रेमाचे व जिव्हाळ्याचे व्हावे याकरिता देहाची कुरवंडी करणारे पुरुषच धार्मिक होत. प्रेम हाच खरा धर्म. धर्माला स्वर्गातून भूलोकात आणावे, हाच तत्त्वज्ञानाचा उद्देश असला पाहिजे. जॉन ड्यूईनेही असेंच म्हटलें आहे.

[ ६ ] विज्ञानें[१] ( Science ) आणि तत्वज्ञान ( Philosophy ) यांच्या आश्रयाने मनुष्यजातीचे जीवन यशस्वी व दैन्यहीन बनविणें हेंच खरें ध्येय होय. या ध्येयाला फायरबाख् विज्ञानशुद्ध मानव्यवाद ( Scientific humanism ) असें म्हणतो.

---

(१) From Hegel to Marx, pp. 222–223.

धर्माने मानवी जीवनास उदात्त बनविण्याचा प्रयत्न केला आहे. एवढेंच काय तें धर्मात तथ्य आहे, बाकी सगळें थोतांडच आहे. ह्या धार्मिक थोतांडाने मनुष्याचें प्रत्यक्ष जीवित अधोगतीस लागलें आहे. धर्मातील स्वर्गमोक्षाच्या कल्पनांच्या ऐवजी ऐहिक राजकीय व सामाजिक परिस्थितीत प्रत्यक्ष सुधारणा करणाऱ्या तत्वज्ञानाची मनुष्यास गरज आहे. ईश्वराच्या अस्तित्वनास्तित्वाच्या प्रश्नापेक्षा मनुष्यजातीच्या अस्तित्वनास्तित्वाच्या प्रश्नाचे चिंतन अधिक श्रेयस्कर आहे. आत्मा अमर किंवा स्वतंत्र आहे कीं नाही, या चर्चेपेक्षा मनुष्य जातीचें हें अल्प जीवन सह्य व साजरें कसें करावें, हाच खरा जिव्हाळयाचा प्रश्न आहे. मरणानंतर काय व कसें होईल या पेक्षा मरणापूर्वी काय होईल व कसें होईल, याची चिंता मनुष्य जातीस लागून राहिली आहे. पूजेने व श्राद्धाने देव आणि पितर तृप्त होतात कीं नाही, त्यांना अन्न व पाणी पोहो-चतें कीं नाही, या विचारापेक्षा सगळ्या माणसांना अन्न, पाणि, वस्त्र, पात्र, गृह, औषध व शिक्षण नीटपणें कसें मिळेल व जन-तेच्या दुःखदारिद्र्याचा प्रश्न कसा मिटेल, हाच विचार महत्वाचा आहे. परलोकच्या न्यायापेक्षा व परमेश्वरविषयक कर्तव्यापेक्षा इह-लोकच्या न्यायाला व मानवसमाजविषयक कर्तव्याला मुख्य स्थान दिलें पाहिजे.

फायरबाख पूर्ण भौतिकवादी आहे. जीवाचें आत्म्याचें किंवा अंतःकरणाचें देहाव्यतिरिक्त स्वतंत्र अस्तित्व त्याला मान्य नाही. सगळ्या मनुष्य जातीचा संसार सुखी व सोज्वळ होऊन मनु-

ष्याच्या सगळ्या सद्‌गुणांची वाढ व्हावी, मानव जात एका जिवाभावाने नांदावी आणि सामाजिक वर्गदास्याचा अंत व्हावा, या ध्येयाचा त्याने पुरस्कार केला आहे. मानव्यवादाचा ( Humanism ) परिष्कार ( Comprehensive statement with examination ) करून, जगाच्या तत्त्वज्ञानात त्याने थोर कल्पनेची भर घातली आहे. पण त्याच्या विचारसरणीत एक महत्त्वाचा दोष राहिला आहे. तो म्हणतो कीं, ज्यात अलौकिक किंवा पारलौकिक कल्पनांचा संबंध नाही, अशा खऱ्या मानव्यपूजक धर्माची प्रस्थापना केली पाहिजे. अलौकिक ( Supernatural ) शक्तीची कल्पना ज्यात नाही त्या संस्थेस, धर्म कसें म्हणतां येईल ? असें म्हणणे म्हणजे इतिहासास खरी कादंबरी, रसायन शास्त्रास खरा जादुटोणा, विद्यापीठास खरी मशीद खरें चर्च किंवा खरें देऊळ आणि संसारास खरें नाटक म्हणण्यासारखें आहे. शब्दांचा ताणून अतिव्यापक अर्थ केल्यामुळे घोटाळा माजतो व संधिसाधू लोकांचे फावते.

ध्येयच देव नव्हे, वा. म. जोशी यांचा परामर्श

महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध वाङ्मयकार वामन मल्हार जोशी यांनी सुद्धा ध्येय व देव या संबंधी असाच किंचित घोटाळा केला आहे. ध्येय हाच देव होय, व त्या ध्येयाच्या प्राप्तीचा मार्ग म्हणजेच देवपूजा होय, व तेंच सदाचरण होय, असें " नीतिशास्त्रप्रवेशा " च्या परिशिष्ट प्रकरणांत त्यांनी प्रतिपादिलें आहे. देव हा मनुष्याचा व सृष्टीचा कर्ता म्हणून मानलेला असतो, त्याचें मनुष्याच्या अस्तित्वाच्या अगोदरच अस्तित्व कल्पिलेलें असतें. ध्येय मात्र तसें

नसतें; ध्येय म्हणजे माणसाने कल्पिलेलें साध्य होय. तें मनुष्याच्या व जगाच्या अस्तित्वाचें कारण नसतें. ध्येय व देव यांत हाच फरक आहे. ध्येयरूप किंवा आदर्श मानलेले गुण किंवा शक्ति देवाच्या ठायी आरोपित केलेल्या असतात ही गोष्ट खरी; पण देव ही स्वतंत्र व स्वयंसिद्ध म्हणून कल्पिलेली वस्तू आहे. ध्येय तसें नसते, तें साध्य असतें, सिद्ध नसतें. देव अगोदरच स्वतःसिद्ध असतो. ध्येयें मनुष्यजातीस समजू लागल्यावरच देवाच्या स्थानी ध्येयें येतात. ध्येय हा देव नव्हे, देवाच्या ऐवजी ध्येय येतें. जॉन् ड्यूईने प्रो. जोशी यांच्या सारखीच कल्पना मांडली आहे. ( Intelligence in the modern world philosophy page 1036–37 ).



*

*

व्याख्यान तिसरें

# हिंदुधर्माचें स्वरूप

**इहपरसंगति; तीन पक्ष :—ऐहिकवाद पारमार्थिकवाद व उभयवाद.**

ऐहिक मानवी व्यवहारांची व्यवस्था, लोकयात्रा किंवा समाजधारणा ज्याच्याने सिद्ध होते असा नियमसमुच्चय किंवा कायदा ( Law ), हेंच हिंदुधर्माचें वास्तविक स्वरूप होय, असें म्हणणारा पक्ष आज अस्तित्वात आहे. असा पक्ष महाभारतकाळी सुद्धा अस्तित्वात होता. या पक्षाचें म्हणणें असें आहे; चातुर्वर्ण्य, देशजातिकुलधर्म, आश्रमव्यवस्था, सत्य अहिंसा इत्यादि मुख्य नीतिधर्म, व्यवहारधर्म व राजधर्म यानाच हिंदुधर्मात प्राधान्य आहे, कारण प्रजाधारणा हेंच हिंदुधर्माचें साध्य आहे. अलौकिक ( Supernatural ) दैवी आध्यात्मिक शक्तींची आराधना आणि पारलौकिक कल्पना हा हिंदुधर्माचा मुख्य भाग नाही; तो गौण आहे. या पक्षाचे काही लोक असेंही प्रतिपादन करितात कीं, ईश्वर, परलोक, पापपुण्य, अवतार, विभूति, योगशक्ति, देवता इत्यादि पदार्थ केवळ सांकेतिक कल्पनांनी निर्मिले आहेत. सामान्य लोकांनी समाजाचे कायदे योग्य रीतीने पाळावे म्हणून कल्पिलेले हे संकेत आहेत. कारण परलोकाचें भय व प्रलोभन लोकास कायदे पाळण्यास प्रवृत्त करतें.

दुसरा पक्ष असें म्हणतो कीं, इह व पर किंवा प्रपंच व परमार्थ साधण्याचा मार्ग हेंच हिंदुधर्माचें स्वरूप होय. या जन्मात योगक्षेम चालावा आणि मरणोत्तर स्थितीत श्रेयस् प्राप्त व्हावें, या उद्देशानेच श्रुतिस्मृतिपुराणें हिंदुधर्माचें प्रतिपादन करितात. याच दृष्टीने चतुर्विध पुरुषार्थ किंवा त्रिवर्ग महाभारतात आणि स्मृतीत उपदेशिले आहेत. स्मृतीतील धर्मशास्त्राचा हेतु अभ्युदय व निःश्रेयस अथवा उभय लोकांचे कल्याण साधकास प्राप्त करून देणे हाच आहे. उदाहरणार्थ, गृहस्थधर्माच्या आचरणाने कुटुंब-धारणाही होते, व चित्तशुद्धि होऊन स्वर्गमोक्षाचा मार्गही सुगम होतो, असें धर्मशास्त्र सांगतें.

तिसरा पक्ष म्हणतो कीं, हिंदुधर्म हा पूर्ण आध्यात्मिक धर्म आहे; आत्मप्राप्ति, निर्वाण, मोक्ष किंवा पारमार्थिक कल्याण ह्याच मुख्य उद्देशाकडे नेणारा मार्ग, हेंच हिंदुधर्माचें स्वरूप होय. अर्थ, काम, शरीरसंरक्षण, समाजधारणा इत्यादि ऐहिक ध्येयें हे हिंदु-धर्माचें गौण उद्देश आहेत. ते बद्ध, मूढ, अप्रगल्भ व बालबुद्धि मंदाधिकाऱ्यांकरिता आहेत. वस्तुत: जीव हा मोक्षमार्गाचाच प्रवासी आहे. हा जन्म व हें ऐहिक जीवन मधल्या तात्पुरत्या मुक्कामाची जागा किंवा सराई आहे. मोक्षमार्ग अचूक दाखविणे हें हिंदुधर्माचें कार्य आहे. दुसऱ्या दृष्टान्तानें सांगावयाचे म्हणजे, संसारनिद्रा समाप्त व्हावी आणि आत्मदर्शनाची जागृति व्हावी, अथवा संसार-रात्र सरावी आणि ब्रह्मप्राप्तीचा दिवस उगवावा, हेंच हिंदुधर्माचें साध्य आहे. वेदान्ती, शैव, वैष्णव, भागवत इत्यादि संप्रदाय व आधुनिक अध्यात्मवादी हिंदु पंडित या पक्षाचें समर्थन करितात.

हिंदुधर्माचे ध्येय ऐहिकच आहे असें म्हणणाऱ्या पक्षाचे परीक्षण

या तीन पक्षांपैकी पहिला पक्ष असमर्थनीय आहे. दुसरे दोन पक्षच आजपर्यंत रूढ असलेल्या हिंदुधर्माच्या वास्तविक स्वरूपाचें कमि-जास्त प्रमाणात वर्णन करतात. ज्या पद्धतीने आणि ज्या अर्थाने पहिला पक्ष समाजधारणात्मकच हिंदु-धर्म आहे, असें सिद्ध करतो, ती पद्धति व तो अर्थ चूक आहे. अतिप्राचीन काळापासून आतापर्यंतच्या हिंदुलोकांच्या आचारात व विचारात ह्या पद्धतीचा व ह्या अर्थाचा धर्म केव्हाही अमलात नव्हता. क्वचिद् अपवाद सोडल्यास, हिंदुधर्माचे प्रवर्तक, उपदेशक, ग्रंथ व गुरू वरील पक्षाच्या विरुद्ध असलेल्या कल्पनांचें व तत्त्वांचेंच प्रतिपादन करितात. वेदातील यज्ञ किंवा कर्मकांड म्हणजे देवतांची आराधना किंवा साधनाच होय. उप-निषदें तर ब्रम्ह, आत्मा, परलोकमार्ग, अमरत्व स्वर्गापवर्ग आणि अदृष्टकर्मविपाक यांचाच उपदेश करितात. स्मृति अथवा धर्मशास्त्रें वैदिक अध्यात्मवादाच्या अनुसंधानाने वर्णाश्रमधर्माचा व आचार व्यवहार प्रायश्चित्तांचा आदेश देतात, आणि त्याच दृष्टीने पुराणात व आगमात व्रतें, यात्रा व उपासना यांचें विधांन शास्त्रकार कर-तात. एवढें मात्र खरें कीं, पारलौकिक अथवा आध्यात्मिक भाव-नांच्या आवरणाखाली किंवा अवगुंठनाखाली सामाजिक भौतिक-जीवनाचें स्वरूप आणि नियम दडलेले आहेत. मात्र अदृष्ट-दैवी-कल्पना हे केवळ धर्मसंस्थापकांचे संकेत नव्हेत, तर त्या धर्म-संस्थापकांच्या आणि धर्माचार्यांच्या मतें सत्य कल्पना आहेत.

या पक्षाचे काही अध्वर्यु असें म्हणतात कीं, वैदिकधर्म

विशेषतः ऋग्वेदातील धर्म ऐहिकप्रधान धर्म आहेत, म्हणून त्यांचाच पुरस्कार करण्याची आज वेळ आली आहे. आरोग्य, दीर्घायुष्य, बल, वीर्य, पराक्रम, विजय, शत्रुनाश, कीर्ति, कवित्व, विद्वत्ता, मानसिक आनंद, पर्जन्य, पशु, सस्य, सुवर्णादि धन, भार्या, पुत्र इत्यादि ऐहिक साध्यांच्या प्रार्थनेने व कामनेने वैदिक वाङ्मय भरून गेलें आहे. त्यातील देवता भौतिक शक्तीच होत. वैदिक-धर्म हा भौतिकवादी धर्म आहे. हिंदुसमाजाची यापुढे भौतिक प्रगति करण्याची प्रेरणा वेदाकडूनच मिळेल. वेद अभ्युदयाचे मार्ग-दर्शक होत, व वेदान्त निःश्रेयसाचे मार्गदर्शक होत. प्रस्तुतच्या पराभूत व अवनत स्थितीतून बाहेर पडण्याकरिता, हिंदुसमाजाने अदृष्टवादी, निवृत्तमार्गी व भक्तिपंथी स्मृतिपुराणांचा व संतांचा हिंदुधर्म टाकून द्यावा व हजारो वर्षे मागे पडलेल्या वैदिक ध-र्माची पुनः स्थापना करावी; स्मार्त व पौराण धर्मात सुधारणा करावी. वेदांकडे पुनः परत फिरा ! ( back to vedas ), असा संदेश सर्व हिंदूंना देण्याची वेळ आली आहे.

या विचारसरणीत दोष आहेत. ऐहिकध्येयपर धर्म पारलौ-किक धर्मापेक्षा हीन संस्कृतीचा व प्राकृत सामाजिक स्थितीचा आहे. आजचें मानवजातिशास्त्र असें सांगतें कीं, ऐहिक-ध्ये-यवादी धर्म प्राथमिक स्थितीतील समाजात असतात. पारलौकिक व पारमार्थिक तत्त्वांच्या कल्पनांवर अधिष्ठित असलेले धर्म त्यापेक्षा अधिक सुधारलेल्या समाजातच उत्पन्न झाले आहेत. हा मुद्दा अ-धिक सुलभ रीतीने असा मांडता येईल---

ऐहिकध्येयवादी धर्मात अशी कल्पना असते की, मनुष्याच्या नेहमीच्या ऐहिक व्यवहारात दैवी शक्तींचा हात असतो, त्या शक्तींच्या साहाय्याने व कृपेनेच इष्ट फलें प्राप्त होतात, व त्यांच्या कोपानेंच संकटें व अनिष्ट फलें प्राप्त होतात. हा धर्म, ऐहिक व्यवहारावर अलौकिक चमत्कार करणाऱ्या लहरी शक्तींचाच अंमल आहे, अशा कल्पनेवर उभारलेला असतो. सृष्टीतील यांत्रिक पद्धतीने चालणारे भौतिक कार्यकारणभावाचे अबाधित नियम धर्मास ठाऊक नसतात. दृष्टवादी आणि ऐहिक समाजधारणावादी विज्ञानशुद्ध ( Scientific ) विचार ज्यांना पाहिजे आहेत, त्यांच्या दृष्टीने वेदांचा मार्ग निखालस धोक्याचा आहे. नव्हे अगदी उलट आहे. वेदांनी वैभवविषयक व अभ्युदयविषयक ज्या प्रार्थना केल्या आहेत, त्या कोणाच्या पाशी केल्या आहेत? देवतांच्या पाशी. देवता म्हणजे भौतिक शक्ति नव्हेत, तर त्या शक्तींच्या ठायीं भ्रांतीने आरोपित केलेल्या चेतन, ज्ञात्या व विकारशील व्यक्ति होत. भौतिकशक्ति प्रार्थना ऐकत नाहीत व त्यामुळें प्रसन्नही होत नाहीत. वृक्षाची प्रार्थना केली असता, तो फळ देतो काय? प्रार्थनेने एंजिन किंवा यंत्र काम देते काय? तसेंच निसर्गशक्तीचें आहे. वैदिक धर्मातील अभ्युदयकारक कर्में म्हणजे मंत्रपठण, होम व जप होत. ही कर्में अदृष्टाच्या द्वारेंच किंवा देवताप्रसादानेच इष्ट ऐहिक फल प्रसवतात; अशी वैदिक लोकांची समजूत होती. जादूटोणा, नवससायास, मंत्रतंत्र, फलज्योतिष, या गोष्टीसुद्धा केवळ ऐहिक इष्ट फलांकरिताच माणसाने निर्माण केल्या आहेत. त्यावरील श्रद्धा व वेदोक्त कर्मकाण्डावरील श्रद्धा एकाच तऱ्हेची आहे. वेदोक्त अभ्यु-

दयमार्गावरील श्रद्धा मागासलेल्या खालच्या दर्जाच्या प्राकृत भाबड्या बुद्धीचेंच लक्षण आहे. कारण त्यातील कार्यकारणभावासंबंधी कल्पना भौतिक जगातील वास्तविक कार्यकारणभावाच्या पूर्ण अज्ञानापासून जन्मली आहे. साथीचे रोग निवारण करण्याकरिता मातांच्या, जरीआईमरीआईच्या, आराधनेत तीच वैदिक कल्पना आहे. या वैदिक धर्मापेक्षा परलोकप्रधान पारमार्थिक धर्मच अधिक बौद्धिक विकासाचें लक्षण होय. कारण ऐहिक घडामोडीत दैवी कार्यकारणभावापेक्षा भौतिक कार्यकारणभावाला तो धर्म प्राधान्य देतो. धर्माने चित्तशुद्ध होऊन अदृष्टद्वारा पारलौकिक श्रेयस् किंवा मोक्ष मिळतो, 'आणि ऐहिक फलाकरितां कृषि, शिल्प, वाणिज्य, युद्ध, राज्यव्यवहार इत्यादि कर्में केली पाहिजेत आणि नीतिनियमही पाळले पाहिजेत, अशी दृष्टि या पारलौकिक धर्मात असते. वैदिक यज्ञधर्मास अवनति आल्यानंतरच भारतीय समाजात दर्शनें व विद्या उत्पन्न झाल्या. वैदिक युगाच्या शेवटी उपनिषदें उत्पन्न झाली. त्यांनी वैदिक कल्पनात क्रांति केली, वेदाचा अंत केला, व पुढील बौद्धिक प्रगतीचा मार्ग तयार केला.

इह व पर अशी उभय प्रयोजनें मानणाऱ्या पक्षाचें समालोचन

इह व पर असें उभय प्रयोजन धरून हिंदुधर्माची रचना झाली आहे; असें मानणारा दुसरा पक्षच हिंदुधर्माच्या वास्तविक स्वरूपाचें आकलन करितो. हिंदुधर्मशास्त्रात काही साधनें अदृष्टार्थ, काही दृष्टार्थ आणि काही उभयार्थ सांगितली आहेत, असें एका पुराणात सांगितलें आहे. दृष्ट म्हणजे

प्रत्यक्ष, अर्थ म्हणजे फल किंवा प्रयोजन; (१) दृष्टार्थ म्हणजे ज्या साधनाचें फल प्रत्यक्ष कळणारें असतें असें साधन. उदाहरणार्थ कृषि, शिल्प, वाणिज्य, युद्ध, राजव्यवहार इत्यादि कर्में दृष्टार्थ आहेत, या कर्मांची व्यवस्था शास्त्र सांगत असतें. ती व्यवस्था मोडणाऱ्यास अदृष्ट असें अहित प्राप्त होतें, असें शास्त्र सांगतें. (२) अदृष्टार्थ म्हणजे ज्यानें अप्रत्यक्ष अशीच फलसिद्धि प्राप्त होते असें साधन. येथें साध्य व साधन यांचा संबंध प्रत्यक्ष व अनुमान यांनी म्हणजे स्वबुद्धीने मनुष्यास कळत नाही, केवळ शब्दप्रमाणानेच तो कळतो. उदाहरणार्थ देवपितृयज्ञ, पूजन, भजन, व्रत, जप इत्यादि कर्में अदृष्टार्थ होत. या कर्मांपासून ऐहिक किंवा पारमार्थिक अशी जीं फळें प्राप्त होतात, त्यांचा व कर्मांचा संबंध शब्दप्रमाणामुळेच[1] कळतो. पर्जन्य, पुत्र, रोगनिवारण, शत्रुनाश, उच्चकुळात जन्म, स्वर्ग इत्यादि फळें वरील कर्मांनी प्राप्त होतात; हें शब्दप्रमाणावर श्रद्धा असलेल्या मनुष्यासच खरें वाटतें. या अदृष्ट कार्यकारणभावाच्या विचारसरणीत पापपुण्य, स्वर्गनरक, देवासुर, ईश्वर, मोक्ष, आत्मा, पुनर्जन्म इत्यादि कल्पनांचा अन्तर्भाव होतो. धार्मिक शब्दप्रमाणाचा किंवा श्रद्धेचा हाच विषय होय. (३) उभयार्थ म्हणजे ज्या कर्मांचा साध्यसाधनभाव दृष्ट व अदृष्ट असा दोन्ही तऱ्हेचा आहे. उदाहरणार्थ, विवाहधर्म; रति व प्रजा हें विवाहाचें दृष्ट प्रयोजन होय; आणि देवपितृलोकप्राप्ति व पितृऋणमुक्ति हीं अदृष्टफळें होत. साध्य व साधन यांचा अदृष्ट संबंध म्हणजेच पापपुण्य अथवा ईश्वराचा अनुग्रह किंवा कोप होय.

---

(१) श्रेयःसाधनता ह्येषां नित्यं वेदात् प्रतीयते । श्लो. वा. १।१।३.

पापपुण्याची बुद्धिवादी उपपत्ति काही आधुनिक धर्मसमर्थक लोक अशी सांगतात—– ज्या आचरणाने व्यक्तीचे किंवा ती व्यक्ति ज्या समुदायाची घटक आहे त्या समुदायाचें हित होतेंच असें दीर्घकालीन जीवनाचा आढावा काढल्यास निश्चित करता येतें, त्या प्रकारचें आचरण पुण्यकारक होय. खोलवर विचार केल्यासच आणि विविध परिस्थितीचा अभ्यास केल्यानेच अशा तऱ्हेचा आढावा काढता येतो. अनभ्यासी व संकुचित बुद्धीला नजीकच्या इष्टांचा व अनिष्टांचाच अजमास घेता येतो, म्हणून शास्त्रें मननशील व अभ्यासी साधूनीच लिहिली आहेत. अदृष्टार्थ साधनें म्हणजे प्राकृत संकुचित बुद्धीला न कळणारी साधनें होत. तात्पुरत्या सुखाला प्रसवणारी कर्में दूरवर विचार केल्यास पुष्कळ वेळा परिणामी अनिष्टकारक होतात; त्यांसच शास्त्रकार पापकर्में असें संबोधितात.

परोपकार, सत्य, अहिंसा इत्यादि नैतिक नियम पुण्याचें व परमार्थाचें मूळ आहेत, असें शास्त्र सांगतें. आश्रमव्यवस्था, इंद्रियसंयम इत्यादिकांचा शास्त्राने उपदेश केला आहे. आत्मौपम्य दृष्टीने सर्वांशी जो व्यवहार करितो त्याला मरणोत्तर शाश्वत सुख प्राप्त होतें, असें भारत सांगतें. हिंसेने परधनापहाराने व परदारागमनाने मनुष्य पतित होतात, असें सर्व स्मृतिकार सांगतात. आपण सगळ्या जीविताचें पर्यालोचन केल्यास असें दिसेल कीं, वरील विधिनिषेधांच्या पालनाने अनंत व्यक्ति व एकंदर समाज यांचें हितच होतें. आणि तसें आचरण न केल्यास व्यक्तीस व

समाजास दुर्गतीच भोगावी लागते. इंद्रियसंयम न करणारे लोक अल्पायु होतात, किंवा तीव्र व दीर्घ रोगांनी ग्रस्त होतात, ही गोष्ट व्यापक अनुभवाने सिद्ध होते, म्हणून पाप व पुण्य यांचे स्वरूप मनुष्यबुद्धीस मननाने व अनुभवाने शास्त्रप्रामाण्यावाचून आकलन करता येतें असें म्हणणेंच योग्य आहे. तसें आकलन करणाऱ्या सज्जनानीच धर्मशास्त्रें प्रणीत केली आहेत.

हें मत तितकेसें ग्राह्य नाही; हें मत अंशतःच खरें आहे. समाजांतील जाणत्या व कर्त्या व्यक्तीनीच धर्मग्रन्थ व धर्मपन्थ निर्माण केले आहेत, ही गोष्ट पुष्कळ अंशी खरी आहे. पण या मताने केलेला अदृष्टाचा अर्थ बरोबर नाही. पुण्याने उच्चजन्म किंवा मृत्यूनंतर स्वर्ग प्राप्त होतो, आणि पापाने हीन जन्म किंवा नरक प्राप्त होतो, या शास्त्रोक्त विधानातील पापपुण्यें मनुष्यांनी स्वबुद्धीने विद्यमान तर्कशास्त्राचे नियम लागू करून निश्चित केली आहेत, असें म्हणता येत नाही. मंत्र, जप, होम, यज्ञ, देवतांचा अभिषेक, मूर्तिपूजा इत्यादि क्रियांचा पुण्यरूप परिणाम मृत्यूनंतर किंवा या जन्मी फळास येतो, ही गोष्ट बुद्धिवादाने निश्चित करता येत नाही. देवता, ग्रह, राक्षस, मंत्रसामर्थ्य इत्यादि अलौकिक शक्ति गृहीत धरूनच शास्त्रात अनेक विधि सांगितले आहेत. असें न मानल्यास शास्त्रोक्त विधिनिषेधांचा फार मोठा भाग व्यर्थ व प्रमत्तप्रलपित ठरतो. खरोखरच वरील अदृष्टशक्तींबद्दल भोळा विश्वास असलेल्या व्यक्तीनीच धर्ममार्ग प्रवृत्त केले आहेत. ही गोष्ट मोकळ्या मनाने कबूल करण्यातच भावी समाजधारणा साधता येईल.

हिंदुधर्मशास्त्रातील बराच भाग परलोकसंबंधी भ्रांति झालेल्या व्यक्तींनीच लिहिला आहे; एवढेंच नव्हे तर विशिष्ट वर्गाचा स्वार्थ साधणाऱ्या सत्ताधाऱ्यांचाहि त्यात बराच हात आहे. त्रैवर्णिक आर्यांच्या गुलामगिरीत शूद्रांना ठेऊं इच्छिणाऱ्या व्यक्तींनी हें धर्मशास्त्र लिहिलें आहे. शूद्रांना दास्यांत ठेवणे, त्रैवर्णिकांची सत्ता राखणे आणि पुरोहित वर्गाचें वरिष्ठत्व कायम करणे या तीन तत्त्वावर उभारलेल्या समाजरचनेचेंच हें धर्मशास्त्र आहे.

अध्यात्मवादी पक्षाचें परीक्षण

हिंदुधर्माची अध्यात्मपरायणता वर्णन करणारा तिसरा पक्ष हिंदुधर्माच्याच परिणतीचें एक स्वरूप होय. हिंदुधर्माच्या वास्तविक स्वरूपाचें संपूर्णसमावेशन या पक्षात होत नाही. हें मात्र खरें कीं ही एक हिंदुधर्माची प्रमुख बाजू होय. आजकाल याच पक्षाची हिंदूतील बहुजनसमाजाच्या मनावर आणि शिक्षित बहुमतावर छाप आहे.

या पक्षाच्या गूढ व पारलौकिक कल्पनांचें निराकरण करणे हें आजचें मोठे सामाजिक कर्तव्य होय. त्या शिवाय हिंदुसमाजाच्या विद्यमान वास्तविक परिस्थितीचें म्हणजे भौतिक व मानसिक जीवनाचें समीक्षण करण्याच्या मार्गातील अंतराय दूर होणार नाही. स्वर्गाच्या समीक्षेंतून भूलोकाची समीक्षा व धर्माच्या समीक्षेतून न्यायाची, हक्कांची किंवा अधिकाराची समीक्षा निर्माण होते.

---

(१) Hegelian philosophy of Right, an Essay by **Karl Marx.**

कारण या आध्यात्मिक-पारलौकिक परिस्थितीच्या आभासाखाली वास्तविक जीवनातील दुर्गति लपलेली असते. ह्या आभासामुळें मनुष्याने स्वतःची व स्वजातीची फसवणूक केली आहे. ह्या आभासात तरल व स्वच्छंदी प्रतिभा भावुक व मोहक रंगांनी दिव्य जीवनाची आणि पारलौकिक-अलौकिक शक्तींची चमत्कृतीपूर्ण चित्रें रंगवून वस्तुस्थितीचें हिडीस व अमंगळ स्वरूप झाकून टाकते. गंभीर परंतु पोकळ असलेल्या सत्यशून्य तत्त्वज्ञानाच्या पार्श्वभूमीत त्या आभासाचें रंगमंदिर उभारलेलें असतें. ह्या आभासाचा निरास झाल्याशिवाय दीर्घकालीन सामाजिक दुर्गतीचा प्रतिकार करणारी विचारसरणी प्रभावी होत नाही व करणी सफल होत नाही. परलोकवाद व आध्यात्मवाद हा भारतीय समाजातील अनंत दुःखी जीवांच्या अश्रुमालांना झाकून टाकणारा एक पडदा आहे. अज्ञान, दास्य आणि दैन्य यांच्या खोल गर्तेत कण्हत पडलेल्या मानवांच्या कंटकित व खडतर जीवनावर आच्छादन घालणारी ही लटकी पुष्पराशी आहे. हें शराने जखमी झालेल्या चकोराचें भ्रांतिमय चांदणें आहे, कठोर व निर्घृण परिस्थितीच्या होरपळून टाकणाऱ्या अग्नीचें शमन करणारें तें मृगजळ आहे. मायामय ब्रह्मातील निःश्रेयसाची व मोक्षाची भुरळ नष्ट झाल्याशिवाय सत्यसृष्टीतील दास्यमोक्ष आणि श्रेयस् यांचा मार्ग दिसणार नाही. अश्रुरहित, व्यथारहित आणि अमृतमय अशा काल्पनिक स्वर्गाचें मिथ्यात्व निश्चित झाल्याशिवाय दास्यरहित समाजसंस्थेतील निरामय, कलामय, ज्ञानयुक्त, उल्हसित दीर्घजीवनाच्या सत्यविश्वाकडे नेणारा मार्ग लाभणार नाही.

वर हिंदुधर्माच्या ध्येयात्मक स्वरूपासंबंधी तीन पक्ष मांडून

त्यांचें थोडक्यात समालोचन केलें. आता हिंदुधर्माच्या व्याख्येचा विचार करू.

हिंदुधर्माच्या लक्षणाचा विचार

दुसऱ्या कोणत्याही प्रसिद्ध धर्मसंस्थापेक्षा हिंदुधर्माचें वैशिष्ट्य काय आहे, म्हणजे हिंदुधर्माचें लक्षण काय आहे, हा मोठा बिकट प्रश्न आहे, असें आधुनिक हिंदु पंडितांस वाटतें. याचें कारण हिंदुधर्म हा बहुरूपी आणि परस्पर विरोधी प्रवृत्तींचे संमिश्रण होऊन बनलेला आहे. या धर्माच्या दोन बाजू आहेत. विशिष्ट प्रकारच्या सामाजिक चालीरीती किंवा समाजरचनेचे विशिष्ट कायदे ही याची सर्वांत प्रमुख अशी बाजू आहे; आणि परस्परविरोधी अनेक पारमार्थिक संप्रदाय ही याची दुसरी प्रमुख बाजू आहे. जगातील ख्रिश्चन, मुसलमान इत्यादि धर्मसंस्थांचे लक्षण पारमार्थिक संप्रदायावरून निश्चित करता येतें. लक्षणनिश्चयाचे वेळी त्यांचे सामाजिक स्वरूप पाहण्याची गरज नसते. प्रत्येक धर्मसंस्थेच्या बाह्य आवरणाखाली विशिष्ट सामाजिक परिस्थिति व विशिष्ट कायदे दडलेले असतातच. हिंदुधर्माचें लक्षण निश्चित करीत असताना हा सामाजिक भागच प्रामुख्याने पुढे येतो. वर्णसंस्था, जातिसंस्था, विशिष्टतऱ्हेचे विवाहादिसंस्कार, देशजातिकुलधर्म, वारसाहक्कांचे नियम व एकत्र कुटुंबपद्धति ही हिंदुधर्माची सामाजिक बाजू आहे. हिंदुधर्म म्हणंजे विशिष्ट समाजव्यवस्थेचे नियम किंवा कायदे होत. ही विशिष्ट समाजसंस्था म्हणजे वर्णाश्रमसंस्था किंवा जातिसंस्था होय. गेल्या दोन हजार वर्षांतील हिंदुधर्माचें जाति-

धर्म हेंच प्रमुख लक्षण बनलें आहे. हिंदु मनुष्य विशिष्ट जातिधर्माचे पालन करीत असला म्हणजे त्याला नीट हिंदु समजतात. हिंदूंच्या सामाजिक चालीरीतींच्या पाठीशी पारलौकिक-पारमार्थिक कल्पना आहेतच. पुनर्जन्माचा व कर्मविपाकाचा सिद्धान्त, ही महत्त्वाची अदृष्टकल्पना, सगळ्या सामाजिक रचनेच्या नियमांचे समर्थन करण्याकरिता धर्मशास्त्रांनी उपयोगात आणली आहे. हिंदुधर्मात पारमार्थिक किंवा आध्यात्मिक संप्रदाय अनेक परस्परविरुद्ध कल्पनांनी बनलेले आहेत. त्या कल्पनांमध्ये अविरोध उत्पन्न करण्याचा कितीही प्रयत्न केला तरी तो व्यर्थ ठरतो.

'प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता। उपास्यानामनियमः एतद्धर्मस्यलक्षणम् ॥' हें लोकमान्य टिळकांचे हिंदुधर्मलक्षण समाधानकारक नाही. हें लक्षण हिंदुधर्माची एक बाजू फारच चांगल्यारीतीने वर्णन करून सांगतें. हिंदुधर्माला विधायक ( positive ) व्यवस्थित, संघटित, सुसंगत असा पारमार्थिक पाया नाही ही गोष्ट या लक्षणावरून सहज उघडकीस येते. 'प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु' या शब्दसमुच्चयाने असें सुचविलें आहे की, वेद हा सगळ्या हिंदूंचा प्रमाणग्रंथ आहे. ज्यांना वेदाधिकार नाही, आणि ज्यांच्या चालीरीती वैदिकधर्मावर आधारलेल्या नाहीत असे शें. ७० लोक हिंदुसमाजात आहेत. त्या लोकांचा वेद हा प्रमाणग्रंथ कसा होऊ शकेल? ज्या लोकांना वेद-श्रवणाचाही अधिकार नाही, एवढेंच नव्हे तर श्रवणाने महापातकाचे व नरकाचे धनी बनावे लागतें, त्या लोकांची वेदावर प्रामाण्यबुद्धि म्हणजे श्रद्धा आहे, या म्हण-

ण्यात काहीच अर्थ नाही. साधनांची अनेकता व उपास्यांचा अनियम ही व्याख्याच होऊ शकत नाही. प्रत्येक विशिष्ट संप्रदायाच्या हिंदूस म्हणजे शैव, वैष्णव, स्मार्त, शाक्त इत्यादि हिंदूस विशिष्ट साधन व विशिष्ट उपास्य आहेच. ही गोष्ट खरी की, सगळ्या हिंदूंना मिळून एक तऱ्हेचें साधन किंवा एक तऱ्हेचें उपास्य नाही. पण हें अभावघटित लक्षण हिंदुधर्माचें खरें लक्षण नव्हे. जेव्हा एखाद्या पदार्थाचें किंवा पदार्थसमुदायाचें लक्षण सांगण्याची गरज असते, तेव्हा त्या पदार्थांच्या बाहेर न सांपडणारें पण त्या सर्व पदार्थांस व्यापणारें असें त्या पदार्थांचें भावरूप ( positive ) स्वरूप सांगावयाचें असतें. 'उपास्यानामनियमः' व 'साधनानामनेकता' यावरून एवढेंच सिद्ध होतें कीं, सगळ्या हिंदूंचा हिंदुधर्म म्हणून एक विशिष्ट सर्वसाधारण धर्म नाही, हिंदूंचें धर्म अनेक आहेत; हिंदूंच्या धर्मात एकसूत्रीपणा नाही.

हिंदूंच्या समाजसंस्थेचें जातिव्यवस्था हें महत्वाचें ( Positive ) लक्षण आहे. प्रार्थनासमाज आर्यसमाज इत्यादि आधुनिक प्रकार अपवाद म्हणून सोडल्यास हिन्दूंचा बहुजनसमाज जातिसंस्था मानूनच व्यवहार करतो. आर्यसमाज व प्रार्थनासमाज यांच्यातही जाती मानून व्यवहार करणारे फार लोक आहेत. जैनधर्म जाति मानीत नसला तरी जैनलोक जाति मानतात. हिन्दुस्थानातील मुसलमान व ख्रिश्चन यांच्यामध्ये सुद्धा जाति मानणाऱ्यांची संख्या मोठी आहे. हिन्दुसमाजाच्या या प्रमुख संस्थेचा त्यांच्यावरही परिणाम शिल्लक राहिलाच आहे, हाच याचा अर्थ आहे.

हिंदुधर्माचें सामान्य लक्षण ठरविण्याचा प्रयत्न करून त्याचें संकलित रूप निश्चित करणे अत्यंत कठिण आहे. कारण हिंदुधर्म ही एक मर्यादित व व्यवस्थित स्वरूपाची सुसंगतपणें प्रतिपादन करण्यासारखी घटना नसून वैचित्र्य व विरोध यांनी युक्त अशी गुंतागुंतीची घटना आहे. त्या घटनेचा नीट उलगडा करण्याकरिता भिन्नभिन्न परिस्थितीतील वैचित्र्यांची व प्रकारांचीच तपासणी करणे आवश्यक आहे. अव्यवस्थित स्वरूपाच्या पदार्थांचें सामान्य लक्षण ठरविण्याचा प्रयत्न करणें तर्कशास्त्र दृष्ट्या फारसें समर्थनीय नसतें म्हणून हिंदुधर्माच्या संकीर्ण व वैविध्यपूर्ण स्वरूपाचें संपूर्ण आकलन करता यावे या करिता त्याच्या रचनेचे घटक असलेले विविध थर तपासणेंच आगत्याचें आहे.

हिंदुधर्माची विविधस्तरमयता

हिंदुधर्म ही विशिष्टप्रकारच्या केवळ पारलौकिक किंवा आध्यात्मिक विचारसरणीवर अधिष्ठित अशी वस्तू नाही. हिंदुधर्म ही एक विविध सामाजिक आचारविचारांची गठडी किंवा एक संग्रह आहे, आणि परस्पर विसदृश आध्यात्मिक व पारलौकिक विविध कल्पनांचाही त्यात भरणा आहे. सामाजिक विचित्र चालीरीतीना केवळ ऐहिक मूल्य हिंदुसमाज देत नाही, तर त्यास पारलौकिक किंवा अदृष्ट मूल्यांचाही पाठिंबा देतो. विवाहपद्धति, जातिउपजातींच्या चाली, स्त्रीपुरुषांचे व्यवसाय, वारसा हक्क, विधवांची उपजीविका, खाण्यापिण्याचे निर्बंध, इत्यादि सामाजिक रीतींनाही धार्मिक मूल्य आहेच. जातिसंस्था हें हिंदुधर्माचें मुख्य लक्षण आहे, पण त्याचेंहि निश्चित

विवरण करणें कठिण आहे. उदाहरणार्थ, पुष्कळशा जाति ब्राह्मण-वरिष्ठत्व व ब्राह्मणपौरोहित्य मानीत असल्या तरी काही जातींचे पुरोहित स्वजातीय किंवा ब्राह्मणेतर असतात. मुसलमान धर्म व ख्रिश्चन धर्म हे हिंदुधर्मापेक्षा निराळे असले तरी पुष्कळ हिंदु ख्रिश्चन देवतांची व मुसलमानी पीरांची उपासना करतात. यावरून असे दिसते कीं, कित्येक वेळी देवतोपासनाविषयक आचारापेक्षा सामाजिक चालीरीतीनाच हिंदुधर्मात अधिक महत्व दिलें जातें. विविध व परस्परविरोधि अशा सामाजिक व पारलौकिक कल्पनांनी बनलेल्या हिंदुधर्माचें पृथक्करण ऐतिहासिक तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने करणे आवश्यक आहे. हें पृथक्करण करीत असतां हिंदुधर्माच्या स्वरूपात उन्नत व अवनत असे बहुविध थर सापडतात.

ऐतिहासिक तत्वज्ञानाच्या दृष्टीने सगळ्या धार्मिक कल्पनांना सामाजिक विकासात सारखेंच स्थान नाही. समाजसंस्था सामाजिक विकासाच्या ज्या ज्या उच्च नीच अशा अवस्थांतून जाते, त्या त्या अवस्थांना अनुरूप अशा उच्च किंवा नीच धार्मिक कल्पनाही ती घडवीत असते. वृक्षपाषाणादि मूर्त वस्तूंची पूजा, प्रेतपिशाच्चपूजा, जारणमारणादि जादुरूप क्रिया, मनुष्ययज्ञ किंवा पशुयज्ञ हा हीन अवस्थेतील सामाजिक संस्थेचा धर्म असतो; त्यापेक्षा उच्चतर अवस्थेतील किंवा विकासाच्या उच्चतर सोपानावरील समाजसंस्थेचा अमूर्त एकेश्वरोपासना हा धर्म असतो. हिंदुधर्माच्या शरीरात अशा विविध थरांचें संकलन दृष्टीस पडते. ख्रिश्चन, पारशी व मुसलमान यांच्या एकेश्वरोपासक धर्मातही मानवजातीच्या मागासलेल्या

स्थितीतील धर्मकल्पनांचे अवशेष शिल्लक आहेत. परंतु त्या सगळ्या प्राचीनतर हीन अवशेषाना ह्या एकेश्वरवादी धर्मांनी एकेश्वरकल्पनेच्या द्वारें झाकून टाकून निष्प्रभ केलें आहे. मानवजातीच्या हीन अवस्थातील धार्मिक कल्पनांचा समूळ उच्छेद करण्याच्या इराद्यानेच हे धर्म स्थापित झाले आहेत. मात्र या बाबतीत त्यांना संपूर्ण यश येऊ शकलें नाही. मुसलमान धर्मच त्यातल्या त्यात अधिक यशस्वी झाला आहे, हिंदुधर्मास मात्र या बाबतीत यावें तसें यश आलें नाही. किंबहुना अपयशच आलें. त्याचें प्रमाण म्हणजे हिंदुधर्माचें विद्यमान स्वरूपच होय. त्यात अत्यंत हीनतर अशा प्राचीन आचारास व कल्पनास अगदी उघड माथ्याने वावरता येते, कित्येक वेळा प्रमुख पूजास्थानही प्राप्त होते; एवढेंच नव्हे, या हीन अवशेषांचे उच्च तत्त्वज्ञानातील युक्तिवादाच्या आश्रयानें समर्थनही केलें जातें. अपरिहार्यपणे चिकटून राहिलेल्या हीन लक्षणांचें धीरगंभीरपणे आत्मवंचनापूर्वक समर्थन करण्याची प्रवृत्ति प्रगतिविरोधी पंडितांच्या ठायी असते. हिंदुसमाजात अशा पंडितांची वाण नाही.

धर्मविकासाच्या निरनिराळ्या पातळीतील धर्मकल्पनांचे सामान्यपणे तीन थर हिंदुधर्मात सापडतात, या तीन थरांपैकी प्रत्येक थरात उच्चनीच असे अनेक अवान्तर थर आहेत; पण विवेचनाच्या सोयीकरिता मुख्य असे तीन थर लक्षात घेतले आहेत. [ १ ] जादू, निसर्गवस्तुपूजा, भूतराक्षसपूजा किंवा पितृपूजा, [ २ ] मानवसदृशदेवतासमूहपूजा व शक्तिपूजा ; [ ३ ] एकेश्वरवाद, ब्रह्मवाद व तत्त्ववाद.

[ १ ] (अ) जगातील बहुतेक सगळ्या रानटी किंवा मागासलेल्या मानवसमूहात जादू ( Magic ) हा प्राथमिक धर्म सापडतो. आजच्या सुधारलेल्या पाश्चात्य व पौर्वात्य राष्ट्रातही जादूटोणा समाजाच्या मागासलेल्या थरात थोड्या बहुत प्रमाणात आढळतो. मनुष्याच्या अगदी अडाणी स्थितीत हा धर्म अवतरतो. सृष्टीतील वास्तविक कार्यकारणभावाचें गाढ अज्ञान हें याचें आदिकारण आहे. जादू दोन प्रकारचा असतो. एक देवतावादापूर्वींचा व देवतावादोत्तरकालीन. हिंदुधर्मात ह्या दोन्ही तऱ्हेचा यातुधर्म आहे. अथर्ववेदातील व गृह्यसूत्रातील धर्मात जादूच्या क्रियेस स्थान आहे. इतर तीन वेदातही जादू किंवा तत्सदृश क्रिया सांगितल्या आहेत. काही यज्ञ जादूसारखेच आहेत. निदान जादूचें अवशेष त्यात आहेत. पर्जन्य, शत्रुनाश, सस्यसमृद्धि, रोगनिवारण, गर्भधारण, संतति, पशुलाभ इत्यादि फळांच्या प्राप्त्यर्थ यज्ञ व होम सांगितले आहेत. अभिचार नावाचे यज्ञ किंवा कर्में सर्व वेदात सांगितली आहेत. गर्भाधान, पुंसवन, इत्यादि संस्कारांचें मूळचें स्वरूप एक प्रकारची जादू हेंच होय. जादू म्हणजे साधना. इष्टसिद्धीकरिता किंवा अनिष्ट निवारण्याकरिता विशिष्ट वस्तु विशिष्ट क्रिया किंवा विशिष्ट मंत्र यांचा, त्यांत अद्भुत शक्ति आहेत या कल्पनेने, विशिष्ट परिस्थितीत, उपयोग करून घेणे म्हणजे साधना. पूर्वी एकेकाळी वनस्पति, धातु किंवा क्षार इत्यादि भौतिक द्रव्यांच्या रोगनिवारणसंबंधी कार्यकारणभावाचें अज्ञान असल्यामुळें वैद्यकीय क्रियासुद्धा जादूच्याच स्वरूपाच्या होत्या. अथर्ववेदातील व गृह्यसूत्रातील काही रोगनिवारक कर्में याच तऱ्हेची आहेत. जादूच्या वनस्पति व मंत्र त्यांत सांगितले आहेत.

(आ) निसर्गवस्तूपूजा हा हिंदुधर्माचा दुसरा प्राथमिक स्थितीतील अवशेष होय. पाषाण, पर्वत, नदी, वृक्ष, पशु, पक्षी, तारे इत्यादि विशिष्ट निसर्गवस्तू काही चमत्कारिक शक्तींच्या असतात, अशा समजुतीने ही पूजा अस्तित्वात येते. गंडकीतील काळा शालिग्राम, नर्मदेतील तांबडा गोटा, अनेक छिद्र असलेली अथवा लंबगोल गुळगुळीत अशी गारगोटी, डोंगर, गंगा यमुना कृष्णा सिंधु इत्यादि नद्या, उंबर पिंपळ वड बेल तुळशी आवळी इत्यादि वनस्पति, बैल गाय माकड महिष मत्स्य कच्छ वराह सिंह वाघ घोडा हत्ती नाग गरुड हंस मयूर इत्यादि पशुपक्षी, सूर्य चन्द्र मंगळ इत्यादि आकाशस्थ गोल, अग्नि वायु पर्जन्य इत्यादि निसर्गघटना यांची पूजा करण्याची पद्धति हिंदुधर्मात आहे. शालिग्राम, नर्मद्यागोटा किंवा लंबगोल गारगोटी यांची पूजा विष्णु, गणपति किंवा शिव या नात्याने हल्ली चालू आहे. म्हणजे एकेश्वरी भक्तिसंप्रदायात त्यांचा प्रतीक म्हणून उपयोग केलेला आहे. पण त्या वस्तू मुळात विष्णु, गणपति किंवा शिव या स्वरूपाने पूज्य नव्हत्या, तर त्यांना स्वतंत्र पूज्यत्व होतें. पिंपळ, वड, आवळी इत्यादि वृक्षांच्या पूजा ह्या अजून मूळच्या कल्पनेनेच पूजिल्या जातात. पुराणांनी त्या वस्तूंच्या स्तोत्रात विष्णु शिव इत्यादि विकसित धर्मातील देवतांशी संबंध जोडला आहे. परंतु त्यांचे स्वतंत्र पूज्यत्व अजून टिकून आहे. नाग व गाय ह्यातर अजून अगदी निराळ्या देवता राहिल्या आहेत. मत्स्य, कच्छ, सिंह, वाघ, गरुड, हंस, मयूर इत्यादिकांची पूजा जरी करीत नसले तरी त्यांच्या प्रतिकृतींची पूजा रूढ आहे. सूर्य, चन्द्र,

मंगळ इत्यादि नवग्रह यांची आराधना व साधना हा विद्यमान हिंदुधर्माचा महत्त्व पावलेला प्रकार आहे. गाईची व तुळशीची पूजा हें हिंदुधर्माचें उदात्त लक्षण म्हणून पं. मदनमोहन मालवीयांसारखे हिंदु पुढारी प्रतिपादितात. ही निसर्गवस्तुपूजा प्राथमिक रानटी स्थितीत ( Totemism ) कुललक्षणपूजा किंवा देवकपूजा म्हणून अस्तित्वात येतें. ब्राह्मणांचे घरी, विवाह व उपनयन संस्कारात प्रथमतः देवकस्थापना करतात. हें देवक ( अविघ्न कलश ) गाडग्याचें असतें. हा ब्राह्मणांच्या रानटी स्थितीतील अवशेष होय. या कुललक्षणपूजावादाचें स्वरूप पहिल्या व्याख्यानात विवरिलें आहे. विशिष्ट जडवस्तु, विशिष्ट पशु, विशिष्ट पक्षी, इत्यादिकांच्या ठायी काही शुभाशुभकारक सामर्थ्य असतें, या दृष्टीने ही पूजा उत्पन्न होते. काही वस्तू शुभसूचक व काही अशुभसूचक असतात. ही कल्पना अज्ञानातच उत्पन्न होते. कावळा व कपोत यांचें दर्शन हें मृत्युसूचक आहे, अशी ऋग्वेद व अथर्ववेद यात कल्पना आहे. विशिष्ट पदार्थांच्या, किंवा जातींच्या दर्शनात अगर स्पर्शनात पावित्र्य किंवा अपावित्र्य असतें, ही कल्पना स्मृतीत प्रामुख्य पावलेली दिसते. माना ( Mana ) व टाबू ( Taboo ) या कल्पना रानटी लोकात सापडतात, त्याच हिंदुधर्मात शिल्लक राहिल्या आहेत. गाय, गोमूत्र, गोमय, ब्राम्हण, गंगोदक, सुवर्णादिधातु, अश्वत्थ, तुळसी इत्यादिकांच्या स्पर्शाने पावित्र्य लाभते व शूद्र, अंत्यज, रजस्वला, गर्दभ, काक, कांदा, लसूण, शेवगा, गाजर, वांगें यांच्या स्पर्शाने अपावित्र्य येते, ह्या स्मृतीतील कल्पना टाबू व माना या वन्यस्थितीतील कल्पनांचे विस्तृत रूप

होय. स्मृतीतील भक्ष्याभक्ष्य व स्पृश्यास्पृश्य यांचा विवेक बराचसा या खुळ्या समजुतींच्या सदरात जातो.

हिंदुधर्मात काही निसर्गवस्तू किंवा त्यांच्या प्रतिकृति पूजनीय आहेत व काही उत्तर कालीन उदात्त धर्मांच्या संस्काराने थोडा बदल करून पूज्य झाल्या आहेत. उदाहरणार्थ:— गरुड, बैल व माकड. गरुडास विष्णूचे व बैलास शिवाचे वाहन म्हणून आणि माकडास रामाचा दूत म्हणून पूजितात. वस्तुतः मुळात त्यांना स्वतंत्र पूज्यत्व होतेच. नंदीची पूजा हिंदु स्वतंत्र रीतीने सुद्धा करितात. मारुतीची पूजा स्वतंत्र रीतीने बहुतेक हिंदू करितात. वृक्ष, सूर्य, भू, पर्वत, नदी आणि ग्रह यांच्या पूजा अगदी प्राचीन काळापासून आतापर्यंत फारसा फरक न होता चालू आहेत.

पशुपक्ष्यांच्या पूजांचे मूळ प्राथमिक अवस्थेत सापडते. ज्यावेळी मनुष्याला भोवतालचे पशुपक्षी स्वतः पेक्षा समर्थ व वरिष्ठ वाटतात त्यावेळी ही पूजा सुरू होते. जेव्हा मनुष्याचें स्थान निसर्गात इतर प्राणिसृष्टीपेक्षा श्रेष्ठ आहे, अशी मानवास जाणीव होते, तेव्हाच स्वतःच्या भवितव्यावर सत्ता चालविणाऱ्या व स्वतःच्या कक्षेबाहेर असलेल्या शक्तींच्या म्हणजे देवतांच्या ठायी पशुपक्ष्यांच्या गुणांचा आरोप करण्याची प्रवृत्ति कमी होऊ लागते. माकड सिंह हत्ती गरुड नाग बैल वराह इत्यादिकांचे रूप किंवा अवयव धारण करणाऱ्या देवता, मानव्याचें थोर सामर्थ्य नीट कळू लागण्याचे अगोदर मनुष्याने अस्तित्वात आणल्या. स्थिर राष्ट्र व

स्थिर समाज, या रूपाने अस्तित्वात आलेल्या मानवसंघांनी मानुष-देहधारी व मानवगुणयुक्त देव जन्माला घातले. ज्यावेळी पशुपक्ष्या-दिकांपेक्षा वरिष्ठ शक्ति मानवात आहे ही गोष्ट मनुष्यास पटू लागली तेव्हा मानवदेहधारी किंवा मानवगुणयुक्त देव मानवबुद्धीतून अवतरला. विद्या व कला यांच्या योगाने भोवतालच्या सृष्टीवर आधिपत्य गाजविणाऱ्या व स्वतःच्या गुणांच्या मांगल्याची प्रतीति आलेल्या मनुष्यांनी मानवसदृश देवता निर्मिली. पशु, पक्षी, नदी, पर्वत, अग्नि, सूर्य इत्यादिक देवतांचे बाह्य स्वरूप जसेंचें तसें राखून सुद्धा त्यांचे अंतरंग मानवी विकारविचारांनी भरलेलें आहे, असें मनुष्य कल्पू लागला. मानवी पराक्रमच अतिशयोक्तीने देवांचे ठायी मनुष्यास दिसू लागले. ह्या स्थितीस येण्यास मनुष्यजातीस युगानुयुगें घालवावीं लागलीं.

पशु, पक्षी, सरीसृप, पाषाण, इत्यादि वस्तूंप्रमाणेंच अग्नि, सूर्य, पर्जन्य, वायु इत्यादि निसर्गदेवता वास्तविक कार्यकारण-भावाच्या अज्ञानात अस्तित्वात आल्या. दावानल, तीव्र सूर्यातप, वादळें, अतिवृष्टि, अनावृष्टि, समुद्राच्या भरती ओहोटी, सूर्यचंद्राचे उदयास्त इत्यादिकांच्या गूढत्वामुळे या देवतांच्या कल्पना निर्माण झाल्या. ह्या निसर्ग व्यापारांचा अर्थ करणे विज्ञान निर्माण होई-पर्यंत अशक्यच होते. तोपर्यंत अनेक देवतांच्या किंवा एक देव-तेच्या कल्पनेवरच मनुष्यास निर्वाह करावा लागला. पूजा करणे यज्ञ करणे व प्रार्थना करणे हाच त्या परिस्थितीत तरणोपाय होता, व हाच त्यावेळचा धर्म झाला.

[ इ ] भूतपूजा किंवा पितृपूजा हा तिसरा धर्म हिंदुधर्मात आहे. स्वतःच्या संघातील वडील माणसांच्या आधीन लहानांचा योगक्षेम असतो. संघातील वडीस माणसेंच त्याला जगण्यास लागणारी सर्व तयारी करून देतात. त्यांचे वर्चस्व त्यांच्यावर राहते. ती संघातील वडील म्होरपी जेव्हां मृत्यूच्या घाल्यामुळे हरपतात, तेव्हा संघाची त्यांच्या मृत्यूमुळे फारच मोठी हानि होते, याची जाणीव संघातील प्रत्येक मनुष्यास तीव्रतेने होते. या जाणीवेमुळेच त्यांच्या कायमच्या संपूर्ण नाशाची कल्पना असह्य होते. स्वप्नात व एकांतात त्यांच्या अस्तित्वाचा भास होतो. संघावर संकट आलें म्हणजे मृत झालेल्यांच्या असंतुष्ट वासनेची ही बाधा आहे, असें वाटू लागतें. त्या गत वडील माणसांची म्हणजे पितरांची वासना तृप्त करण्याची म्हणजे पूजा करण्याची इच्छा मागे राहिलेल्यांना होते. मृतांच्या मरणोत्तर अस्तित्वाच्या जाणिवेची उपपत्ति मागे मूर्तपुरुषवाद ( animism ) या सदराखाली सांगितली आहे. जडदेहात देहापेक्षां निराळा देहासारखा चेतन पुरुष किंवा चेतन द्रव्य असतें तेंच मृत्यूनंतर राहतें, या कल्पनेच्या आधाराने भूतपूजा किंवा पितृपूजा अस्तित्वात येते. याच कल्पनेत भुतें, खेतें, पिशाच्च, वेताळ, मुंजे इत्यादिकांच्या कल्पना अंतर्भूत होतात. देवता व पुनर्जन्म यांची कल्पना याच मूर्तपुरुषवादातून उद्भवली. डोंगर, नदी, वृक्ष, भूमि, क्षेत्र, गृह इत्यादिकांचे ठायी एक एक देवता असते, ही कल्पना मूर्तपुरुषवादाचीच एक बाजू आहे.

हिंदुधर्मात श्राद्धाला फार महत्व आहे. नित्यतर्पण, दर्शश्राद्ध, महालय, अंत्येष्टि, एकोद्दिष्ट, मासिकश्राद्ध, वार्षिकश्राद्ध, तीर्थश्राद्ध

इत्यादि पुष्कळ प्रकारची श्राद्धें सांगितली आहेत. वेदात पिण्ड-पितृयज्ञ सांगितला आहे, तो श्राद्धाचाच प्रकार आहे. काशी, गया, प्रयाग, इत्यादि क्षेत्रात गेल्यावर बहुतेक हिंदु श्राद्ध करतात. मेलेल्या राजांची, सरदारांची, व पुरोहितांची पूजा करण्याचा संप्रदाय प्राचीन मिसरी संस्कृतीत इजिप्तमध्ये कळसास गेला होता. हिंदुधर्मांतहि या पितृपूजेतून वीरपुरुषपूजा निघाली. राम, कृष्ण, जिन, बुद्ध इत्यादिकांच्या प्रतिमांची पूजा मृतपूर्वजांच्या पूजेचाच एक उन्नत प्रकार आहे.

हिंदुधर्मांतील वारसा हक्काच्या कायद्याचा व श्राद्धाचा अत्यंत निगडित संबंध आहे. मेलेल्या पूर्वजांचे किंवा वंशजांचे श्राद्ध करणें हा वारसाहक्काचा एक महत्वाचा उद्देश स्मृतिकारांनी सांगितला आहे. कुटुंबसंस्थेचे पावित्र्य श्राद्धाकरिता राखावयाचें असतें. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे कौटुम्बिक संपत्तीचें श्राद्ध हें एक महत्वाचें प्रयोजन आहे. श्राद्ध न करणाऱ्यास संपत्तीचा वारसा मिळू नये, असें काही स्मृतिकारानी सांगितलें आहे. जातिसंस्थेचें या श्राद्धाने बरेंच रक्षण केलें आहे. कारण वंशपावित्र्याशी श्राद्धाचा संबंध पोचतो.

पितृपूजेचा देवताकल्पनेवर पुष्कळच परिणाम झाला आहे. जगातील अनेक मुख्य धर्मांत ईश्वर हा माता, पिता किंवा राजा म्हणून पूजिला जातो. अतिप्राचीन काळी जमातीच्या नायकास राजा किंवा पिता असें मानीत असत. भूमातेची पूजा हिंदुधर्मांत प्राचीनकाळापासून आहे. देवींच्या पूजेचा संप्रदाय फार जुना आहे. देवीची पूजा माता म्हणून केली जाते.

( २ ) हिंदुधर्मातील सगळ्यात खालच्या प्रकारच्या धार्मिक कल्पनांचा थर वर सांगितला. त्यानंतर दुसरा त्यापेक्षा उच्च असा हिंदुधर्माचा एक प्रकार आहे. त्यात मानवसदृश अनेकदेवतापूजा व अनेकशक्तिपूजा यांचा अंतर्भाव होतो. दृश्य किंवा इन्द्रियगम्य वस्तूंच्या पलीकडे त्या वस्तूंवर सत्ता चालविणाऱ्या एक किंवा अनेक चेतन वस्तू आहेत, त्या मानवात दिसणाऱ्या कर्तृत्वासारख्या कर्तृत्वाने व गुणांनी संपन्न आहेत; त्यांच्या शासनानुरूप वर्तन केल्याने मनुष्यास येथे व मरणोत्तर सद्‌गति लाभते; या विचारांना या धर्मांत मुख्य स्थान आहे.

( अ ) इन्द्र, सविता, वरुण इत्यादि ऋग्वेदातील देवता ह्या केवळ निसर्गातील विलक्षण अलौकिक शक्ति नाहीत तर त्यांच्या ठायी मानवी गुणांचा आरोप ऋषींनी केला आहे. इन्द्र हा पराक्रमी व वीर राजा आहे, सविता व वरुण कायदे करणारे व न्यायान्यायाचा निवाडा करणारे अधिपति आहेत. कला, कवित्व, ज्ञान, दया, उपकार, करुणा, कृपा, संतोष, शौर्य, प्रीति, द्वेष, लोभ, मत्सर, क्रोध इत्यादि मानवगुणच पराकाष्ठेने त्यांच्या ठायी वसत आहेत; ते भक्तिवश आहेत. राम, कृष्ण, मारुति, शिव, गणपति इत्यादि विद्यमान हिंदुधर्माच्या देवतांचे स्वरूप देखील असेंच आहे. सदसद्‌वर्तनाचे साक्षी, स्वर्गनरक व बंधमोक्ष यास तेच कारण आहेत. सत्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष उपदेश तेच करितात. या देवतांचे ठायी अतिशय उदात्त मानवगुण व मानवाचे दोषही आहेत. त्यांच्यात अभिमान, मत्सर, लोभ, लहरीपणा,

द्वेष, स्तुतिप्रियता वगैरे सगळे दोष आहेत. त्यांना मनुष्यांचे सगळे प्राकृत विकार आहेत. वेदातील यज्ञ, स्मृतीतील होमहवनें आणि पुराणातील व्रतें, तीर्थयात्रा, उद्यापनें, मंदिरप्रतिष्ठा, प्रसाद-सेवन, नामसंकीर्तन इत्यादिकांनी ते देव सहज संतुष्ट होऊन वाटेल तो चमत्कार करून दाखवितात. बोकड, घोडा, गाय यांचे मास आणि तूप, रोटी, भात यांनी वैदिक देव खूष होतात. पुराणातील देव बेल, दुर्वा, तुळस, पाणी यांनीही शांत होतात. कारण ते दरिद्र्याचे देव आहेत; पंचपक्वान्नांचा नैवेद्य, राजमहाल, मंचक, पुष्प, धूप, दीप इत्यादिकांनी तर ते नितांत प्रसन्न होतात व वर देतात. मग वाटेल तो चमत्कार भक्ताने त्यांच्याकडून करून घ्यावा.

( आ ) देवतेच्या बाबतीत यापेक्षा अधिक श्रेष्ठ कल्पना हिंदुधर्मात आहेत. त्या म्हणजे वस्तूतील भावरूप तत्वें होत. या दुसऱ्या प्रकारे देवतांची उपासना हिंदुधर्मात प्रसिद्ध आहे. वस्तूंतील चेतनरूपशक्ति किंवा तत्त्व हीच देवता होय, ही कल्पना वेदातच उद्भवली. इन्द्र म्हणजे बलदेवता, वरुण म्हणजे साम्राज्यदेवता, सविता म्हणजे आज्ञारूप-प्रेरणारूप देवता, सरस्वती म्हणजे पुष्टिदेवता किंवा वाक्‌देवता, श्री म्हणजे सर्व वस्तूतील उत्कृष्ट गुणांचे रहस्य साठविलेली देवता ( शतपथब्राह्मण ११ ), प्रजापति म्हणजे सर्ववस्तुमय जननशक्ति, ब्रह्मा म्हणजे निर्माणशक्ति, विष्णु म्हणजे रक्षणशक्ति, रुद्र म्हणजे संहारशक्ति. चेतन तत्त्व किंवा शक्ति या रूपाने देवतेची उपासना ब्राह्मणग्रंथात व पुराणातील तात्विक निरूपणात सांगितली आहे यात देवतेला सूक्ष्मस्वरूप प्राप्त झालेलें आहे.

देवतांच्या ठायी मानव्याचा किंवा सूक्ष्मत्वाचा आरोप करणारा हिंदुधर्म श्रुतिस्मृतिपुराणांत प्रामुख्याने वर्णिला आहे. या देवतांची परस्पर सांगड घालून त्यांची भक्ति करणारा, किंवा त्या देवतांपैकी कोणती तरी एक देवता निवडून तिलाच सर्वशक्तिमत्त्व देणारा धर्म, ऋग्वेदातच प्रगल्भ दशेला आलेला दिसतो.

हिंदुधर्मात अनेक देवतांचे उपासनासंप्रदाय प्रगल्भ दशेस आले. त्याबरोबर विधिनिषेध, गंध माला वेष इत्यादि विशिष्ट प्रकारची संप्रदायचिन्हें व भिन्न भिन्न संप्रदायांचे परस्पर व्यवहारांचे नियम, हेही अस्तित्वात आले; त्यांच्या पावित्र्यापावित्र्याच्या मर्यादाही ठरल्या.

( ३ ) हिंदुधर्मसंस्थेचा सगळ्यात वरिष्ठ व श्रेष्ठ असा एक थर आहे. त्यात ब्रह्मवाद, एकेश्वरवाद व तत्त्ववाद हे तीन प्रकार येतात.

( अ ) ब्रह्मवादाचें स्वरूप असें आहें. सर्व देवता एकाच सर्वव्यापी तत्त्वात समावलेल्या आहेत, सर्व देवता त्याच एका तत्त्वाचे भाग होत, पिण्ड व ब्रह्मांड एकाच सत्तत्त्वातून उद्भवतात, तेथेच स्थिर होतात व तेथेच लीन होतात, तें तत्त्व विश्वरूप आहे, ह्या विचारास ब्रह्मवाद किंवा सद्वाद म्हणतात. हा ऋग्वेदाच्या शेवटी दहाव्या मंडलात उदय पावला, आणि उपनिषदात ( छान्दोग्योपनिषत् ६ ) तो परिणतीला पोचला. मानवी आत्म्याप्रमाणेच पण त्या पेक्षा श्रेष्ठ असलेल्या सर्वशक्तिसंपन्न सर्वगुणसंपन्न

अशा परमात्मव्यक्तीपेक्षा ब्रह्म अधिक सूक्ष्म आहे. तें व्यक्ति ( person ) नसून तत्व आहे. त्याचें ज्ञान झालें म्हणजे मनुष्याचें जीवित कृतार्थ होतें. त्याच्या ज्ञानार्थ धार्मिक कर्मकाण्डापेक्षा संयम, शान्ति, उदारता, इत्यादि गुणांचीच जरूरी आहे. स्वर्ग, मोक्ष, सुगति, दुर्गति, इत्यादिकांचा कारक असलेल्या कृपाळू दयाघन परमेश्वरापेक्षा ब्रह्म अव्यक्त आहे; कारण तेथें अहंभाव किंवा व्यक्तित्व नाही.

( आ ) एकेश्वरवाद हें धर्माचें उच्चतम लक्षण हिंदुधर्मात आहे. सर्व जगाचा शास्ता व सर्व शक्तिमान् अन्तरात्मा एकच एक परमेश्वर आहे व बाकी सगळें त्याच्या आधीन आहे, या सिद्धान्तास एकेश्वरवाद म्हणतात. शैव व वैष्णव संप्रदायांचा हाच सिद्धान्त आहे. परमेश्वराची भक्ति अनन्य भावाने करणे किंवा त्याला सर्वथा शरण जाणे हाच मनुष्याच्या उद्धाराचा एकच मार्ग आहे. सत्य, अहिंसा, दया, परोपकार, इन्द्रियदमन यांच्याच योगानें परमेश्वराची खरी भक्ति साधते; म्हणून ही नीतितत्वें धर्माचा गाभाच होय, परमेश्वरकृपेनेच सुख व श्रेयस् आणि परमेश्वराच्या अवकृपेनेच दुःख व अधोगति प्राप्त होते; ही भावना उपनिषदात ( छान्दोग्योपनिषद् व श्वेताश्वतरोपनिषद् ) काही ठिकाणी दिसते. एकेश्वरवादी संप्रदाय मुळात अवैदिक आहे. वैदिक कर्मकाण्डाशी व औपनिषद्ज्ञानमार्गाशी असंबद्ध असे अवैदिक संप्रदाय प्राचीन काळी होते. त्यांतून वैष्णव, शैव, शाक्त इत्यादि एकेश्वरवादी संप्रदाय उत्पन्न झाले. भगवद्गीता ही वासुदेव संप्रदायाचा वैदिक मार्गाशी समन्वय झाल्यावर तयार झाली आहे.

(३) तिसरी हिंदुधर्माची उच्चतम शाखा तत्त्ववाद होय. कपिलसांख्य हा प्राचीन संप्रदाय याच वादाचा मुख्य प्रतिनिधि आहे. हा ईश्वराच्या अस्तित्वाचा अंगीकार करीत नाही. मनुष्याचा आत्मा विश्वाच्या तत्त्वाची अवगति करून घेऊनच मुक्त होतो, हें त्याचें मुख्य सार आहे. तत्त्वाची अवगति चित्तशुद्धीनेच होते. चित्तशुद्धि सात्विक आचरणाने, संयमाने व सत्य अहिंसा अस्तेय इत्यादि नैतिक आचरणानेच होते. याच तत्त्ववादी संप्रदायात जैन व बौद्ध यांचा अंतर्भाव होतो. हेही संप्रदाय ईश्वराचें अस्तित्व मानीत नाहीत.

हिंदुधर्माच्या वरील उच्चतम शाखा कर्मकाण्ड, वर्णाश्रमधर्म, पूजा, व्रतें, तीर्थें, मंदिर, यात्रा, इत्यादिकांना गौणच समजतात. या तीन धर्मशाखांपैकी एकेश्वर व सर्वेश्वर मानणारा भक्तिसंप्रदायच धर्मसंस्थेची खरी परिणति होय. परमेश्वरशरणागतीत सर्वधर्मांचें सार येतें. मनुष्याच्या अंतःकरणातील भक्तीची व श्रद्धेची परिसमाप्ति एकेश्वर वादात होते. ब्रह्मवाद व तत्ववाद यात तार्किक चिकित्सा व बौद्धिक संशोधनास सुरवात होते. तार्किक चिकित्सा व बौधिक संशोधन तर्कशास्त्राच्या प्रगल्भ नियमांच्या आश्रयाने सुरू झालें कीं धर्माचा पायाच डळमळू लागतो. अलौकिक कार्यकारणभाव जाऊन तेथें लौकिक उपपत्ति येते.

काही आधुनिक पंडित हिंदुधर्माच्या या संकीर्ण स्वरूपाचें समर्थनच करीत असतात. प्रो. राधाकृष्णन् हे त्यांचे अध्वर्यु

होत. ते म्हणतात— " हिंदुधर्म हा विशिष्ट धर्मग्रन्थ व विशिष्ट धर्मसंस्थापक यास प्रमाण मानीतच नाही. अनेक उपासनामार्ग, विविध उपास्यदेवता, बहुविध धर्मद्रष्टे यांचा त्यात संग्रह आहे. यावरून असें सिद्ध होतें कीं, हा धर्म व्यक्तिनिष्ठ नाही; हा विशिष्ट पंथाचा आग्रह धरीत नाही; हा धर्म अधिकारभेदाने सगळे धर्म संग्राह्य आहेत, असें मानितो; हा सर्वसंग्राहक व उदार आहे. शब्दप्रामाण्याला व ऐकान्तिक संप्रदायप्रामाण्याला तो कमी महत्व देतो. अनेक ऋषि, अनेक साधु, अनेक तत्ववाद, अनेक देवपूजा व अनेक प्रकारचे पारमार्थिक उन्नतीचे पंथ यांच्यामुळे हिंदुधर्म हा परमतसहिष्णु झाला आहे. तो दुसऱ्या धर्मसंप्रदायांना पूर्ण अधर्म समजून किंवा अधोगतीचा मार्ग समजून त्यांचा बहिष्कार करीत नाही. हिंदुधर्मात बुद्धिस्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य आहे. अत्यन्त रानटी लोकांच्या धर्मकल्पनांचाहि औदार्याने स्वीकार करून त्याने त्या लोकांना हिंदुसमाजात स्थान दिलें, व त्यांच्याशी वैर नाहीसे केलें. नाग, गणपति, मारुति, गरुड इत्यादि देवता त्या त्या विशिष्ट जमातींच्या देवता होत्या. हिंदु आचार्यांनी नागास शिवाचें भूषण व गणपतीस शिवाचें पुत्र बनविलें; मारुतीस रामाचा दास बनविलें. अशा रीतीने भिन्न देवतांची सांगड घालून निरनिराळया विरोधी जमातींचें सख्य साधलें. विरोधाचें सामुदायिक किंवा सामाजिक ऐक्यभावनेत रूपांतर केलें. हिंदुधर्म खिश्चन मुसलमान इत्यादि धर्मांप्रमाणे प्रचारकी व परमतासहिष्णु धर्म नाही. कारण तो सगळ्याच धर्मांना धार्मिक दृष्टीने अंशतः सत्य मानितो. "

वरीलप्रकारचें समर्थन गेल्या शतकातील अनेक महान् हिंदु-पंडितांनी केलें आहे. या समर्थनात अनेक हेत्वाभास आहेत. हीन धर्मकल्पनांचा संभाळ करणे किंवा स्वीकार करणे ही उदारता आहे, असें म्हणण्यापेक्षा दुर्बलता आहे असें म्हणणें अधिक युक्त आहे. कारण हीन कल्पनांच्या योगे मनुष्याची अधोगति होत असते, म्हणूनच मनुष्यास उच्च कल्पनांचा स्वीकार करावा लागतो. त्या हीन कल्पनात सत्यांश मानणे ही एक मोठी भ्रांतीच होय. त्या कल्पनांचा नाश करणें हें पहिलें कर्तव्य होय. उच्च कल्पनांचा धर्म हीन दर्जाच्या लोकसंघांना झेपत नाही, त्याचे ते अनधिकारी असतात, असें जर म्हणावें तर तें खरे नाही. कारण हिंदुधर्माने ज्या तऱ्हेच्या लोकसंघांना एकेश्वरवादी व ब्रह्मवादी अशा उच्च धर्मास अनधिकारी ठरविलें, त्याच तऱ्हेच्या अनेक मागासलेल्या लोकसंघांना व जमातीना बौद्ध खिश्चन व मुसलमान धर्मांच्या प्रचारकांनी स्वधर्माची दीक्षा देऊन उच्च दर्जाच्या समाजसंस्था निर्माण केल्या आहेत. अनेक तऱ्हेच्या मानवसमाजांच्या मागासलेल्या धर्मकल्पना नष्ट करून व त्यांना उच्च दर्जाचा धर्म देऊन त्यांची प्रगति होते, याची उदाहरणें खिश्चन व मुसलमान धर्मांच्या इतिहासात पुष्कळ आहेत. परमताबद्दल असहिष्णु असण्यापेक्षा परभ्रान्तीबद्दल सहिष्णु असणें हा मोठा गुन्हा आहे. बौद्ध खिश्चन व मुसलमान यासारखे प्रचारकी धर्म इतर पुरातन धर्मांचा नायनाट करण्यास जेव्हा बद्धपरिकर झाले, तेव्हां त्यांनी अनंत खुळ्या कल्पनांची मलिन पुटें मानवी अंतःकरणावरून नष्ट करून टाकली. हिंदुधर्माने त्या अप-

धर्मांचा संग्रह केला, यात काही पुरुषार्थ केला नाही; त्यात त्याचे दौर्बल्यच निदर्शनास आले.

हिंदुधर्म हा एक धर्म नाही, तो अनेक हीनोच्च धर्मांचा संग्रह आहे. त्यात शब्दप्रामाण्य नाही, हें म्हणणें अजिबात खोटें आहे. त्यात प्रत्येक संप्रदायाचें स्वतंत्र शब्दप्रमाण आहे. हिंदुसमाज एका विशिष्ट धर्मगुरूस, विशिष्ट धर्मग्रंथास किंवा विशिष्ट धर्मपंथास मानीत नाही, म्हणून त्यास उदार म्हणावयाचें असल्यास असेंही म्हणता येईल कीं, मानवजाति ही फार उदारमतवादी आहे. कारण ती कोणत्याही एकाच धर्मग्रंथाला व धर्मसंस्थापकाला मानीत नाही. तीत बौद्ध, ख्रिश्चन, हिंदु, मुसलमान असे अनेक धर्म आहेत. शब्द व रूढि प्रमाण नाही, अशी कोणतीही बाब हिंदुधर्मात नाही, हिंदुधर्मात शब्दप्रामाण्य भरपूर आहे. धर्मग्रन्थ, गुरुपरंपरा व रूढि यांचें प्रामाण्य हिंदुधर्माच्या प्रत्येक बाबीस आहे. लहान मोठ्या गटांचे धर्मगुरु व धर्मग्रन्थ पृथक् पृथक् आहेत. प्राचीनतम हीन-स्थितीतील अनेक नीच प्रकारच्या धार्मिक आचारविचारांना व चाली-रीतींना पावित्र्य दिल्यामुळे हिंदुधर्म हा एक अजबखाना किंवा पुराणवस्तुसंग्रहालयच बनला आहे. हिंदुधर्मीय मनुष्यें ख्रिश्चन किंवा मुसलमान यांच्या देवताना भजतात, व निरनिराळ्या पंथांच्या देवतांची व गुरूंची आराधना करतात, याचें कारण मतस्वातंत्र्य, बुद्धिस्वातंत्र्य अथवा उदारमनस्कता नव्हे. हें एक भोळ्या व भित्र्या स्वभावाचें लक्षण आहे. वाटेल त्या देवतेला व गुरूला शरण जाण्याची प्रवृत्ति, मनाचा कमकुवतपणाच दर्शविते. धार्मिक

अंधश्रद्धेची काळीकुट्ट अशी पुटावर पुटें चढल्यामुळे ज्ञानचक्षु अंधळा झाला, भोळ्या व खुळ्या कल्पनांच्या जालांत बुद्धीची पावलें गुंतली आणि पारलौकिक भ्रांतीच्या संमोहाने भावना लटक्या ध्येयांच्या अडगळी खाली अडकल्या म्हणजे हृदय दुर्बल व क्लीब बनतें आणि वाटेल तेथें नमतें.

निरनिराळ्या हीनोच्च जमातींचा एका सामाजिक संस्थेत अंतर्भाव करण्याकरिता व त्यांनी गुण्यागोविंदाने नांदावें म्हणून त्यांचे विविध धर्म हिंदूंनी राखले, हें ही ऐतिहासिक सत्य नाही. उलट असें आहे की, भारतवर्षांत ज्या ज्या मानवसंघांचे परस्परांशी संबंध आले, त्या मानवसंघांचें साहचर्य व संमिश्रण होत असता त्यांच्या धार्मिक व सामाजिक आचारविचारांचेंही संमिश्रण झालें. धार्मिक व सामाजिक आचारविचारांचा सहिष्णु बुद्धीने संग्रह केल्यामुळें त्या त्या जमातींचें हिंदु समाजांत समावेशन झालें, असें नसून त्याच्या उलट, त्या त्या जमातींचें संमिश्रण झाल्यामुळे त्यांच्या आचारविचारांचा संग्रह झाला; त्यांचे आचार विचार पूर्वींच्या लोकांच्या आचारविचारांत मिसळले. त्या त्या जमातींचे संमेलन केवळ मानव्यमूलक प्रेमामुळे झालें नाही, तर देशांतर, उपजीविका, युद्ध इत्यादि कारणांनी झालें. उदारता हें त्याचें कारण नाही. हिंदुधर्म उदार नाही, कृपण आहे. उपासना संप्रदायांच्या बाबतीतील शिथिलतेला उदारता हें नाव आहे. हिंदुधर्माच्या जातिसंस्था व वर्णसंस्था या अनुदारतेच्या मूर्ति आहेत. उदारता असती तर शूद्रदास्य, अस्पृश्यता, जातींची जन्मसिद्ध

उच्चनीचता इत्यादि हजारों वर्षे टिकून राहिलेले अनुदार व जुलमी कायदे हिंदुधर्माचे मुख्यभाग बनले नसते, आणि वैदिक धर्माचें परिपालन करण्यास शूद्रादिकांना हरकत घेणारे व त्या करिता देहान्तशिक्षा सांगणारे कायदे स्मृतींत सांगितले नसते. लहान मोठे अपधर्म हिंदुधर्मात टिकू शकले, याचें कारण उच्च धर्मकल्पनांना पूर्ण प्रभावी स्वरूप देणारी संघटित लोकशक्ति त्यांत निर्माण झाली नाही. उदात्त धर्माच्या चैतन्याने भारलेले, व उच्चनीच सगळ्याप्रकारच्या संस्कृतींच्या पातळीत असलेल्या मानवजातीला श्रेयाचा एकमेव मार्ग दाखवून हीन प्रवृत्तींच्या व कल्पनांच्या बन्धनातून मुक्त करणारे धर्मवीर हिंदुधर्माला पाहिजे तितके लाभले नाहीत, किंवा जरी लाभले असले तरी विशिष्ट सामाजिक परिस्थितीमुळे ते यशस्वी झाले नाहीत. आपसात शतकानुशतक कायम भांडणाऱ्या अरबांच्या, तुर्कांच्या व मध्यआशियातील भटक्यांच्या शेंकडो टोळ्यांना संघटित व एकजीव करून पश्चिम आशियात एक महान् समाजनिर्मितीचे कार्य इस्लामच्या संदेशाने केलें. त्यातील कित्येक टोळ्यांचा पूर्वेतिहास पाहिला तर त्यातील लोक हिंदुस्तानातील खालच्या पातळीतील लोकांपेक्षा काही उन्नत संस्कृतीचे नव्हते. ख्रिश्चन धर्माची व बुद्धधर्माची हीच गोष्ट थोड्याफार फरकाने सांगता येईल. उच्च कल्पनांच्या छत्राखाली अनंत हीन कल्पना सहिष्णुतेच्या नांवाने वावरू देणे हें बौद्धिक व मानसिक अधोगतीचें लक्षण आहे.

एकेश्वरवादी, ब्रह्मवादी किंवा तत्त्ववादी धर्मसंस्थेत मानवी जीवनास उपयुक्त आणि हीनोच्च संस्कृतीतील मानवसंघांना व राष्ट्रांना

प्रगतीच्या नव्या युगात घेऊन जाणारी अशी व्यापक तत्त्वें असतात. त्या तत्त्वांनाच जेव्हा पूर्ण प्राधान्य उत्पन्न होते, तेव्हाच या एकेश्वरवादी किंवा नीतिप्रधान धर्मसंस्था प्रचारक बनतात. त्यांच्या प्रभावाने हीन अपधर्मांचा नाश होऊन निर्मळ बुद्धिवादावर आधारलेली सामाजिक व भौतिक शास्त्रें आणि कला यांच्या विकासास अवसर मिळतो. विशिष्ट मानवगटाचे अनेक भानगडीचे व गुंतागुंतीचे रूढ कर्मकाण्ड, परंपरागत व त्या त्या समाजापुरत्या असलेल्या सामाजिक संकुचित चालीरीति व विशिष्ट मानवगटाला मान्य असलेले संस्कारविधि, यांना धार्मिक दृष्टीने गौणत्व दिल्याशिवाय हे उच्चतत्त्ववादी धर्म प्रसरणशील व प्रचारशील होऊ शकत नाहीत. विशिष्ट जात, विशिष्ट वंश, विशिष्ट राष्ट्र व विशिष्ट जमात यांच्या मर्यादांचे उल्लंघन करण्याचें सामर्थ्य ह्या गोष्टींचा त्याग केल्यामुळेच धर्माचें ठायी येतें. विशिष्ट रूढि व सामाजिक कायदे ह्याच ज्या धर्मसंस्थेचा मुख्य भाग असतो, तो धर्म कितीही उच्च व व्यापक तत्त्वांनी परिपूर्ण असला तरी तो प्रसरणशील व पराक्रमी होत नाही. एका समाजाच्या किंवा जमातीच्या रूढी व चालीरीति अन्य जमाती व समाज मोठ्याप्रमाणात उचलू शकत नाहीत. व्यापक कल्पनांनाच ज्या धर्मात मध्यवर्ती स्थान लाभतें, विशिष्ट धर्मसंस्थापक व विशिष्ट ग्रंथ यांनाच जेथें एकमेवाद्वितीय स्थान लाभतें, असे सुटसुटीत धर्मच परक्या जमातींत व समाजात प्रसरणयोग्य होतात.

हिंदुधर्माची गोष्ट तशी नव्हती. त्यात भिन्न भिन्न जमातींचें भिन्न भिन्न कर्मकाण्ड, कुलजातिदेशधर्म व विभिन्न व विषम

चालीरीति यांनाच सनातनधर्मत्व प्राप्त झालें. शेकडो लहान लहान जमाती, वंश व संघ यांच्या उच्चनीच आचार विचारांना व हीनोत्तम कल्पनांना पावित्र्य व वंद्यत्व प्राप्त झालें. याचे कारण असें आहे कीं, ज्या राजकीय व सामाजिक शक्तींना संकुचित मर्यादांचा व क्षुद्र बंधनजालांचा प्रगतीच्या मार्गात अडथळा वाटू लागतो आणि ज्यांना विविध मानवजातींच्या जीवनाला व्यापक प्रमाणावर संघटित करण्याचें कार्य करण्याची गरज उत्पन्न होते, ज्यांच्यात प्रबल मध्यवर्ती राज्यसंस्था उत्पन्न होते, अशा राजकीय सामाजिक शक्ती हिंदुस्थानात चिरकालपर्यंत टिकून राहिल्या नाहीत. पूर्ण उत्कर्ष होण्याच्या अगोदरच क्षीण होऊन गेल्या, त्यामुळे श्रुतिस्मृतींच्या व विशिष्ट कुलजातिधर्मांच्या संकुचित कायद्यांनाच महत्व देणारी प्रवृत्ति या देशात शेवटपर्यंत टिकून राहिली. व्यापक धर्मतत्त्वें अधांतरीच राहिली. त्या धर्मतत्त्वात हीन विधिनिषेधांना डावलण्याचें सामर्थ्य आलें नाही. त्या तत्त्वांच्या आधारें नवी उन्नत समाजरचना झाली नाही.

या संकीर्ण हिंदुधर्माला जगविण्याचें कार्य पुरोहित ब्राह्मणवर्गाने दीर्घकालपर्यंत केले. त्यामुळे ऐहिकप्रधान वस्तुवादी विचारसरणीस प्रगल्भता आली नाही व तशा विचारसरणीस पोषक समाजरचनाही अस्तित्वात आली नाही. हीन धर्मावर जगणारा पुरोहित वर्गच या धार्मिक गोंधळास व जातिसंस्थेस जबाबदार आहे. ग्रह, भूत, वेताळ, देवता इत्यादिक भ्रांतीवरच जगणाऱ्या वर्गाने लहानमोठ्या जमातींच्या हीन धर्मांची राखण स्वतःच्या स्वार्थी प्रवृत्तीमुळे

केली. शेकडो देवता, शकुनापशकुन कल्पना, वेडेवाकडे विधिनिषेध, व्रतवैकल्यें, उद्यापनें, प्रायश्चित्तें, मुहूर्त, शांति, ग्रहपीडापरिहार इत्यादि प्रकारचा ढोंग धत्तुरा समाजात कायम राखून स्वतःचें प्रस्थ कायम राखलें. पौराणिक धर्मशास्त्र याच गोष्टीची साक्ष देते.

ज्या समाज-संस्थेत पुरोहित वर्गापेक्षा निराळ्या उद्यमशील वर्गांना प्राधान्य येतें, तेथेच नवे प्रगमनशील विचार प्रभावी होतात. ग्रीस देशात पुरोहितवर्ग मागे पडल्यावर तत्त्वज्ञान व विज्ञान निर्माण झालें. दीर्घकाल टिकलेल्या रोमन साम्राज्यामुळेच व्यापक खिश्चन धर्म युरोपात रूढ झाला. व्यापारी व क्षत्रिय वर्गाला अरबस्तानात महत्त्व आल्यावरच इस्लामची स्थापना झाली. हिंदुस्तानात व्यापक प्रचारशील बौद्धधर्म ब्राम्हणेतर वर्गांनीच स्थापन केला. पुरोहित-वर्चस्वाला उतरती कळा लागल्यावरच नव्या पाश्चात्य संस्कृतीचा व सुधारणेचा उदय झाला. मानवसमाज पहिल्या रानटी स्थितींतून बाहेर आला त्याच वेळीं पुरोहित वर्ग हा प्रगतीचा नेता होता. त्यानंतर त्याने प्रगतीच्या मार्गात अनेकवार अडथळेच निर्माण केले. हिंदुस्तानचा इतिहास याला साक्षी आहे. हिंदुधर्माच्या अस्ताव्यस्त स्वरूपास तोच जबाबदार आहे.

हिंदुधर्माच्या स्वरूपातील विविध थरांची समीक्षा झाली.

हिंदुधर्मातील इतिहासोपपत्ति

हिंदुधर्मात जगातील इतर धर्माप्रमाणेंच मानवी समाजातील घडामोडी, उन्नति व अवनति यांची मीमांसा केली आहे. यासच इतिहासाची उपपत्ति

( Philosophy of History ) असें म्हणतात. हिंदुधर्मग्रंथातील इतिहासाच्या उपपत्ति काय आहेत तें पाहू.

दैवी व मानवी अशा दोन तऱ्हेच्या उपपत्ति हिंदुधर्मात सांगितल्या आहेत. अवतारवाद व युगवाद ही इतिहासाची दैवी उपपत्ति होय. भारतात, गीतेत व पुराणांत ईश्वर अवतार घेतो व मानवांना व सज्जनांना संकटातून सोडवितो, असें म्हटलें आहे. कित्येक पुराणात असें म्हटलें आहे कीं, राक्षसांचे व असुरांचे मानवात जेव्हां अवतार होतात तेव्हां लोक किंवा समाज अवनतीला जातात; देव जेव्हां मानवांत अवतरतात तेव्हां अधःपातापासून सुटका होते व उन्नतीचा मार्ग सुलभ होतो. चार युगांच्या चक्रनेमिक्रमाची एक उपपत्ति हिंदुधर्मात आहे. या उपपत्तिप्रमाणे कालप्रभावानेच समाजाची प्रगति किंवा अवनति होत असते. उन्नति-अवनतीचे रहाटगाडगे सारखे सुरू आहे. कलियुगात पूर्ण अवनति व कृतयुगात पूर्ण उन्नति होते. हा क्रम अपरिहार्य आहे. या उपपत्तींचा अर्थ इतकाच आहे कीं समाजाचें किंवा मानवांचें भवितव्य अवतार, विभूति, अदृष्ट, अलौकिकशक्ति किंवा काल यांच्या आधीन आहे, मानव पराधीन आहे. तो दैवाचा किंवा देवाचा बळी आहे.

इतिहासाची मानवी किंवा लौकिक उपपत्ति महाभारतात शांतिपर्वात भीष्माने सांगितली आहे. राजसंस्था उत्तम असली म्हणजे प्रगति होते, व त्या संस्थेत दुष्ट राजा आला म्हणजे अवनति होते.

समाजाच्या उत्कर्षापकर्षास राजसंस्थाच जबाबदार आहे. कृतयुग किंवा कलियुग राजामुळेच येते. ' राजा कालस्य कारणम् '

महाभारतात दुसरी एक लौकिक व बुद्धिवादी उपपत्ति सूचित केली आहे. ती म्हणजे, लोकप्रवृत्ति हीच ऐतिहासिक उत्कर्षापकर्षाची कारक आहे. राजाला लोकच निर्माण करतात. एकदा राजा नव्हता तेव्हां लोक स्वधर्माच्या बलानेच किंवा आपसात वागण्याचे नियमनिर्बंध ठरवूनच उत्तम तऱ्हेने जीवनयात्रा चालवीत होते. काही काळाने बेबंदशाही ( मात्स्यन्याय ) माजली म्हणून लोकांनी मनूस राज्यपद दिलें. दैवी उपपत्तीच्या ऐवजी इतिहासाची लौकिक उपपत्ति सुचण्याइतकी बौद्धिक प्रगति भारतीय तत्त्ववेत्यांची इतक्या प्राचीनकाळी झाली होती. ही उपपत्ति विचारात दृढमूल होण्याइतकें सामर्थ्य त्या वेळच्या समाजात राहिलें नव्हते. त्यामुळे दैवी उपपत्तीनेच भारतीय मनावर अंमल गाजविला. श्रुति—स्मृतींतहि[1] एक उपपत्ति आहे; ती अशी कीं, लोकधारणा राजा व पुरोहित यांच्यावर अवलंबून असते, त्यांच्या कर्तव्यजागृतीवरच समाजाचें तरणे किंवा बुडणे अवलंबून असते.

ज्यू, पारशी, ख्रिश्चन व मुसलमान यांच्या धर्मात इतिहासाची दैवी उपपत्तीच सांगितली आहे. पारशी धर्मशास्त्राप्रमाणे अंग्रमैन्यू किंवा अनृतशक्ति प्रभाव गाजवू लागली म्हणजे अंधकारयुग जगास ग्रासते. तें अंधयुग अजून सुरू आहे. तो दुष्ट प्रभाव

( १ ) शतपथब्राह्मण गौतम—धर्मसूत्र.

कमी होता होता शेवटी दिवस उजाडेल; त्या दिवशी शेवटचा न्याय निर्णय होईल व ईश्वरी राज्याची स्थापना होईल. ख्रिश्चन व मुसलमान धर्माप्रमाणे सैतान हीच अनिष्ट पापशक्ति आहे. तीच अधःपाताला कारण होते. " न्यायाचा शेवटचा दिवस व ईश्वरी राज्याची किंवा स्वर्गाची स्थापना " ही पारशी धर्मातील कल्पनाच ख्रिश्चन व मुसलमान मानतात. वारंवार प्रेषित येतात व ईश्वरी संदेश देऊन मानवांना सन्मार्ग दाखवितात. ख्रिश्चनांच्या मते येशू व मुसलमानांच्या मते महंमद हा शेवटचा व वरिष्ठ प्रेषित होय. आसुरीशक्तीमुळे जग दुराचारी बनते व दैवी शक्तीमुळे सत्ययुग, स्वर्गीय जीवन, ईश्वरी राज्य सुरू होते, ही कल्पना सगळ्याच धर्मांमध्ये सारखी आहे.

हिंदुधर्मात दर्शनांचा किंवा तत्त्वज्ञानांचा उदय झाल्यावर सगळ्या मानवांच्या उद्धाराच्या व पतनाच्या दैवी मीमांसेबरोबर, वैयक्तिक मोक्षाच्या विचारासही महत्त्व आले.

हिंदुधर्माच्या ऐतिहासिक अवस्था

प्राचीनकालीन अनेक प्रकारच्या अवस्थांतून जाताजाता हिंदुधर्मास विद्यमान स्वरूप प्राप्त झालें आहे. त्याच्या पाच अवस्था इतिहासक्रमात निश्चित करता येतात. ( १ ) ( Tribal Religions ) पृथक् पृथक् संघधर्म, ( २ ) वेदपूर्व भारतीयांचा अनेकदेवतावादी धर्म, ( ३ ) वैदिक आर्यांचा श्रौतस्मार्त धर्म, ( ४ ) शैव, वैष्णव, बौद्ध, जैन इत्यादि विश्वधर्म, ( ५ ) श्रुति-स्मृति-पुराणोक्त हिंदुधर्म.

(१) हें अगदी प्राथमिक स्थितीतील मानवधर्माचें स्वरूप

पृथक् पृथक् संघधर्म

आहे. कृषिशिल्पादि भिन्न भिन्न व्यवसाय व श्रमविभाग यांनी बनलेला संमिश्र स्वरूपाचा स्थिरसमाज उत्पन्न होण्याच्या अगोदर गणधर्म किंवा संघधर्म अस्थिर भटक्या समाजांत अस्तित्वात असतात. सूर्य, चंद्र, अग्नि, नाग, गणपति, हनुमान, नंदी, अश्वत्थ, गंगा इत्यादि देव हे अतिप्राचीन विशिष्ट मानवगणांचे संघदेव होते. नाग नावाचा मानवसंघ हिंदुस्तानात प्राचीन काळी होता, त्याच्या संस्कृतीचा अवशेष म्हणजे नागपंचमीचा सण होय. वानर नावाचे लोक होते, ही गोष्ट रामायणावरून दिसते; त्यांचाच हनुमान हा देव आहे. हिंदुलोक बैलाची व नंदीची पूजा करितात; नंदी हा गणदेवच होता. वेदांतील इंद्र, वरुण, अश्वी, भग, वायु इत्यादि देव सुद्धा प्रथमतः निरनिराळ्या आर्यकुलांचे किंवा टोळक्यांचे पृथक् कुलदेव असावेत, असा काही वेदाभ्यासी पंडितांचा तर्क आहे. प्रत्येक गणाचा निराळा देव होता व पुष्कळ वेळा त्या गणाचें नाव व देवाचें नाव एकच होतें. जी मानवकुलें अनेक सामाजिक कारणास्तव एकत्र येऊन मिसळत, त्यांच्या उपासना व आचार ही एकत्रित होत असत. त्याप्रमाणे एकत्रित झालेल्या अनेक मानवगणांचे देवधर्म हिंदुधर्मात एकत्र आले आहेत. सांघिक यातुधर्म ( Tribal Magic ) हा प्राथमिक ( Primitive ) गणांचा धर्म आहे. पीकपाणी चांगलें यावें, आणि गुरें ढोरें व माणसें यांची प्रजा वाढावी, याकरिता सगळा

---

(१) The Religions of India p. 171 by E. W. Hopkins.

समाज एकत्रित होऊन एक मोठा वार्षिक सण किंवा जत्रा प्राथमिक गण साजरी करितात, त्यात धार्मिक विधि व नाच तमाशा करणे, हा महत्त्वाचा भाग असतो. अशा तऱ्हेचे प्राचीन गणधर्म हिंदुधर्मात सापडतात. होळीचा सण हें त्याचें महत्वाचें उदाहरण आहे. होळीचा सण हें प्राचीन काळचे सांघिक यातुकर्म ( Tribal magic ) आहे. ग्रामदेव व प्रांतीय देव हिंदुस्थानात प्रत्येक प्रांतात निरनिराळे आहेत. ते सुद्धा मूळचे संघदेवच होत. मानसा व काली ह्या बंगाली देवता आहे; शितळा देवी संयुक्तप्रान्तीय आहे; गोरीय व दिल्लीगोरीय हे बिहारमध्यें अत्यंत पूज्य मानलेले देव आहेत; षडानन किंवा कार्तिकस्वामी हा तामीळ देशातला अत्यंत पूज्य देव आहे; बिरोबा-खंडोबा हे महाराष्ट्राचे देव आहेत. ह्या प्रांतीय देवता व इतर ग्रामदेवता मूळच्या प्राथमिक गणांच्या देवता होत.

उंबर, पिंपळ इत्यादि वृक्षांची आणि जनावरांची पूजा करण्याची पद्धति हा रानटी जमातींचा धर्म आहे. हा धर्म हिंदुस्थानातील अतिप्राचीन रहिवाशांचा म्हणजे नेग्रिटो ( Negrito ) नावाच्या मानवगणांचा धर्म असावा, असा काही समाजशास्त्रज्ञांचा तर्क [1] आहे. वैदिक लोकांचीच ही परंपरा असण्याचाही संभव आहे. अथर्ववेदात वनस्पतींना देवता समजून त्यांच्या उद्देशाने प्रार्थना आल्या आहेत. यजुर्वेदात यज्ञीय वृक्ष अत्यंत पवित्र व पूज्य मानले आहेत. वैदिक आर्यांच्या अतिप्राचीन रानटी अवस्थेतील या गोष्टी

( १ ) Census Ethnography, India. p. 65. 1901-1931.

असतील. उंबर, पिंपळ, वड, शमी हे यज्ञीय वृक्ष आहेत. गाय, बैल तर यज्ञीय पशु आहेत. यज्ञीय पशूंना पूज्यत्व व देवत्व देण्याची प्रथा पुष्कळ धर्मांत सापडते. जगातील सगळ्या पाश्चात्य व पौर्वात्य मानववंशात नरमेध किंवा मनुष्यें बळी देण्याची चाल सापडते. ही चाल हिंदुस्थानात ब्रिटिशांनी कायद्याने बंद केली. ही चाल अजून हिंदुस्तानातील काही भागात क्वचित् सापडते. वेदांत नरमेध सांगितला आहे. त्यावेळी माणसाना मारण्याची चाल बंद झाली होती; पण ती वैदिक लोकात केव्हां तरी होती, ही गोष्ट शुनःशेपाच्या कथेवरून कळून येते. धान्य, पशु, प्रजा यांची समृद्धि होण्यास मनुष्याच्या शरीरांतील आत्मद्रव्याचा उपयोग व्हावा, म्हणून नरबली, नरमेध किंवा नरमांसाशन विधिपूर्वक करण्याची चाल मनुष्यजातीत पडली. ती हिंदुधर्मात फार प्राचीन काळापासून बंद झाली आहे.

वेदपूर्वभारतीयांचा धर्म

(२) वैदिक आर्यांच्या पूर्वी हिंदुस्तानात अस्तित्वात असलेल्या सुसंस्कृत समाजांचा हा धर्म होय. ह्या धर्मात व इजिप्त इराक मधील पुरातन धर्मात अतीशय साम्य आहे. हिंदुस्तानातील अत्यंत जुन्या संस्कृतीचें साम्य आशियामायनर व भूमध्यसमुद्रीय प्रदेशातील संस्कृतीशी फारमोठ्या प्रमाणांत आढळते. आणि तेथील मानववंश व येथील मानववंश यांच्यामध्ये सुद्धा उत्कट साम्य आढळतें, असें मोहेंजोदारो व हराप्पा येथील उत्खननात सांपडलेल्या नगरांच्या अवशेषावरून गूह व कीथ या संशोधकांनीं निश्चित केलें आहे. वैदिक आर्यांच्या

(१) Ibid. p. I4.

पूर्वीची किंवा वेदात नसलेली धर्मसंस्था पाच हजार वर्षांपूर्वी सिंधु-तीरावर निर्माण झाली. त्या संस्कृतीतील मानवांना भूमध्य समुद्रीय ( Mediterranean ) किंवा आर्मेनॉईड ( Armenoid ) या संज्ञेने मानवजातिशास्त्रज्ञ संबोधितात. इजिप्त, क्रीट, सुमेर, असीरिया, बाबिलोनिया व खाल्डिया यांच्या संस्कृतीत आणि मानववंशात अत्यंत साम्य सापडल्यामुळे प्राचीन भारताच्या अतिप्राचीन इतिहासाचा एक महत्वाचा कालखंड इतिहासज्ञास दिसू लागला. इजिप्त क्रीट व मेसापोटेमिया येथील संस्कृतीतही शिव विष्णु व काली या देवता असून नागपूजा लिंगपूजा देवी मातेची पूजा चंद्रपूजा ग्रहपूजा व पितृपूजा ही आहेतच. लिंग व पूजा हे शब्दसुद्धा वेदांत सापडत नाहीत, हे अवैदिक शब्द आहेत. नवग्रहपूजा लिंगपूजा व देवी-पूजा यांचा मुख्य वैदिक वाङ्मयांत उल्लेख नाही. देवदासी पद्धति, मूर्तिपूजापद्धति, मुहूर्तफलज्योतिष, सातवार, लेखनकला, देवळातील वतनदार पुजारी, गावजोशी इत्यादि गोष्टी भूमध्यसमुद्रीय मानवसंस्कृतीचीच अंगे होत. नाईल, युफ्राटिस–तैग्रिस व सिंधु यांच्या तीरावर वाढलेल्या प्राचीन संस्कृतीचा वारसा हिंदुसमाजाकडे अजूनही चालू आहे. हीच वेदपूर्व भारतीय संस्कृति होय. त्यातील धर्म हिन्दूधर्माचा महत्वाचा भाग होय. ह्याच धर्माच्या पायावर अखिल हिंदूंचा समान धर्म हजारो वर्षांपासून निर्माण झाला आहे.

वैदिक–आर्यांचा श्रौतस्मार्तधर्म

( ३ ) हा धर्म ज्यांचा होता ते स्वतःस आर्य म्हणवीत. ह्या लोकांनी येथील अवैदिक प्रजेवर सत्ता स्थापन केली. ते सर्व हिंदुस्थानावर एकदम सार्वभौम सत्ता स्थापू शकले नाहीत. उत्तर हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील

व वायव्येकडील भागांत पहिल्यांदा या मानवगटाचें स्वामित्व स्थापित झालें. नंतर हळूहळू प्रत्यक्षतः किंवा अप्रत्यक्षत: बाकीच्या भारतीय प्रजेवर त्यांचे आधिपत्य पसरलें. हें दोन तऱ्हेने निर्माण झालें. प्रत्यक्ष राज्यसत्तेच्या द्वारे व पुरोहितांच्या धार्मिक आधिपत्याच्या द्वारे. हे मुळात [1]भटके, शिकारी, युयुत्सु व पशुपाल होते. घोड्यांचा उपयोग युद्धात करण्याची माहिती नसलेल्या पूर्वभारतीयांना यांनी युद्धात घोड्यांचा उपयोग करून जिंकले असावें. हे लोक भटके पशुपाल असल्यामुळे कृषिशिल्पप्रधान व स्थिरसमाजसंस्थेच्या रूपाने राहिलेल्या प्रजेचा पराभव करू शकले. भटक्या टोळयांच्या ठिकाणी चपलता, काटकपणा, लष्करी संघटना इत्यादि युद्धोपयुक्त गुण अधिक प्रमाणात वाढीस लागलेले असतात. गोमेध, अश्वमेध, अजमेध इत्यादि पशुयज्ञांचा धर्म यांच्या मध्ये होता. यज्ञातील पुरोहितांच्या दक्षिणा म्हणजे गौ, अश्व, अज, मेष इत्यादि पशु किंवा सोनेरुपे असे, यावरून पशुप्रधानच जीवन त्यांचें असावें असें दिसतें. यज्ञात भूदानाची कल्पना उत्तरकालीन वाङ्मयात दिसते. ऋग्वेदात भूदानाचा उल्लेख नाही. ऋग्वेदातील बहुतेक भाग हिंदुस्थानात विजय मिळवून स्थिरस्थावरता येऊ लागल्यावर निर्माण झालेला आहे. निसर्गशक्तींच्या ठिकाणी कल्पिलेल्या चेतन देवतांची आराधना किंवा उपासना हा यांचा मुख्य धर्म होता. ही आराधना म्हणजेच यज्ञ होय. ऐहिक जीवनातील योगक्षेम नीट चालण्यास लागणाऱ्या भौतिक साधनांची त्या देवतांच्या आराधनेने

---

(१) Vicissitudes of Aryan civilization, by M. M. Kunte, p. 525.

म्हणजे यज्ञाने प्राप्ति करून घेणे हें यज्ञकर्माचें म्हणजे वैदिकधर्माचें मुख्य ध्येय होते. जादूटोणा हा धर्म ( Magic ) त्यांचाच होता; तो अथर्ववेदात मुख्यतः प्रतिपादिला आहे. यज्ञाचेंहि प्राथमिक रूप जादूटोण्यासारखें होतें, असें काम्येष्टींवरून दिसतें.

सूर्य, सविता, पूषन्, मित्र व भग या नावानी वैदिकलोक सूर्याची उपासना करीत. द्यावापृथिवी, वरुण, विश्वकर्मन्, अदिति, त्वष्टा, उषस्, अश्वी, इंद्र, ब्रह्मणस्पति, मरुत्, रुद्र, पर्जन्य, अग्नि, सोम, यम आणि पितर हे देव ऋग्वेदात स्तविले आहेत. ऋग्वेदातील स्तोत्रें करणारे ऋषि, पुष्कळ ठिकाणीं त्या त्या स्तोत्रात यापैकी प्रत्येक देवतेची भक्ति करिताना त्या देवतेच्या सर्व शक्तिमत्वाचें व सर्वज्ञत्वाचें वर्णन करतात. या देवतांचे मूळचें भिन्नशक्तिमत्व ऋग्वेदकाळी लोपावयास लागलें, त्यामुळें प्रत्येक देवता संपूर्ण परमेश्वर बनू लागली होती. यजुर्वेदातील यज्ञात मात्र त्या देवतांचे पृथक् शक्तिमत्व गृहीत धरलेलें दिसते. यजुर्वेदाचें ग्रंथरूपाने ग्रथन ऋग्वेदसंहितेनंतर झालें असलें तरी त्यातील यज्ञसंस्था ऋग्वेदातील स्तोत्रांच्याही पूर्वीपासून चालत आली असावी; त्यामुळे त्यात देवतांचे पृथक् व्यक्तिमत्व प्रकट दिसते. अथर्ववेदातहि या देवता आहेत. तेथें या देवतांचा उपयोग जादूंत केला आहे. अथर्ववेदातील जादूटोण्याचा धर्म ऋग्वेदातील आर्यांचाच आहे. ऋग्वेदातील अनेक ऋषींना, विशेषतः वसिष्ठाला, जादू येत होती. भृगु अंगिरस व अथर्वन् गोत्रांतील आर्य जादूटोण्यात किंवा जंतरमंतर करण्यात प्रवीण होते. त्यावेळचा आयुर्वेदही जादूटोण्याचाच होता.

ऐहिक भौतिक जीवनाशी नित्य संबद्ध असलेल्या भौतिक महान् शक्तींच्या ठिकाणीच वैदिक देवता कल्पिलेल्या आहेत. अग्नीचें व सूर्याचें शुद्ध भौतिक स्वरूप आकलन करण्याची ज्यावेळी पात्रता मानवमनाला नव्हती, तेव्हा त्यांच्या ठायी अद्भुत चमत्कृतिजनक चेतन शक्तीची कल्पना माणसाने केली. मित्र व वरुग ह्या अनुक्रमाने दिवस व रात्र यांच्या ठायी आरोपिलेल्या देवता आहेत; सवितृ वर्षाऋतूतला सूर्य होय, त्यावेळी बीजांना अंकुर फुटतात, व त्यांची हळु हळु वाढ होते; पूषन् धान्य व वनस्पति यांचे पोषण करण्यास उपयुक्त उष्णता देणारा सूर्य होय. उषस् ही पहाटेस काम करण्यास उद्युक्त होणाऱ्या पशुपाल व शेतकरी यांच्या प्रतिभेला अरुणवर्ण धारण करणाऱ्या दिशेस दिसलेली देवता आहे. इंद्र व भग ह्या देवतांचें मूळचें स्वरूप निश्चित करणें कठीग आहे; पण साधारण अनुमान करता येतें. इंद्र हा लढवय्या, शत्रूवर एकदम हल्ला करणारा, सोमरसाचा फार भोक्ता, सबंध बैल किंवा इतर जनावर भाजून खाणारा व गडगडाट करणाऱ्या आभाळाचा देव आहे. मरुत् म्हणजे मारेकरी, हे इंद्राचे सहकारी आहेत. वाघ, लांडगा किंवा इतर हिंस्र पशूंची शिकार करणाऱ्या, व शत्रूच्या तावडीतून आपलें पशुधन परत आणणाऱ्या व सोमपानाने मत्त होणाऱ्या प्राचीन आर्यांच्या अंगांत शिरणारें ( Spirit ) सामर्थ्य, जोम किंवा क्षोभ म्हणजेच इंद्र होय. कित्येक वेळा द्रष्ट्या ऋषींच्या अंगात इंद्र येत असे. इंद्राने रचलेली सूक्तें ऋग्वेदात आहेत; ऋषी ज्यावेळी तें सूक्त रचावयास लागला, तेव्हा त्याच्या ठिकाणी इंद्रच शिरला व त्याने ते सूक्त रचलें, असें त्या ऋषीस व त्या-

वेळच्या लोकांना वाटलें. रुद्र प्रथम वादळाचा देव होता. अदिति म्हणजे अनंत अखंड आकाश देवता.

वर वर्णन केल्याप्रमाणे वेदातील सगळयाच देवतांचें भौतिक अधिष्ठान पूर्णपणे उपपन्न करतां येईल, असें मात्र सांगता येत नाही; पण बऱ्याच देवतांचे अधिष्ठान भौतिक शक्तीच होत, याबद्दल पंडितांत मतभेद नाहीत. भौतिक जीवनातील भौतिक आकांक्षा पूर्ण करणारी साधनें मिळविण्याकरिताच मुख्यतः या देवतांची आराधना केली जात होती. भौतिक गरजांकरिताच पहिल्यांदा धर्म व तत्संबंधी कल्पना मनुष्यजातीत निर्माण झाल्या. अग्नि व सूर्य यांच्यावर पुष्कळच प्राथमिक भौतिक गरजा अवलंबून असतात. त्यांची नित्य उपासना वैदिक गृहस्थ करीत असे. त्यासच अग्निहोत्र असें म्हणतात. पशुपालन मुख्य व कृषि गौण असें जीवन घालविणाऱ्या आर्यांचे देवताराधन म्हणजे अग्निहोत्र व दर्शपूर्णमासेष्टि होय. ह्या विधींचे गोपालन हें प्रधान अंग आहे. या विधींचे स्वर्गलोकप्राप्ति हें फळ उत्तरवैदिक वाङ्मयात ब्राह्मणग्रंथात सांगितलें आहे. वैदिक मंत्रांतील प्रार्थनेमध्ये ऐहिक भौतिक आकांक्षांचाच सारखा घोष आहे. अन्न, पशु, धन, शरीरेंद्रिय-सामर्थ्य, भार्या, दास, वीर पुत्र, शत्रुनाश व रोगनिवारण यांची आणि यज्ञविद्याजन्य तेजाची ( ब्रह्मवर्चसाची ) मागणी यात मुख्य आहे. स्वर्ग हा बराच उशिरा ब्राह्मणग्रंथात शिरलेला आहे. पारलौकिक मरणोत्तर गतीचा विचार वैदिक कर्मकांडांत आहे, पण त्याचें नीट विवरण त्यात आढळत नाही. देवयानगति, पितृ-

याणगति, अंधतमस्, देवलोक, पितृलोक, मरणोत्तर-उत्तम जन्म व निकृष्ट जन्म, यांचे उल्लेख वेदात आहेत; पण त्यांचा खल उत्तर वैदिक वाङ्मयात व विशेषतः उपनिषदात अधिक आहे.

संस्कार व आश्रमधर्म यांचा उल्लेख वेदात आहे. वैदिक लोकात ऋग्वेदकाली ब्रह्मचारी व गृहस्थ हे दोनच आश्रम रूढ व मान्य होते. चार आश्रमांचा उल्लेख वेदांच्या शेवटच्या काळात विशेषतः उपनिषदांतच दिसतो. गृहस्थाश्रम हाच एक आश्रम वेदांना मान्य आहे; त्याचें प्रत्यक्ष विधान वेदात आहे, इतर आश्रमांचे नाही; असें एका प्राचीन आचार्याचें मत गौतमधर्म-[1] शास्त्रात सांगितलें आहे. विद्याग्रहणार्थ पहिला ब्रह्मचर्य आश्रम होता, असें ऋग्वेदांतील एक दोन उल्लेखांवरून दिसतें. अथर्ववेदात व ब्राह्मण ग्रंथांत ब्रह्मचर्याश्रमाचें व विशेषतः उपनयनाचें विधान विस्ताराने आलें आहे. चार आश्रमांचा उल्लेख छांदोग्य उपनिषदात आला आहे.

वानप्रस्थ व संन्यास यांचा स्वीकार वैदिक आर्यांनी अवैदिक लोकांच्या संस्कृतीतून घेतलेला आहे; अवैदिक लोकांच्या संस्कृतीच्या स्वीकाराने संस्कृत झालेल्या वैदिक आर्यांनी ते बऱ्याच उशिरा आत्मसात् केले. वैदिक आर्य सुसंस्कृत होण्यापूर्वी इजिप्त, मेसापोटेमिया ( इराक ), व हिंदुस्थान येथें अवैदिक समाजांनी सुधारणा व संस्कृति मोठ्या उच्च पदवीस नेली होती. या सुसं-

( १ ) गौतमधर्मसूत्र ८।८

स्कृत समाजांच्या सांनिध्यात आलेल्या विजयी वैदिकांनी पूर्वकालीन संस्कृतीतून पुष्कळच विद्या, कला व सामाजिक आचार–विचार उचलले. संन्यास किंवा वैराग्यधर्म स्वीकारण्याची सामाजिक परिस्थिति उत्पन्न झाल्यावरच वैदिकांनी त्याचा स्वीकार केला.

सोळा संस्कार ही कल्पना उत्तर स्मृतिवाङ्मयातच दिसते. इतर स्मृतींपेक्षा अधिक प्राचीन असलेल्या गोतमधर्मसूत्राने[1] यज्ञांचाही समावेश संस्कारांत केला आहे. त्यांत चाळीस संस्कार सांगितले आहेत. अग्न्याधान, दर्शपूर्णमासेष्टि, सोमयाग, पशुबन्ध इत्यादि यज्ञहि संस्कारच होत. गर्भाधान, पुंसवन, जातकर्म, नामकर्म, चौल, उपनयन, विवाह, अंत्येष्टि इत्यादि षोडश संस्कारांचा प्राधान्यानें अथर्ववेदाशी संबंध आहे. अथर्ववेदाच्या कौशिकसूत्रात व गृह्यसूत्रात हे संस्कारविधि विस्ताराने सांगितले आहेत, पण जुन्या गृह्यसूत्रात 'षोडश-संस्कार' या तऱ्हेचें वर्गीकरण किंवा संज्ञा कोठेहि नाही. या षोडशसंस्काराव्यतिरिक्त शूलगव इत्यादि रानटीपणाचे द्योतक विधि त्यात सांगितले आहेत. जातकर्म, नामकरण, चौल, उपनयन, विवाह अन्त्येष्टि या सारखी संस्कारकर्मे, आज विद्यमान असलेल्या अफ्रिकेतील, आस्ट्रेलियातील, अमेरिकेतील व पॅसिफिक बेटांतील मागासलेल्या रानटी जातींत आहेत, असें मानवजातिशास्त्रज्ञांच्या व प्रवाशांच्या वर्णनावरून दिसतें.[2]

वर्णधर्माचा प्रारंभ ऋग्वेदात सापडतो. दहाव्या मंडळातील चार वर्णांचा उल्लेख ऋग्वेदाच्या शेवटच्या काळातील आहे. ब्रह्म

(१) गोतमधर्मसूत्र ८।१४-२४

(२) Vicissitudes of Aryan Civilization in India p. 14.

व क्षत्र यांचा उल्लेख बराच पूर्वीचा आहे. या दोन वर्गांचा उल्लेख एके ठिकाणीं आहे. आर्यवर्ण व दासवर्ण असेहि शब्द आले आहेत. दासवर्ण किंवा कनिष्ठ (अधर) वर्ण म्हणजे शूद्र होय. सगळ्या वैदिक वाङ्मयाचें समालोचन केल्यास असें दिसतें कीं, वैदिक लोकांनी समाजात जित दासांचा वर्ग निर्माण केला होता. जेते वैदिक आर्य हे त्यांचे स्वामी होते. आर्यांच्या सत्ताधारी वर्गात ब्राह्मण, राजन्य व वैश्य असे तीन विभाग पडले. ब्राह्मण व राजन्य ह्यांच्या हाती सगळ्या सामाजिक आधिपत्याची सूत्रें आली. शूद्रांना व वैदिक संस्कृतीच्या बाहेरच्या लोकांना वैदिकांच्या आधिपत्याखाली राबविता येण्याकरिता वैदिकांनी सामाजिक निर्बंध व कायदे निर्माण केले. वेदोक्त यज्ञधर्माचा अधिकार या वैदिक आर्यांनी आपल्याचकडे राखून ठेविला. वैदिक लोकांच्या व्यतिरिक्त असलेली प्रजा रानटी व वैदिक लोकांपेक्षा मागासलेली होती, म्हणून वैदिकांनी त्या प्रजेला अधम किंवा कनिष्ठ दर्जा दिला, या कल्पनेला ऐतिहासिक आधार मुळीच नाही. वैदिकेतर प्रजा कृषि, शिल्प इत्यादि व्यवहारात कुशल होती. वैदिकेतर संस्कृतीची मोठमोठी राष्ट्रें हिंदुस्तानात होती. त्यातील काही राष्ट्रें वैदिक टोळ्यांनी जिंकली, तेथील प्रजेला स्वाधिपत्याखाली वैदिकांनी आणून वर्णधर्म उत्पन्न केले; त्याद्वारे धन, सत्ता, मान आणि पावित्र्य यांचा मक्ता त्यांनी घेण्याचा प्रयत्न केला. कृषि व शिल्पकर्म त्यात प्रवीण असलेल्या बऱ्याच ( तीन-चतुर्थांश ) प्रजेवर शूद्रधर्म किंवा दास्यधर्म लादला.

वैदिकेतर प्रजेला आधिपत्याखाली आणण्याकरिता धर्मकल्पनांचा किंवा धर्मसंस्थेचा वैदिक लोकांनी उपयोग केला. वैदिक यज्ञांचा

उपयोग या कामी फार झाला. प्रजापतीने यज्ञार्थच[1] धन निर्माण केलें आहे, अशी कल्पना त्यांनी रूढ केली; त्यामुळें शूद्रधनाचा प्रसंगविशेषी अपहार करणे धर्म्य ठरविले.[2] शूद्रांनी काढलेलें दूध सुद्धा यज्ञात उपयोगात आणणे अपवित्र समजत असत.[3] शूद्र प्रजेस वाटेल ती शिक्षा करण्याचा किंवा समाजातून हाकलून लावण्याचा अधिकार कोणत्याही वैदिक आर्यास होता.[4]

कृषि, शिल्प व उच्चवर्णसेवा हे तीन व्यवसाय शूद्राला नेमून दिले. कृषि व शिल्प हे एका दृष्टीने उच्च धंदे आहेत; पण त्यात शूद्रांना भयंकर हाल सोसावे लागत; कारण व्यवसायाचें फळ त्यांच्या पदरात फार कमी पडत असें. जुलमी कायद्यांच्या द्वारे वैदिक आर्यच व्यवसायजन्य फलांचा अपहार करीत असत. वैदिक आर्य व्याज ( interest ) नफा ( profit ) आणि खंड ( rent ) शूद्रांच्या कडून किंवा कनिष्ठ वर्णाकडून उच्च वर्णापेक्षा फार भारी प्रमाणांत वसूल करीत असत; म्हणजे संपत्तीच्या उत्पादनात भाग न घेणाऱ्या उच्च वर्णावरील व्याजाचें, खंडाचें किंवा नफ्याचें ओझें कायद्यानेच फार कमी केलें होतें, आणि उत्पादक व्यवसाय करणाऱ्या, संपत्तीची प्रत्यक्ष पैदास करून सामाजिक जीवनाचा पाया निर्माण करणाऱ्या शूद्रादि वर्णावर व्याज, खंड इत्यादिकांचे दर फार

---

( १ ) कात्यायनस्मृति

( २ ) महाभारत १२।६०

( ३ ) तैत्तिरीय ब्राम्हण ३।२।३।९.

( ४ ) ऐतरेय ब्राम्हण—यथाकामोत्थाप्य:, यथाकामवध्य: । ३५।३

भारी लादले होते. शूद्रांपासून वर्षास शेकडा ६० टक्के व्याज व खंड घेण्याचा हक्क उच्चवर्णीयांना होता. स्मृतीतील एतत्संबंधि कायदे पहावे म्हणजे वरील विधानांची खात्री पटेल.

वैदिकेतराना सामाजिक गुलामगिरीत ठेवण्याच्या कामी वैदिक धर्माच्या पावित्र्याचा उपयोग श्रौतस्मार्तधर्माच्या अनुयायानी केला. वैदिक धर्माचरणाचा किंवा वैदिक धर्माच्या स्वीकाराचा अधिकारच त्यांनी इतरांना दिला नाही. 'व्रात्यस्तोम' नावाचा विधि सामवेदाच्या तांड्य ब्राह्मणात व कात्यायन श्रौतसूत्रात सांगितला आहे. त्याचा उद्देश अवैदिकांना वैदिक बनवून घेणे हा आहे, असें अनुमान करण्यास जागा आहे; परंतु त्याची अंमलबजावणी फारशी झालेली नाही. जुन्या धर्मसूत्रांत व स्मृतींत वेदाध्ययनाबद्दल शूद्रादिकांना देहांत शिक्षा सांगितली आहे. वैदिक यज्ञांनी व स्मार्तधर्मांनी पवित्र झालेला आर्यच समाजातील खरा स्वामी होता. त्याला हें स्वामित्व व श्रेष्ठत्व वैदिक धर्माच्या जन्मसिद्ध अधिकारामुळे आलेल्या पावित्र्यानेच प्राप्त होत असें. हें पावित्र्य ब्राह्मणाच्या पौरोहित्याने प्राप्त होत असें, म्हणून ब्राह्मणास समाजात वरिष्ठ स्थान वैदिक धर्माने दिलें. ब्राह्मण म्हणजे त्यागी, ज्ञानी, संयमी, तपस्वी अशा कल्पना काही लोक करतात. श्रौतस्मार्त कायद्याप्रमाणे हा ब्राह्मणशब्दाचा वाच्यार्थ नाही. श्रौतस्मार्त कायद्याने ब्राह्मणाने इतर वर्णाच्या स्त्रियांशी व्यभिचार केल्यास फार सौम्य शिक्षा सांगितली आहे, व त्यांच्याशी विवाह करण्यास परवानगी दिली आहे, शूद्रस्त्रिया तर रखेल्या म्हणून ठेवण्यास मोठमोठे धर्मस्मृति-

(१) वसिष्ठधर्मशास्त्र १८।१६

कार परवानगी देतात. जे परवानगी देत नाहीत ते कायदेशीर विशेष शिक्षा सांगत नाहीत. उलट, इतर वर्णाच्या व शूद्रवर्णाच्या पुरुषानें ब्राह्मण किंवा आर्य स्त्रीशी लग्न केल्यास अथवा व्यभिचार केल्यास अत्यंत तीव्र यातनामय देहान्त शासन सांगितलें आहे. ब्राह्मणाला कोणत्याही गुन्ह्याकरिता देहशासन नाही. त्याग, संयम व तप या पासून चळलेल्या ब्राह्मणाला तर इतर वर्णाप्रमाणेंच शिक्षा व दंड पाहिजे; पण वेदात व स्मृतीत याच्या उलट आहे. ब्राह्मण व वैदिक आर्य यांस श्रौतस्मार्त कायद्याने अवैदिकांपेक्षा जन्मसिद्ध सवलती व अधिकार फार मोठे ठेवले आहेत. संपत्ति, सत्ता, भोग व मान या बाबतीत ब्राह्मणांस जितक्या सवलती श्रौतस्मार्त कायद्याने ठेवल्या आहेत, तितक्या कोणासच नाहीत. त्याग, संयम, ज्ञान व तप ह्यांना त्या कायद्याच्या दृष्टीने फारसें महत्व नाही. त्या कायद्याने ज्या ज्ञानास महत्व दिलें आहे, तें म्हणजे वेदाचें म्हणजे पुरोहिती कर्मांच्या विद्येचे ज्ञान होय. न्यायदानाचें काम कायदेपंडित ब्राह्मणास प्रथम मिळें, क्षत्रियांस व वैश्यांस, ब्राम्हण मिळत नसल्यास, मिळें. शूद्र मात्र कितीही कायदेपंडित असला तरी त्यापेक्षा मूर्ख ब्राह्मण बरा, असें सगळ्या स्मृति ठासून सांगतात. व्याजाचे दर व खंडाचे दर ब्राह्मणांस सगळ्यांपेक्षा माफक असावेत असा स्मृतींचा कायदा आहे. पुरोहिती विद्या असलेल्या ब्राह्मणास सगळे कर माफ होते. न्यायदान करण्याचे वेळी ब्राह्मणांचा खटला अगोदर चालवावा, असें स्मृति सांगते. ब्राम्हणांस व वैदिक आर्यांस खालच्या वर्णाचे उद्योगधंदे करण्याची परवानगी होती पण खालच्या वर्णांना विशे-

षतः शूद्रादिकांना कोणत्याही उच्च वर्णांचे धंदे करण्याची मनाई होती. प्राणांतिक आपत्काली देखील खालच्या वर्णांनी व शूद्रादिकांनी उच्चवर्णांचे उद्योग व व्यवसाय करणे स्मृतींच्या कायद्याने मोठा गुन्हा मानला होता.

वर वैदिकधर्माच्या वर्णन प्रसंगी प्रत्यक्ष वैदिक शासनाचा कमी व स्मृतींच्या कायद्याचा अधिक निर्देश केला आहे, त्यामुळे विषयान्तर झाल्यासारखे वाटण्याचा संभव आहे. म्हणून त्या संबंधी खुलासा करून ही चर्चा संपवितो. धर्मसूत्रांतील व स्मृतींतील धर्म व कायदे वैदिक आर्यांचेच होते, ही गोष्ट धर्मसूत्रें व स्मृति स्पष्टपणे प्रतिपादितात. वर्णांचा जन्मसिद्ध उच्चनीचभाव, अपवाद सोडल्यास, सामान्य नियम म्हणून स्वीकारूनच स्मृतींचे धर्मशास्त्र प्रवृत्त झालें आहे. हें धर्मशास्त्र वेदांत प्रत्यक्षपणे थोडें सापडतें. पण त्या शास्त्राच्या मुळाशी असलेल्या समाजरचनेचे सामान्य व विशेष सिद्धांत वेदांत आहेत. वेदांचा यज्ञीय कर्मकांड व उपनिषदांचा ब्रह्मविद्या हाच विषय आहे; वर्णाश्रमधर्माचे सविस्तर प्रतिपादन सूत्रांत व स्मृतींतच आहे. सूत्रांतील व स्मृतींतील धर्मशास्त्र अथवा सामाजिक-धार्मिक चालीरीति व कायदे वैदिक आर्यांचेच होत. वैदिककाळी रूढ होत गेलेल्या कायद्यांचा व चालीरीतींचाच ग्रंथरूपाने सूत्रांत व स्मृतीत संग्रह केला आहे. स्मृति म्हणजे वैदिक आर्यांच्या चालीरीतींची, कायद्यांची व सामाजिक व धार्मिक संस्थांच्या नियमांची स्मरणपूर्वक केलेली नोंद, याद किंवा स्मरणी होय. वैदिक आर्यांचें कर्मकांड, देवस्तोत्रें व ब्रह्मज्ञान यांचें

ग्रंथरूपाने संकलन म्हणजेच वेद होय; आर्यांच्या सामाजिक धार्मिक संस्थांचे, कायद्याचे व चालीरीतींचें वेदोत्तरकालीन संकलन म्हणजे स्मृति होत. स्मार्त धर्मशास्त्रांचे संकलन मंत्रकाळी व ब्राह्मणकाळीच उत्पन्न झालें असतें तर त्यासही वेदच म्हटलें असतें. स्मार्त धर्मशास्त्रांतील मुख्य भागाची इतकी पुरातन परंपरा लक्षात आल्यामुळेच सूत्रकार व मनु, स्मार्त धर्मसुद्धा वेदमूलक व वेदोक्तच आहे, असें ठासून सांगू शकतात. धर्मशास्त्रांत वेळोवेळीं वेदोत्तरकाली बरीच नवी भर पडली व परिवर्तनेंही झाली; ही गोष्ट स्मृतींवरून दिसून येते. पराशरस्मृतीसारख्या उत्तरकालीन स्मृति सोडल्यास, बाकीच्या स्मृतींतील व धर्मसूत्रांतील वैदिक धर्मसंस्थेचा मुख्य सांगाडा, अवांतर फरक व भर लक्षात घेतली तरी, एकच आहे, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. गौतम, आपस्तंब, वसिष्ठ, शंखलिखित, मनु, याज्ञवल्क्य, नारद, बृहस्पति इत्यादि स्मृतींतील समाजसंस्थेचें म्हणजे वर्णसंस्थेचें प्रधान स्वरूप सारखेंच आहे. या वर्णसंस्थेच्या स्वरूपाचे वर थोडक्यात विवरण आलेंच आहे.

वैदिक धर्मसंस्थेचें स्वरूप मांडून त्याचें परीक्षण आतापर्यंत केलें. वैदिकधर्म हा सर्व मानवांचा धर्म नाही. तो केवळ एकाच आर्यगटाचा धर्म होता, तो त्या गटाने हिंदुस्थानातील अवैदिक प्रजेपासून निराळा राखून ठेविला; व त्याचा स्वतःच्या गटाचें वरिष्ठत्व राखण्याकरिताच उपयोग केला; हें वरील विवरणाचें तात्पर्य आहे.

वैदिक आर्यांच्या समाजसंस्थेचा ब्राह्मणवरिष्ठत्व व शूद्रदास्य हा महत्वाचा भाग आहे. वैदिककाळीच राजन्य वर्गांत

ब्राह्मणवरिष्ठत्वाविरुद्ध प्रतिकाराची चळवळ उत्पन्न झाली. ही चळवळ दोन्ही तऱ्हेची होती. काही राजन्य ब्राह्मण्याचा हक्क मागू लागले. विश्वामित्र व वसिष्ठ यांच्या भांडणात हाच वादाचा मुद्दा होता. राजन्याना हा हक्क थोड्याबहुत प्रमाणात अपवादरूपाने कां होईना वापरता आला, हें विश्वामित्राच्या कथेवरून दिसून येतें. इतरही अनेक राजन्यकुलें ब्राह्मण्याप्रत गेली, असें पुराणांत[1] म्हटलें आहे. दुसरा महत्वाचा वाद ब्राह्मणांना इतरांच्यापेक्षा अधिक मिळालेल्या महत्त्वाच्या सवलती व हक्क यांबद्दल होता. ऐल पुरुरवा, नहुष, वेन, हैहयकुलीन सहस्रार्जुन, वैतहव्य, सृंजय इत्यादि महान् राजे व राजवंश ब्राह्मणांच्या वरिष्ठत्वाविरूद्ध लढले. वेन राजा तर यज्ञधर्माच्या व ब्राह्मणांच्या दक्षिणेच्या विरुद्ध होता. ब्राह्मणांस सगळे कर माफ होते, याच्या विरुद्ध हैहय व वैतहव्य राजे [2]झगडले. ते ब्राह्मणांच्या गाई बलात्काराने नेऊ लागले, याचा अर्थच हा होता. पैशांच्याऐवजी पशूंचा विनिमय म्हणून त्यावेळीं उपयोग करीत. परशुरामाने हा हक्क पुनः क्षत्रियांचा विनिपात करून स्थापित केला. ब्राह्मणकुल व क्षत्रकुल, राजसंस्था व पुरोहितवर्चस्व यांच्यातील झगड्याचा निकाल भारतीय युद्धानेच लावला; त्यांत क्षत्रनाश फार झाला; क्षत्रियवर्ग जवळजवळ नष्ट व भ्रष्ट झाला. परशुरामाच्या हातून जें कार्य झालें नाही, तें भारतीय युद्धाच्या यादवीने तडीस नेलें. क्षत्रियवर्ग उत्सन्नप्राय झाल्यामुळे पुनः पुरोहितांचे स्थान समाजात दृढमूल झालें.

---

(१) हरीवंश, १।३२; महाभारत स्कंद ७.

(२) अथर्ववेद.

त्यानंतरच कल्पसूत्रें, धर्मसूत्रें, व्याकरणादि वेदांगें, अर्थशास्त्रें, कामशास्त्रें, व मोक्षशास्त्रें ब्राह्मणांनी प्रगल्भतेस नेली. मोक्ष-शास्त्राचा उगम उपनिषदात झाला. उपनिषदांनी वैदिक यज्ञांची व देवतांची चिकित्सा करून त्यांचे जवळजवळ वैयर्थ्य ठरविलें. सूक्ष्म चिकित्सेतून ब्रह्मवाद व मानसिक उपासनेचा संप्रदाय उत्पन्न झाला. स्थूल विविध देवतांच्या आराधनेचें स्थूल कर्मकांड ब्रह्म-वादामुळे दुर्बल होऊ लागलें. यज्ञधर्म विरोधी सामाजिक परिस्थि-तीचीहि त्यांत भर पडली. वैदिक यज्ञप्रधान समाजरचनेतच सामा-जिक दौर्बल्याची बीजें होती. त्यांना अंकुर फुटू लागला. वैदिक आर्यांच्या संन्निध सुधारलेल्या अवैदिक लोकांच्या अनेक वसाहती होत्या, त्यांच्यात यज्ञधर्मव्यतिरिक्त धर्मसंस्था प्राचीन कालापासून चालू होत्या; त्यांचाहि परिणाम वैदिक लोकांच्या विचारसरणीवर होऊ लागला. स्थिर झालेल्या वैदिक समाजसंस्थेत एक प्रकारची जीर्ण दशेची चिन्हें दिसू लागली. विचारसंपन्न लोकांनी जुन्या परंपरेचें पृथक्करण सुरू केलें. नवे नवे विचार उत्पन्न झाले. जुन्या देवता व धार्मिक संस्था यांचें बौद्धिक विदारण होऊ लागलें. ब्रह्मवाद, वैराग्यवाद, परिव्रज्या, एकेश्वरभक्ति इत्यादि नवीन धार्मिक विचार त्यातून प्रकट झाले.

गृहस्थधर्म व यज्ञधर्म झेपणे कठीण होऊ लागावे अशी सामाजिक स्थिति उत्पन्न झाल्यामुळे वैराग्य, परिव्रज्या व अरण्य-वास यांसच महत्त्व व श्रेष्ठत्व देणारी मननप्रधान विचारसरणी उपनिषत्काली उगम पावली. विस्कळित सामाजिक स्थितीत विपन्न

स्थितीमुळे अनेकांचे प्रपंच उध्वस्त झाले व विघडून गेले. योग्यांचा व वीतराग लोकांचा मानसिक उपासनामय संन्यास धर्मच बरा वाटू लागला. वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांना महत्त्व आलें.

शैव, वैष्णव, बौद्ध व जैन इत्यादि विश्वधर्म

(४) या धर्मांचा पुरस्कार वैदिकेतर वरिष्ठ वर्गांनी केला. पौरोहित्याशी संबंध नसलेल्या राजन्यांनी त्यांच्या प्रस्थापनेत पुढाकार घेतला. वैदिकांची ब्राह्मणप्रधान यज्ञधर्मसंस्था अंतर्गत व बाह्य कारणांनी क्षीण होऊ लागण्याच्या सुमारास हिंदुस्थानात २५ शें वर्षांपूर्वी या नव्या धर्मसंस्थाना जोम येऊ लागला. ह्या धर्मसंस्थांची वैदिक धर्मापेक्षा निराळी थोरवी अशी होती कीं, त्यात सर्व मानवाना श्रेयाचा मार्ग खुला करणारी व्यापक उदार भावना होती. कोणत्याही परिस्थितींतील, जातीतील व समाजातील उच्च नीच, पतित व उन्नत मानव शुद्ध होऊन धार्मिक परमपदवीस पोचू शकतात, अशी घोषणा करणारे विश्वधर्म हिंदुस्थानात, इतर समाजांपेक्षा किंवा राष्ट्रांपेक्षा पहिल्यांदा उदयास आले. वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या समाजसंस्थेविरुद्ध विश्वधर्मांनी उचल घेतली. वैदिक आर्यधर्माप्रमाणे त्रैवर्णिक आर्यच धर्मतः पवित्र ठरले होते. त्या त्यांच्या परंपरागत पावित्र्याच्या जोरावर ते अवैदिकाना व शूद्रादिकाना हीन सामाजिक स्थितीत रखडण्यास भाग पाडीत व स्वतः आधिभौतिक सुखांचे वारसदार व धार्मिक श्रेष्ठतेचे अधिकारी होत असत. वैदिक लोकांचा धार्मिक पावित्र्याचा सबतासुभा व वैदिकेतर सामान्य जनतेचे जन्मसिद्ध अपावित्र्य, नष्ट करण्यास या विश्वधर्मांनी सुरवात केली.

शैवधर्म व वैष्णवधर्म यांची परंपरा वेदपूर्वकालापासून चालू होती. वैदिकेतर अनेक सुसंस्कृत संघात हे धर्म चालू होते. उत्तर-हिंदुस्थानच्या पश्चिम व वायव्य विभागात शैव व वैष्णव धर्मांच्या पुरस्कर्त्यांनी एकेश्वरभक्तीचा प्रचार जोरात सुरू[1] केला. वेदकालीन वृष्णि–अंधक–कुलात वासुदेवभक्तिपंथ चालू होता. यासच नारायणीय धर्म किंवा वार्ष्णेय अध्यात्म असे महाभारतात म्हटलें आहे. काश्मीरपासून तो बंगालपर्यंत व हिमालयापासून रामेश्वरापर्यंत शिवभक्ति सामान्य लोकात सुरू होती. त्यातही मोठे तत्ववेत्ते उत्पन्न झाले. या धर्मांनी वैदिक यज्ञसंस्था, पशुयाग व ब्राह्मणमाहात्म्य यांचा निषेध केला[2]. ईश्वर एकच आहे व त्या एका परमेश्वराच्या भक्तीने सगळे मानव पवित्र होऊन परमेश्वरपदवीस जातात; परमेश्वरभक्तीपुढे बाकीचे धार्मिक विधि व्यर्थ होत; नीतीच्या आचरणाने व भक्तीनेच मनुष्याचा उद्धार होतो; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे सगळेच भगवद्भक्तीने शुद्ध होऊन मुक्त होतात. या विचारसरणीला एकेश्वरभक्तीच्या शैव व वैष्णव संप्रदायांनी महत्व आणिलें.

पूर्वी हे संप्रदाय वैदिक मार्गाशी विरोधी होते; पण त्यांचा स्वीकार वैदिक मार्गीय ब्राह्मणादिकांनी केल्यामुळे त्यांतील वेदविरोध निमाला. बुद्धोत्तरकाली याच धर्मांना हिंदुसमाजात महत्व आहे. वैष्णवधर्म वैदिक धर्माशी संमीलित झाल्यावर भगवद्गीता तयार झाली.

---

( १ ) Vaishnaveesm and Shaiveesm by Dr. Bhandarkar.

( २ ) शारीरभाष्य, २।२ पत्यधिकरण, शंकराचार्य.

याच एकेश्वरभक्तिसंप्रदायाचा आश्रय केलेल्या लोकांनी पौराणिक धर्म प्रचारात आणले. वैदिकेतर हीन धर्मकल्पनाना तर पुराणांनी फार महत्व दिलें. मुहूर्त-ज्योतिष, फलज्योतिष, ग्रहनक्षत्रपूजा, व्रतें, तीर्थें, उद्यापनें, इत्यादिकांना पुढे याच संप्रदायांचा स्वीकार केलेल्या ब्राह्मणांनी महत्व देऊन स्वतःच्या उपजीविकेकरिता सामान्य समाजातील अज्ञान व दैववाद, यांचें पोषण केलें.

उत्तरहिंदुस्थानच्या पूर्वभागात काशी व बिहार प्रांतांत वैदिकेतर सुसंस्कृत मानवसंघांतून बौद्ध व जैन हे नवे दोन महान् धर्म प्रकट झाले. हेही विश्वधर्मच होते. कारण त्यांतही सगळे श्रेष्ठकनिष्ठ दर्जाचे मानव संयमाने व नीतीने शुद्ध होऊन निःश्रेयसाचे भागीदार होतात, हा विचार प्रमुख होता, हे धर्म अधिक पाखंडी होते. त्यांनी वेद, देव व यज्ञ या तिघांवर हल्ला केला. हे धर्म श्रमणांनी निर्माण केले. हे श्रमण सत्ताधारी क्षत्रियादि वर्गांतील होते. ब्राह्मणांचे वरिष्ठत्व व त्यांनी निर्मिलेली सामाजिक पद्धति बदलण्याकरिता त्यांनी त्यांच्या वेद, देव व यज्ञ या आधारावरच मूले कुठारन्यायाने घाला घातला.

जैनबौद्धांच्या व ब्राह्मणांच्या ग्रंथावरून असें दिसतें कीं, श्रमणांनी व मुनींनी मुख्य पाखंडें पसरविलीं. चार्वाक हा अत्यंत मूलगामी चिकित्सक पंडित होता; पण तो सुद्धा भिक्षु—मुनी होता, असें महाभारतात म्हटलें आहे. परिव्राजकांची व श्रमणांची संस्कृति प्रथमत: वैदिकेतरांत उत्पन्न झाली. कारण त्यांचा समाज वैदिकां-

पेक्षा येथे जुना होता. सत्ताधारी वैदिकांच्या सामाजिक पद्धतीचे दुष्परिणाम त्यांना अगोदर अधिक जाणवूं लागले. त्यांना संसाराची नितान्त दुःखमयता अगोदर प्रतीत झाली. तक्षक ( नागकुलीन राजा ) नग्न श्रमण झाला होता, असें[1] भारतातील एका उल्लेखावरून दिसतें. वैदिक आर्य नागांचे वैरी होते हें आदिपर्वातील सर्पसत्र कथेवरून सहज सूचित होतें. नागांनी जैन तीर्थकरांचे संकटापासून रक्षण केलें व नाग हे तीर्थकरांचे मित्र होते, असें जैनधर्मग्रंथातील कथांवरून दिसतें. बुद्ध हा गणपद्धतीने राहणाऱ्या समाजात उत्पन्न झाला. कृष्ण वासुदेव हा गणनिष्ठ समाजपद्धति असलेल्या वृष्ण्यंधक कुलांतच उत्पन्न झाला होता. वैदिकेतर समाजांत जटिल, मुंडी, तापस, परिव्राजक, आजीवक, निर्ग्रंथ नग्न व गैरिकपंथीय पहिल्यांदा निर्माण झाले. नंतर वैदिक लोकांतही हे पंथ तयार झाले.

याज्ञिक पुरोहित-प्रधान वैदिक समाज-पद्धति डबघाईस येऊ लागली व नव्या जीवनाची गरज भासू लागली, तेव्हां वैदिकेतर सुसंस्कृत समाजातील लोकांनी डोकें वर काढलें. समाजाचें पुरोहिताधीनत्व मोडून टाकण्याची गरज त्यांना फार भासली. पुरोहित वर्गाच्या स्वार्थी व भोगपरायण प्रवृत्तींतून निर्माण झालेल्या कर्मकांडाचें बंड मोडणें आवश्यक वाटूं लागलें. चार्वाकादिकांनी तर, समाजास प्रत्यक्ष उपयुक्त काम न करणाऱ्या ब्राह्मणांच्या पारलौकिक कर्मकांडाची चांगलीच हजेरी घेतली.

त्या वेळची सामाजिक स्थिति अशी होती. समाजाच्या निर्वा-

---

( १ ) सोऽपश्यत् नग्नं श्रमणं आगच्छन्तम् । भारत, आदि,

हास उपयुक्त अशा गवादि पशूंच्या हत्या धर्माच्या मार्गाने भक्षणार्थ व यज्ञार्थ ब्राह्मणवर्ग करीत असे. राजन्य वर्ग आपसांत सारखा लढत असल्यामुळे कृषि, शिल्प, वाणिज्य इत्यादि व्यवसायांना भरभराटी येत नव्हती. एकछत्री साम्राज्यसंस्थेची त्याकरिता आवश्यकता उत्पन्न झाली. उत्पादक धंदे करणाऱ्या वर्गावर चरणारा वर्ग फार वाढला होता. स्थापत्य, शिल्प, कारागिरी इत्यादि नैपुण्य शूद्रांच्या व हीनजातींच्या ठायीच होतें; त्यांना ब्राह्मणीसमाजरचनेत निकृष्टस्थान होते, त्यामुळें त्या वर्गाच्या हितसंबंधांचें नीट रक्षण करणारी राज्यपद्धति उत्पन्न झाली नाही. याचा परिणाम असा झाला कीं, संपत्त्युत्पादन व विभजन यांची नीट व्यवस्था राहिली नाही; त्यामुळें सगळ्याच समाजघटक वर्गाचा योगक्षेम नीट चालेना; त्यांत साथींचे रोग, दुष्काळ, अतिवृष्टि इत्यादि आपत्तींची भर पडे; वरपासून खालपर्यंत दैन्य व दुरवस्था यांचें साम्राज्य पसरू लागलें. अशा तऱ्हेने निर्माण झालेल्या सामाजिक दुरवस्थेत वैराग्याची व शमदमाची प्रशंसा करणारा, सर्व संसारच असार मानणारा, दुःखवादी, निवृत्तिप्रधान धर्म जन्मास घातला. नवी समाजसंस्था निर्माण करून सामाजिक व भौतिक जीवनाची नीट व्यवस्था करता येईल अशी कल्पना उत्पन्न व्हावी, इतकें जीवनाचें ज्ञान प्रगल्भदशेस त्यावेळी गेलें नव्हतें. त्यामुळे तृष्णानाशाला परमसत्य व ध्येय मानणारा आध्यात्मिक विचार उत्पन्न होण्याशिवाय गत्यन्तरच नव्हतें. श्रौतस्मार्त समाजरचनेत सामाजिक समतोलन व व्यवस्था राखण्याची पात्रताच राहिली नव्हती. ऐहिक अभ्युदयास महत्त्व देणारे प्रवृत्तिपर व इहपर विचार वैदिक परंपरेत होते.

परंतु एवढ्या विचारांनी समाजरचनेचा प्रश्न सुटत नाही. अशा तऱ्हेची समाजपद्धति श्रौतस्मार्त संस्कृतीत निर्माण झाली होती कीं, त्यांत समाजाची आधिभौतिक उन्नति एका विशिष्ट मर्यादेबाहेर होण्यास वावच राहिला नव्हता. केवळ आधिभौतिक उन्नति व ऐहिक प्रवृत्तिवाद ध्येयवादांत राहिल्यानें आधिभौतिक उन्नति व ऐहिक अभ्युदय साधत नसतो; तर त्या करिता सामाजिक रचनेत त्यास अनुरूप असा बदल करावा लागतो. त्या दृष्टीने श्रौतस्मार्त समाजरचना पूर्ण निरुपयोगी ठरली होती. ती सामाजिक प्रगतीच्या मार्गात अड-थळा बनली होती. तिच्या तीव्र बंधनांनी व जीर्ण कायद्याच्या भाराने व्यथित झालेल्या सामाजिक आत्म्याला वाचा फुटली. हें जीवन व हें जगत् म्हणजे दुखं दुःखम्!! दुःख व दुःखच होय, दुसरें काही नाही, असा आक्रोश तो आत्मा करूं लागला. भगवान् कपिलांच्या, भगवान् बुद्धांच्या व जिन मुनी तीर्थंकरांच्या मुखांतून हा आक्रोश बाहेर आला.

कोणतेंही जीवन विषयक तत्वज्ञान एका विशिष्ट सामाजिक परिस्थितीचाच परिपाक असतो. हें दुःखवादी तत्वज्ञान अडीच हजार वर्षांपूर्वीच्या सामाजिक जीवनाचा, त्या सामाजिक स्थितीचा पडसाद होता. त्या स्थितीतून बाहेर पडू पाहणाऱ्या नव्या मानव्याचा तो संदेश होता. धर्म तत्वज्ञान व वाङ्मय हीं केवळ वैयक्तिक विकारविचार — प्रदर्शनाची साधनें नसतात. यांच्या रूपानें सामाजिक शक्तींचा व सामाजिक झगड्यांचा बोध होत असतो. या नव्या धार्मिक चळवळींचा बुद्ध हा सगळयांत मोठा नेता होता. त्याच्या

शिष्यगणात समाजातील सगळया थरातील लोक सामील झाले होते. ब्राह्मण, क्षत्रिय, मूर्धाभिषिक्त राजे, वैश्य, शूद्र, अतिशूद्र, व स्त्रिया या सर्वांचा त्याच्या अनुयायांत भरणा होता. तपुस्स व भल्लिक हे वैश्य, उपाली हा न्हावी, काश्यप बंधु हा जटिल, सारिपुत्र व मोग्गलान हे ब्राह्मण, आनंद व देवदत्त हे क्षत्रिय, अंब्रपाली ही वेश्या, चुद हा लोहार, बिंबिसारपुत्र अजातशत्रु हा मूर्धाभिषिक्त राजा आणि मगध कोसल कपिलवस्तु व वैशाली यांचे राजे, बुद्धाच्या शिष्यगणात व भक्तगणात होते. बुद्धाचा असा दण्डक होता की, लोकांस त्यांच्या बोलभाषेतच उपदेश केला पाहिजे. मगध व कोसल या दोन देशांच्या प्राकृत भाषेत बुद्ध धर्मोपदेश करीत असे. बुद्धानुयायी जे स्थविरवादी त्यांनी पाली भाषेत, महासांधिकांनी पैशाची भाषेत व सामंतीयानी अपभ्रंश भाषेत त्रिपिटक लिहिलें.

सत्य, अहिंसा, साधी राहणी, मिताहार, तृष्णाक्षय आणि जीवनाची क्षणभंगुरता या गोष्टींचा उपदेश बुद्धाने मुख्यतः केला. ईश्वर व जगाचें मूलकारण यांच्या शोधाच्या भानगडीत न पडणें बरं असे बुद्धाचे मत होतें. तो कोणत्याच एकांतिक पक्षास मान्यता देत नसे. स्वत:चा मध्यममार्ग आहे, असे तो सांगत असे. संन्यास किंवा गृहत्याग यावरही त्याचा सर्वस्वी भर नव्हता. त्याने गृहस्थाश्रमाला गौण लेखलें नाही. पण भिक्षुस्थिति ही उच्चस्थिति तो मानीत असे. वासनाक्षय किंवा तृष्णाक्षय झाल्याने चित्त शुद्ध होऊन मोक्ष किंवा निर्वाण लाभतें, असें त्यानें प्रतिपादिलें. संसाराच्या क्षणभंगुरतेचा व दुःखमयतेचा सिद्धान्त आणि तृष्णाक्षयानेच मोक्ष

लाभतो हा सिद्धान्त बुद्धोत्तरकालीन हिंदुधर्माने पूर्ण स्वीकारला आहे. गीतेतही हे सिद्धान्त शब्दांतराने सांगितले आहेत. हे जगत् दुःखालय व अशाश्वत आहे, आणि सर्व कामनांचा विराम हेंच स्थितप्रज्ञतेचें मुख्य लक्षण होय, असें गीता स्पष्ट सांगते. या सिद्धांतांचा उगम उपनिषदात झाला, त्याला बुद्धानें दृढता आणली व शेवटी हिंदुधर्मांत ते पूर्णपणें मान्य झाले. बुद्धानें सांगितलेली अहिंसा ही यज्ञहिंसाविरोधी होती. त्यानें राजधर्माचा त्याग सांगितला नाही.

बुद्ध ज्या काळांत उत्पन्न झाला, त्या सुमारास भारतीय समाजात बुद्धिप्रधान विचारांच्या चळवळी फोफावू लागल्या होत्या. सामाजिक स्थित्यंतराचाच तो काळ होता. धर्मशास्त्रीय कायदा मागे पडून अर्थशास्त्रीय कायदे निर्माण होऊ लागले होते. वेद, देव, यज्ञ, समाज, जगत्, नीति, धर्म, धर्मप्रमाण या सर्वांचे मूलतः समीक्षण करणारा बुद्धिवाद सांगणारे आचार्य उदयास आले. वेद, देव व यज्ञ यांची चिकित्सा उपनिषदांतच सुरू झाली होती. उपनिषदांत देव हा व्यक्ति राहिलेला नाही, एक व्यापक निर्विकार ब्रह्मतत्त्व बनलें. देव ही विचारणीय किंवा बुद्धिसिद्ध वस्तू नाही, ही गोष्ट बुद्धादिकांनी विचारांती ठरविली. कपिलादिकांनी, ईश्वराचें अस्तित्व नाशाबित केलें. वैष्णवादिकांनी यज्ञसंस्थेचें धार्मिक जीवनास अनुपयुक्तत्व दाखविले. नीतितत्त्वें हाच खरा धर्म होय, असें एकेश्वरवादी व निरीश्वरवादी बोलू लागले. काही अर्थशास्त्रकारांनी पारलौकिक अस्तित्वाचे विचार सांकेतिक ठरवून धर्मसंस्था ऐहिक लोकयात्रेस उपयुक्त असें एक साधन

आहे, एवढेंच त्या संस्थेचे मूल्य ठरविलें. महाभारतांतील शांतिपर्वात तर सत्य, अहिंसा, इत्यादि सार्वभौम व निरपवाद वाटणाऱ्या तत्वांचेही अबाध्यत्व नाहीसें केलें. असत्य व हिंसा सुद्धा कित्येक वेळा योग्य ठरते असें सांगून सत्य व अहिंसा या नैतिक दृष्ट्या मूलभूत ठरलेल्या तत्वांचें तर्कशास्त्राच्या आधारे, मानवी अनुभवाचा आढावा घेऊन विदारण केलें. उपनिषदांपासून तो षड्दर्शनसूत्रांची निर्मिति होण्यापर्यंतच्या काळाने भारतीय बौद्धिक विचारांच्या उत्कर्षाची अंतिम सीमाच गांठली.

ह्या काळास मॅक्समुलरने ‘भारतीय नवजीवन युग’ असें म्हटले आहे. अलेक्झॅन्डर दि ग्रेटच्या स्वारीने ग्रीक लोकांशी संबंध आल्यामुळे हें नवजीवन आलें असें तो उपपादन करतो. हें त्याचें उपपादन अवास्तव आहे. ह्या नवजीवनाच्या चळवळीचा अलेक्झँडरच्या अगोदर दीडशे वर्षांचा इतिहास आज मिळतो. बुद्ध हा या विशाल विचारोन्दोलनाचे वरिष्ठ प्रतीक असलेला तेजस्वी तारा होता. अलेक्झँडरच्या अगोदर एक शतक, तो चमकून गेला; व बुद्धजन्मापूर्वी चार्वाक्, बृहस्पति, उशना, कपिल, कणाद, अजितकेशकंबली इत्यादि मोठे तार्किक तत्वज्ञ अर्थशास्त्रकार आणि धर्मपरीक्षक होऊन गेले.

या सर्व वैचारिक आंदोलनाच्या पार्श्वभूमीत मौर्यांचें महान् साम्राज्य स्थापन झालें. हिंदूंचें इतिहासप्रसिद्ध सगळयात मोठें हेंच साम्राज्य होय. हें बुद्धोत्तर काळी जन्मास आलें. पण हें साम्राज्य

रोमन साम्राज्यासारखें चिरस्थायी झालें नाही. रोमन साम्राज्याने युरोपच्या जनतेचा फार मोठा भाग एकछत्री राज्यसत्तेखाली आणिल्यामुळे एकेश्वरी विश्वधर्माचा म्हणजे ख्रिश्चन धर्माचा योग्य पाया निर्माण झाला; तेथे ख्रिश्चन धर्माने जुन्या विविध–उपासनामय कर्मकांडी मूर्तिपूजक बहुशाख हीन धर्मप्रकारांचा ( paganism ) उच्छेद केला. मौर्य साम्राज्य लौकरच विदीर्ण झालें. पुष्यमित्र नावाच्या ब्राह्मण अमात्याने हें राज्य बळकाविलें. तेव्हांपासून पुनः ब्राह्मणांच्या चळवळींना महत्व आलें. त्यामुळे कोणत्याच विश्वधर्माचा विजय भारतीय समाजात झाला नाही. ब्राह्मणांना जुना वैदिक धर्म पूर्ववत् स्थापन करता आला नाही. म्हणून त्यांनी जुन्या नव्याची गोधडी बनविण्यास सुरवात केली. प्रत्येक लहान मोठे उपासनासंप्रदाय आणि निकृष्ट लोकांच्या हीन देवता व पूजाविधि, या सर्वांची एक मोट बांधण्यास सुरवात केली. शैव, वैष्णव इत्यादि धर्मांनाही त्यांनी आत्मसात् करून भिक्षुकीस उपयुक्त असें वळण दिलें.

**श्रौतस्मार्तपुराणोक्त हिंदुधर्म**

(५) नास्तिक भौतिकवाद्यांचा व बुद्धिवाद्यांचा जोर कमी झाल्यावर पाषंडांच्या प्रभावी विचारसरणीला उतरती कळा लागली. बौद्धजैनांची सांप्रदायिक धर्मपीठें, सर्वज्ञांचें शब्दप्रमाण व नवे देव निर्माण केलें. याचवेळी ब्राह्मण आचार्यांनी श्रौतस्मार्त धर्माचें पुनरुज्जीवन केलें. राज्यसंस्थेंत अर्थशास्त्रीय ऐहिक कायदा म्हणजे व्यवहारधर्म रूढ होऊ पाहात होता; पण ब्राह्मण पुरोहितवर्गाने जुन्या स्मृतींचें पुनः संस्करण करून ब्राह्मणी धार्मिक कायदा म्हणजे स्मार्त व्यवहारधर्म पुनः

स्थापला. अर्थशास्त्रीय लौकिक कायदा दृढमूल होऊ दिला नाही. रोमन लोकांच्या कायद्यावर आजची पाश्चात्य कायदेसंस्था उभारली गेली आहे. रोमन लोकांनी जगाच्या संस्कृतीस कायदेसंस्थेची देणगी दिली असे म्हणतात. अर्थशास्त्रीय कायदा ब्राह्मणांनी नष्ट केला नसता तर तसाच भारतीय कायद्याचाही इतिहास घडला असता.

जैनबौद्धांची धर्मपीठें निर्माण झाल्यावर त्यांचे बौद्धिक चळवळीचें हत्यार बोथट झालें. योगमार्ग, तापसी आचारविधि व चमत्कारमहात्म्य वाढूं लागलें. ऐदी, फुकट खाऊ, आळशी, उनाडटप्पू भिक्षु – संन्यासी – तापसी व मुनिजन यांचे संघ देशभर माजले. त्यांच्यापेक्षा ब्राह्मणांचें स्थान समाजांत अधिक स्थिर होते. लोकांच्या दैनंदिनजीवनाशी ब्राह्मणांचा नित्य संबंध होता. ब्राह्मण हे गृहस्थाश्रमी असल्यामुळे लोकव्यवहारात त्यांचा पूर्ण हात होता. व्यावहारिक जीवनापासून दूर गेलेल्या भिक्षुमुनींचे संप्रदाय हतवीर्य करणे ब्राह्मणास सोपें झालें. सामान्य लोकसमुदायात रूढ असलेल्या सर्व प्रकारच्या लहान मोठ्या पूजास्थानांचा, उपासनांचा, देवतांचा, विधिविधानांचा, कथांचा व कल्पनांचा आढावा घेऊन, लोकांना रुचेल व आकर्षक होईल अशा रीतीने पौराण धर्माची बांधणी ब्राह्मणांनी केली. व्रतवैकल्यें, पूजाविधि व कथा यांत वैदिक मंत्रांची व वैदिक कल्पनांची मिसळ करून उच्चवर्णाचें कर्मकाण्ड तयार केलें. वेदपूर्वकालापासून प्रचलित असलेल्या मूर्तिपूजा, देवता व त्यांच्या उपासना यांना नवा आकार दिला. जुन्या वर्णसंस्थेला निराळें रूप देऊन जातिसंस्थेच्या निर्मितीला चालना दिली. हजारो

वर्षे जातिसंस्था ब्रतन होती, त्या संस्थेस ब्राह्मणांनीं पाठिंबा देऊन बळकट केलें व आपलें सर्वोच्च स्थान कायम केलें. एकेश्वरी भक्ति-संप्रदायांनाही बहुदेवतोपासनात्मक धर्मात गुंडाळून घेतलें. ब्रह्मवादाचा उपयोग करून सर्वच हीनोच्च देवतांना प्रामाण्य दिलें. उपनिषदांतील ब्रह्मवादाने वैदिक देवतागण बाद होणार होता, त्याला बादरायणाच्या ब्रह्मसूत्रांनी तारलें, त्याप्रमाणे बादरायणाच्या त्याच ब्रह्मवादी तर्कशास्त्राने वेदबाह्य देवतांना जीवदान दिलें. शितला, चामुंडा, एकवीरा, हनुमान, विनायक, नंदी, भैरव, नाग, नवग्रह, उदुंबर, अश्वत्थ, वट, इत्यादि देवतांचे उज्जीवन झालें. लिंगपूजेत वैदिक रुद्राध्यायाचा उपयोग करून बहुतेक सगळयां हिंदुस्थानांतील लिंगमंदिरांतील शूद्रपुरोहितांच्या जागा ब्राह्मणांनी पटकावल्या. वैदिकेतर देवांची किंवा मूर्तींची क्षेत्रें व तीर्थें ब्राह्मणांनी आत्मसात् केली. त्या ठिकाणी पूर्वी अवैदिक ब्राह्मणेतर पुजारीवर्ग होता. त्या देवता वरिष्ठ वर्गांनी घेतल्यामुळे ब्राह्मणच त्यांत प्रमुख झाला. वेदांचा मौलिक विरोध करणाऱ्या कडव्या धर्मसंप्रदायाखेरीज बाकीच्या सर्व धर्मसंप्रदायांत ब्राह्मण वर्गांनी शिरकाव केल्यामुळे, व्यवस्थित एकमुखी व संघटित धर्मसंस्था उत्पन्न झाली नाही. सगळ्याच पंथांना कमिजास्त प्रामाण्य ब्राह्मणवर्गाने दिलें. शिथिल कंथारूप सनातन हिंदुधर्म निर्माण झाला. श्रुतीत ज्याचें प्रतिपादन नाही त्यास श्रुतीच्या प्रामाण्याचा पाठिंबा ब्राह्मणांनी मिळवून दिला. स्मृतीत ज्याचा आचारमार्ग आहे; पुराणांत ज्याचें विस्ताराने निरूपण केलें आहे; तो धर्म आज हिंदुसमाजास मान्य आहे.

जातिधर्माची सगळी सामुग्री स्मृतींत आहे. भक्ष्याभक्ष्य, पेयापेय, स्पृश्यास्पृश्य इत्यादि विषयांचा उहापोह स्मृतींत आहे. विवाहादि संस्कार आणि जातीजातील आचारनिर्बंध विस्ताराने स्मृतींत प्रतिपादिले आहेत.

हल्लींचा रूढ हिंदुधर्म स्मृतीत व पुराणांतच पुष्कळ अंशाने आहे. वेदात त्याचे काही अल्पांश आहेत. उपनिषदात ब्रह्मज्ञान आहे, सांख्यशास्त्रात सत्वरजस्तमाच्या कल्पना आहेत, व योगदृष्टि, त्रिकालज्ञता, समाधि, सिद्धि, चमत्कार इत्यादि कल्पनांची पोषक विचारसरणी पतंजलीच्या योगशास्त्रात आहे. वेद, उपनिषदें, स्मृति, भारत, ब्रह्मसूत्रें, पूर्वमीमांसा, सांख्यशास्त्र, योगशास्त्र व पुराणें हे प्रचलित हिंदुधर्माचे प्रमाणग्रंथ होत.

श्रुतिस्मृतिपुराणोक्त हिंदुधर्मात कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांचें स्थान

श्रौतस्मार्त व पौराण हिंदुधर्माच्या स्थापनेस सुरुवात झाल्यावर हिंदुसमाजात क्रांतिकारक विचारसरणी व नवजीवन निर्माण करणारी चळवळ उत्पन्नच झाली नाही. त्यानंतर भारतीय समाजात विशेष उलथापालथ झालीच नाही. अनेक राज्यें उत्पन्न होऊन विलयास गेली, पण समाजसंस्थेचें सामान्य स्वरूप कायमच राहिलें. मौर्यसाम्राज्याच्या पतनानंतरची ही स्थिति होय. भारतीय समाजसंस्था एका दीर्घकालीन स्थैर्ययुगात शिरली. या युगात काव्यें, नाटकें, भाष्यें, टीका, अलंकार, व तर्कशास्त्रें वाढत होती, याच दीर्घयुगाच्या शेवटच्या खंडात, इसवी सनाच्या

सातव्या शतकात कुमारिलभट्ट व आठव्या शतकात शंकराचार्य हे मोठे तत्वज्ञ आचार्य होऊन गेले. कुमारिलभट्टांनी पूर्वमीमांसेत सूक्ष्म चिकित्सक पद्धतीचें अवलंबन करून धर्माच्या प्रामाण्याची समीक्षा केली; योगसिद्धि, त्रिकालदर्शित्व, सर्वज्ञत्व, ईश्वर, इत्यादि एकेश्वरवाद्यांच्या व जैनबौद्धांच्या कल्पना तर्कदृष्ट्या असमर्थनीय ठरविल्या. वेदांचे स्वतः प्रामाण्य मोठ्या परिष्काराने सिद्ध केलें; धर्मशास्त्रनिर्णयाची एक विशिष्ट पद्धति स्थापिली. या पद्धतीची पकड उत्तरकालीन धर्मशास्त्रावर इतकी व्यवस्थित बसली कीं, त्या पद्धतीनेच गेल्या बाराशे वर्षांतील धर्मव्यवस्था पंडितांनी केली. कुमारिलभट्टांना वैदिक प्रवृत्तिधर्माचें, यज्ञमार्गाचें व स्मार्त गृहस्थाश्रमधर्माचें पुनरुज्जीवन करून संन्यास व निवृत्तिमार्ग यांचें निराकरण करावयाचें होतें. तें मात्र त्यांना साधलें नाही. शंकराचार्यांच्या दिग्विजयाने कुमारिलभट्टांची मनीषा विफल झाली. त्यामुळे पूर्वमीमांसेस गौणस्थान मिळालें. कुमारिलभट्टाने सिद्ध केलेल्या शब्दप्रामाण्याने मात्र सगळ्या हिंदु पंडितांची बुद्धि भारली; शंकराचार्यांनी त्याचाच स्वीकार केला. कुमारिलभट्टाने योगचमत्कार, सर्वज्ञत्व, ईश्वर इत्यादि कल्पनांचे एका हातानें तर्कशास्त्रदृष्ट्या निराकरण केलें पण दुसऱ्या हाताने वेदस्मृतिपुराणांचें स्वतः प्रामाण्य सिद्ध करून त्याच कल्पनांना अंधःश्रद्धेचा भक्कम पाया निर्माण करून दिला. कारण योगसामर्थ्य, त्रिकालज्ञता, सिद्धि, चमत्कार, देवता इत्यादि कल्पनांचा वेदस्मृतिपुराणें हा खजिनाच आहे. कुमारिलभट्टांनी ज्या प्रवृत्तिवादाचा पुरस्कार केला तो श्रौतस्मार्त प्रवृत्तिवाद होता. बुद्धिवाद व भौतिकवाद यांच्यावर आधारलेला प्रवृत्तिवाद

नव्हता. तो श्रौतस्मार्त प्रवृत्तिवाद कित्येक शतकांपूर्वीच निकस व व्यर्थ झाला होता. कारण यज्ञ व वर्णसंस्था व्यर्थ झाली होती. दैनंदिन सामाजिक जीवनांतील दुरवस्था व दैन्य विचारवंतांच्या मनास अखंड छळीत होतें. शिथिल राज्यसंस्था अनागोंदी कारभार व जुलमी स्मार्त कायदा यांच्यामुळे व राजे, पुरोहित, सरदार, आणि श्रेष्ठीजन यांच्या अनिर्बंध वर्चस्वामुळे उदमी, कारागीर व कृषिवल त्राणरहित जीवन कंठित होते. संपत्तीचें उत्पादन करणारे वर्गच जीर्णदशेने व दुरवस्थेने ग्रासले गेले; त्यामुळे वरिष्ठ वर्गांत ग्राम्य प्रवृत्ति वाढून ते पतित झाले. विवेकी लोकांना संसारांत उदासीनतेशिवाय दुसरा मार्ग राहिला नव्हता. सगळीकडेच अगतिकता, त्या अगतिकतेचें तत्त्वज्ञान म्हणजे शंकराचार्यांचा मायावाद व सन्यासवाद.

शंकराचार्यांची बौद्धिक व मानसिक संस्कृति अत्यंत श्रेष्ठदर्जाची होती. त्यांनी त्यांच्या कालापर्यंत परंपरेने प्राप्त झालेलीं सगळीं तत्वज्ञानें व विचारसंप्रदाय बुद्धीच्या निकषावर तपासून काढले. ईश्वराची जगाची व आत्म्याची प्रत्येक बौद्धिक साधकबाधक उपपत्ति सदोष आहे असें त्यांनी सिद्ध केले. विश्वविषयक किंवा वस्तुविषयक प्रत्येक उपपत्ति विशिष्ट मर्यादेबाहेर तर्कदुष्ट होते हें त्यांनी सिद्ध करून सगळ्या विचारमार्गांची बौद्धिक अगतिकता सिद्ध केली. शैववैष्णवांचा एकेश्वरवाद व सर्वेश्वरवाद, कणादाचा व नैयायिकांचा परमाणुवाद; सांख्यांचा जडप्रकृतिवाद, बौद्धांचा क्षणभंगवाद व विज्ञानवाद, जैनांचा अनैकांतवाद, चार्वाकाचा

देहात्मवाद व योग्यांचे योगदर्शन इत्यादि विचारसरणीचे अनुपपन्नत्व त्यांनी तर्कदृष्ट्या साधलें. स्वतःचा ब्रह्मवादही तर्कवादाने मानवबुद्धीने निश्चित होऊ शकत नाही, असें दाखविलें. बुद्धीने आत्मा व पुनर्जन्म यांचा निर्णय होऊ शकत नाही असें सांगितलें. सगळे मानवीविचार जीवनातील व विश्वांतील सत्याचा शोध करीत असता कुंठित व परिभ्रांत होतात, असें दाखवून शंकराचार्य मायावादावर येऊन धडकले. वस्तुविषयक सगळ्या विचारांची अगतिकता ही मायावादाची मायभूमि झाली. वस्तु अनिर्वचनीय आहे, म्हणजे वस्तूबद्दल अस्तिपक्षी, नास्तिपक्षी व उभयपक्षी काहीच उत्तर देता येत नाही; ह्मणून ती मिथ्या म्हणजे भ्रांतिमय ठरते, असें सांगितलें. हें विश्वाचें मिथ्यात्व मात्र श्रुतींचे प्रामाण्य गृहीत धरल्याशिवाय शंकराचार्यांना साधता आलें नाही. श्रुतीने 'ब्रह्मच सत्य' हें सांगितलें म्हणून शंकराचार्यास अर्थात् 'विश्व मिथ्या' असें सांगता आलें. शंकराचार्यांचा मायावाद हा कुंठित विचारसरणीचे, अगतिकतेच्या भोवऱ्यांत सापडलेल्या बौद्धिक चिकित्सेचें फलित आहे. बौद्धिक पेचप्रसंगातून सुटका न मिळालेल्या हिंदु तत्ववेत्त्यांच्या तत्वज्ञानाचें तें पर्यवसान आहे.

शंकराचार्यांना असें दिसलें की, आपली धर्मसंस्था, ब्रह्मवाद, मायावाद मानवबुद्धीच्या चिकित्सक प्रमाणपद्धतीने सिद्ध होणे अशक्य आहे. तेव्हा त्यांनी श्रुतिप्रामाण्याचा आश्रय केला. शब्द प्रामाण्याचा आश्रय केला याचा अर्थ असा होतो की, उपनिषत् कालापासून विकसित होणाऱ्या भारतीय बुद्धिवादास व तत्त्वज्ञानाला

शब्दप्रामाण्याच्या शिलातलाखाली पूर्णपणें जिवंत समाधि दिली व त्यांचा अंत केला. दर्शन किंवा तत्त्वज्ञान म्हणजे वस्तूची किंवा विश्वाची मानवबुद्धीने केलेली चिकित्सा होय. मानवप्रयत्नानी नित्य विकास पावणाऱ्या वस्तुचिकित्सेला हजारों वर्षांपूर्वीच्या वैदिक मानवांच्या बुद्धीतून निर्माण झालेल्या चार पुस्तकांच्या ( वेदांच्या ) प्रामाण्याने जखडून टाकण्याचा प्रयत्न शंकराचार्यांनी केला. पुराण्या वैदिक मानवांच्या मर्यादित अपूर्ण बुद्धीला पूर्णत्व अर्पण करून बौद्धिक विकासाची मुळेंच नष्ट केलीं. भारतीय समाजसंस्थेच्या ज्यावेळी विकासच थांबला आणि जीर्णता, शिथिलता आणि दुरवस्था यांच्यामुळें समाजात कसलीच उमेद राहिली नाही, त्या स्थितीत शंकराचार्यांसारख्या अलौकिक बुद्धिमत्तेच्या व विशाल प्रतिभेच्या पुरुषाच्या तत्त्वज्ञानाचें त्या स्थितींस अनुरूप असेंच पर्यवसान व्हावें यांत नवल नाही. त्यावेळी विज्ञानयुगाचा प्रारंभ होण्यास अनुकूल समाजदशा असती, तर शंकराचार्यांनी प्रखर तर्कशास्त्राने विदीर्ण करून टाकलेल्या तत्त्वज्ञानांच्या विनाशातून नवें तर्कशास्त्र व नवा भौतिकवाद उत्पन्न झाला असता. सगळ्या अध्यात्मवादी तत्त्वज्ञानांची सर्वांगीण तपासणी केल्यावर या शिवाय दुसरें काहीच निष्पन्न होऊ शकणार नाही. अशा स्थितीत एकतर शून्यवाद, संशयवाद व मायावाद उत्पन्न होतो, नाहीतर श्रेष्ठदर्जाचा तर्कवाद व भौतिकवाद अवतरतो. ती सामाजिक परिस्थिति विज्ञानास अनुकूल नव्हती. म्हणून उलट मायावाद उत्पन्न झाला. सगळा बौद्धिक पराक्रम वाया गेला. समाजच दुर्गतीच्या दीर्घ घनांधकाराने ग्रस्त केल्यानंतर निद्रा व दुःस्वप्न हाच तत्त्वज्ञानाचा इत्यर्थ निघणार, दुसरें काय?

शेवटी संसारविरक्ति, ईश्वरशरणता व अनन्यभक्ति हेंच धर्मरहस्य शिल्लक राहिलें. बाराव्या शतकापासून, हिंदुराज्यांचा अंत होऊ लागल्यावर, मायावाद भक्तिवाद व जातिभेदात्मक आचरण हाच खरा हिंदुधर्म बनला. तो मुसलमान, मराठे, व इंग्रज यांच्या राजवटीतून अव्याहत राहिला आहे.

इंग्रजी राजवटीत नव्या शास्त्रांच्या आधारे जुन्या सामाजिक चालीरीतीचें समर्थन पूर्णतः किंवा अंशतः करणारे अनेक प्रतिगामी विचारसरणीचे लोक उत्पन्न झाले, व होत आहेत. प्राचीन परंपरेचा जीर्णोद्धार करण्याची ही प्रवृत्ति हाच हिंदी राष्ट्रवादाचा पाया झाला आहे. पूर्वपरंपरेचा अभिमान हें राष्ट्रवादाचें मुख्य अंग बनलें आहे. या प्रतिगामी राष्ट्रवादाचा अंगीकार केलेल्या काही लोकांनी जुन्या जातिभेदाचें आधुनिक वंशशास्त्राच्या आश्रयाने समर्थन चालविलें आहे. त्याचा थोडक्यांत परामर्श घेऊं.

जातिभेद चातुर्वर्ण्य व वंशभेद

आधुनिक शास्त्रांतील मानववंशभेदांचा आणि चातुर्वर्ण्य व जातिभेद या संस्थेतील वंशकल्पनांचा परस्पर संबंध आहे, असें काही लोक प्रतिपादन करितात, पण तें बरोबर नाही. (१) आधुनिक शास्त्रांतील मस्तिष्करचना, नाकाचे आकार, चेहरेपट्टीचे प्रकार, डोळ्यांचे विशेष, केसांचे फरक, त्वचेच्या रंगांचें वैविध्य, रक्ताचे तीन भेद, उंची इत्यादि शारीर लक्षणांचा विचार करून वंश-भेद ठरविण्याचे प्रयत्न

(१) गीताभाष्य, शंकराचार्य १८।६६

सुरू आहेत. मस्तिष्क, चेहरेपट्टी, नाक, डोळे, केस, कातडीचा रंग, उंची व रक्त यांच्यांतील जे प्रकार वंशशास्त्राने ठरविले आहेत, त्यांच्यांत परस्पर सापेक्षता फार कमी आहे. काळ्या, गोऱ्या, पिवळ्या, गुलाबी किंवा पिंगट कातडीच्या माणसांच्या डोळ्याची रचना किंवा मस्तिष्क त्या त्या रंगाप्रमाणे अमुकच प्रकारचें असतें, असें ठरविता येत नाही. याचप्रमाणे इतरही विशेषांचे बाबतीत हेंच कमीजास्त प्रमाणात सांगता येईल. उष्णता, शैत्य, हवा, पाणी, अन्न, श्रमाचे व व्यवसायाचे प्रकार इत्यादि अंतर्बाह्य परिस्थिती-मुळे शारीर लक्षणांत बदल होतो, असें आढळून येऊं लागलें आहे. वंशभेदाचें महत्वाचें लक्षण मस्तिष्करचना होय. परंतु चार सहा पिढ्यांत तिच्यातही देशकालपरिस्थितीमुळे फरक पडतो, असें फ्रांझ बोआस या अमेरिकन मानवजातिशास्त्रज्ञाने व इतरही पंडितांनी अनेक मानवगटांच्या अभ्यासावरून दाखवून दिलें आहे.

(२) केसांचा रंग कुरळेपणा लांबसडकपणा रखरखीतपणा किंवा मार्दव, कातडीचा गोरेपणा, काळेपणा तांबडेपणा किंवा पिवळे-पणा, मस्तकांचे निरनिराळे आकार, नाक अणकुचिदार सरळ उंचं लठ्ठ चापटकें पसरट फुगीर किंवा गरुडबाकाचें, रक्ताचे तीन भेद, यांचा व चातुर्वर्ण्यांतील गुणकर्मविभागांचा काही संबंध नाही. वरील कोणत्याही शारीरलक्षणांनी श्रुतिस्मृत्युक्त ब्राम्हणत्व, क्षत्रियत्व, वैशत्व किंवा शूद्रत्व निश्चित करणे अशक्य आहे; या शारीरिक लक्ष-णांशी श्रुतिस्मृत्युक्त मानसिक गुणांचा संबंधही काही ठरलेला नाही.

(३) आर्य म्हणवून घेणारांना आपल्या वंशवरिष्ठत्वाचा

फार गर्व आहे; परंतु आर्यसंस्कृति व विशिष्ट लक्षणांचा वंश यांचें काही नातें नाही, ही गोष्ट आता निश्चितपणे शास्त्रज्ञांस ठाऊक झाली आहे. आर्यसंस्कृति ज्या लोकसंघात आढळते, त्यांच्यातील एकजिनसी वंशवैशिष्ट्य आहे असें मुळीच ठरविता येत नाही, येवढेंच नव्हे तर मानववंशशास्त्रीय तत्त्वाप्रमाणे अनेकप्रकारचे वंश आर्यसंस्कृतीच्या गटात सहज आढळतात. ज्यांच्यात महान् वेदिक घराणी अद्याप आहेत ते तेलगू ब्राह्मण व कोचीन प्रांतातील शूद्र-संस्कृतीचे कल्ल व इल्लुव यांच्यात वंशसादृश्य शाबित करता येतें. या तेलगू ब्राह्मणांच्या वंशासारखेच उत्तर हिंदुस्थानातील व पंजाबमधील चांभार वगैरे लोक आहेत. गुजराथेंतील नागर ब्राह्मण, बंगाली कायस्थ, व कानडी ब्राह्मणेतर यांच्यातही वंशसाम्य आहे. वायव्य सरहद्दीवरील व हिमालयांतील काफिर आणि पठाण, पंजाबी शीख, आणि संयुक्त प्रांतांतील काही ब्राह्मणगण यांच्यात वांशिक ऐक्याची लक्षणें आढळतात. महाराष्ट्रांतील चित्पावनांत पठाण व काफीर यांच्यातील गुलाबी रंग व घारेपणा सापडत असला तरी त्यांच्या मस्तिकाची रचना, उंची व इतर वंशलक्षणें महाराष्ट्रातील देशस्थ, कराडे, मराठे महार इत्यादि बहुजनसमाजाच्या वंशाचीच आहेत. वंशदृष्ट्या महाराष्ट्रातील बऱ्याचशा जातींची जी समान लक्षणें आहेत तीच चित्पावनांतही आहेत.

(४) हिंदुस्थानांतील मानवपुंज, सध्या रानटी असलेल्या

---

(१) Census Ethnography, India, 1931, p. 27 by Guha.

हिंदी मानववंशांची वंशीय लक्षणें वगळल्यास, महत्त्वाच्या तीन वंशांचा संस्कार होऊन बनलेले दिसतात. युरोप, पश्चिम आशिया आस्ट्रेलिया व चीन यांत सांपडणाऱ्या वंशप्रकारांचे अंश हिंदुस्थानांत आढळतात. त्यांच्यावरून सांस्कृतिक उच्चनीचतेची व मानसिक गुणांची पारख करता येणे मुळीच शक्य नाही.

( ५ ) आर्यवंश म्हणून अभिमान बाळगणाऱ्या लोकांनी एक महत्वाची गोष्ट लक्षांत ठेवणे जरूर आहे की, आर्यसंस्कृतीची निर्मिति करणारे लोक रानटी असताना अत्यंत उच्च संस्कृति निर्माण करणारे समाज या भूगोलावर होऊन गेले व आज हयात आहेत. चीन, इजिप्त, क्रीट, पॅलेस्टाईन, अरबस्तान, इराक, इत्यादि देशांचे प्राचीन इतिहास हेंच सांगत आहेत. आर्य म्हणविणाऱ्यांनी एकाकाळी रानटी वृत्तीने व पाशवी उत्साहाने श्रेष्ठसंस्कृति नष्ट करण्यासही कमी केलें नाही, असें इजिप्त व सुमेर यांचा इतिहास सांगतो.

( ६ ) चातुर्वर्ण्याचा वंशशास्त्रोक्त वंशांशी काही संबंध नाही. भौतिकसाधनें व भौतिक उत्पादनपद्धति बदलली की संस्कृति बदलते. एखाद्या मानववंशास लोखंडाचा शोध त्याच्या भौगोलिक परिस्थितीने झाला नाही, व दुसऱ्या मानववंशास मुबलक प्रमाणात लोखंड सापडलें, तर लोखंड सांपडलेल्या वंशांची शस्त्रास्त्रें व लष्करी व्यवस्था लोखंडामुळे अत्यंत सुधारते, आणि तो वंश आपल्यापेक्षां शूर धाडसी मेहनती लोहरहित वंशांचा पराभव करून, त्या वंशांस आपल्या आधिपत्याखाली आणून त्यांना शूद्र संस्कृतीचे बनवू शकतो. पुष्कळच क्षत्रिय मराठे

इंग्रजी राज्यांत क्षात्रत्व नष्ट होऊन शूद्र झाले आहेत, याचें कारण इंग्रज हे वंशदृष्ट्या वरच्या दर्जाचे क्षत्रिय होते, हें नव्हे तर इंग्रजांची लष्करी संस्कृति म्हणजे शस्त्रास्त्रें व युद्धपद्धति, अधिक सुधारलेली होती. इतिहास सांगतो कीं, घोडदळाने लढणारे मानवगट घोडदळ माहीत नसलेल्या शूर मानवसमाजांना जिंकून व शूद्र बनवून स्वतः राजन्य व ब्राह्मण बनले. ब्राह्मणांची गुणकर्मे असलेले लोक परिस्थितीत बदल झाल्यास, क्षत्रिय पेशाचे किंवा शूद्रकर्मी बनतात. उत्तरहिंदुस्तानांतील विशेषतः संयुक्तप्रांत, पंजाब, राजपुताना व सिंधप्रांत यांतील ब्राम्हण मोठ्या प्रमाणांत शूद्रकर्मी बनलेले आज दिसत आहेत. ही केवळ अपवादात्मक उदाहरणें नाहीत. मोठमोठे मानवगट एकतऱ्हेच्या वर्णसंस्कृतीचा व धंद्यांचा त्याग करून अन्यवर्णाची संस्कृती व धंदे पतकरतात. वंशस्वभावाचा उत्कर्षापकर्ष किंवा वंशसंकर हीं याची कारणें मुळीच नव्हेत. राजकीय व आर्थिक परिस्थितीमुळे हीं स्थित्यंतरें घडतात, असें सहज सिद्ध करता येतें.

(७) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची गुणकर्में स्वाभाविक जननसिद्ध विभक्त वंशावर अवलंबून आहेत, यास एकही प्रमाण मानवजातीच्या इतिहासात सापडत नाही. एकाच मानव वंशाच्या गटात नव्या सांस्कृतिक परंपरा उत्पन्न होतात व जुन्या बदलतात, असेंच इतिहास सांगतो. या गोष्टींचा नैसर्गिक भिन्न वंशाशी काही संबंध नाही; आणि ही गुणकर्में परस्पर विरुद्धही नाहीत. ज्ञान, संयम, शौर्य, शारीरश्रम, सहिष्णुता व

धनार्जनशीलता या गुणांचा संगम झालेली हजारों माणसें असतात. शौर्य हा क्षात्र गुण, ज्ञान व संयम हे ब्राह्मणगुण, धनार्जनशीलता हा वैश्यगुण व शारीरश्रमप्रियता हा शूद्रगुण होय, असें म्हटलें तर त्यांच्यांत परस्पर विरोध असतो, असें मुळीच सिद्ध होणे शक्य नाही. एवंच चातुर्वर्ण्यव्यवस्था व जातिसंस्था वंशशास्त्रावर उभारलेली व्यवस्था आहे, यास एकही शास्त्रीय प्रमाण नाही.

हिंदुधर्माचें आधुनिक संस्करण

ब्रिटिश अमदानीत हिंदूंमध्ये नव्या धर्मविषयक चळवळी उत्पन्न झाल्या. ब्रिटिशांच्या समागमाने हिंदुस्थानांतील समाज स्थितींत क्रांतीच घडवून आणली. नवें विज्ञानयुग, कारखानदारी युग व यंत्रयुग यांना बरोबर घेऊन, म्हणजे पाश्चात्यांची सुधारणा घेऊन, ब्रिटिश येथे आले. त्यांनी राज्यस्थापना केली. याचे भारतीय समाजरचनेवर मूलगामी परिणाम घडले. हिंदुसमाजातील विचारवंतानी नव्या परिस्थितीशी जुन्या धर्मकल्पना व आचार जुळत नाहीत, हें पाहून धार्मिक व सामाजिक परिवर्तनास व सुधारणेस सुरुवात केली. काहीनी नवेच धर्मसंप्रदाय स्थापन केले, तर कित्येकांनी नवे संप्रदाय न काढता विचारआचारांत परिवर्तन घडवून आणण्याचा उपक्रम केला. ब्रह्मसमाज व आर्यसमाज हे नवे संप्रदाय नवशिक्षित लोकांत अधिक प्रभावी होऊ लागले. ब्रह्मसमाजात अनेक प्रकारच्या समजुतीना व वादाना फारच थोडें स्थान आहे; एकेश्वरभक्ति, नागरिक धर्म व नीति यांनाच प्राधान्य आहे. अनेक

धार्मिक भानगडी त्यांत नाहीत; तो सरळ संप्रदाय आहे. परंतु ब्रह्मसमाजाचा जोर लवकर संपला. काही शिक्षित शहरवासीयांच्या बाहेर त्याला महत्व केव्हांच आले नाही. आर्यसमाजाचा पंजाबांत बराच बोलबाला झाला. ब्रह्मसमाजापेक्षा या संस्थेने उत्तर हिंदुस्थानात सामाजिक व धार्मिक सुधारणेच्या कार्यात पुष्कळच प्रगति केली. नवा संप्रदाय न स्थापता सामाजिक परिवर्तन करणाऱ्यांत दोन प्रकार उत्पन्न झाले. एक बुद्धिवादी सुधारकांचा व दुसरा अध्यात्मवादी धार्मिकांचा. बुद्धिवादी सुधारकांनी जुन्या आचारविचारांची नव्या समाजशास्त्राच्या व विज्ञानाच्या आधारे समीक्षा करून पांढरपेशा वर्गांतील किरकोळ आचारविचारांत फरक घडवून आणण्याचा प्रयत्न केला. प्रौढविवाह, पुनर्विवाह, संमतिवयाचा निर्बंध, जातीजातील रोटीव्यवहार, इत्यादि गोष्टीना त्यांनी महत्व दिलें. अध्यात्मवादी धार्मिक नवशिक्षितांपैकीं कित्येकांनी पहिल्यांदा या बुद्धिवादी सुधारकांचे पाय मागे ओढण्यास कमी केलें नाही; सवंग लोकप्रियतेच्या पाठीशी लागून जुन्या परंपरेचें खोटें समर्थन करून सुधारकांचे प्रयत्न हाणून पाडण्यांत पुढाकारही घेतला. अध्यात्मवादी शिक्षितांची परंपरा गेली पन्नास वर्षें अविच्छिन्न चालू आहे. विवेकानंद, रामतीर्थ, टिळक, गांधी, प्रो. राधाकृष्णन् इत्यादि लोक अध्यात्मवादी शिक्षित होत. त्यांनीं जुन्या हिंदुधर्माला व धार्मिक तत्त्वज्ञानाला उजळा देण्याचा प्रयत्न केला. यांची बुद्धिवादी सुधारकांत गणना करणे चुकीचें आहे. कारण हे लोक ईश्वरसाक्षात्कार, योगदृष्टि, विभूतिवाद, अवतारवाद, इत्यादि गोष्टींचे समर्थक आहेत.

**आर्यसमाज व वेदधर्माचें पुनरुज्जीवन**

आर्यसमाज हा वेदप्रामाण्य स्वीकारून व स्मृतिपुराणोक्त धर्माचा त्याग करून निर्माण झालेला पंथ आहे. वेदांपैकी ब्राह्मणभागास हा पंथ वेदत्व मानीत नाही. मंत्रभाग तेवढा खरा वेद, अशी या पंथी-यांनी आपली समजूत करून घेतली आहे. कारण ब्राह्मणभागांतील विस्तृत कर्मकाण्ड या युगांत अगदीच वेडगळपणाचे वाटतें, त्या-मुळें त्यांचें वेदत्व त्यांनी काढून टाकलें. ह्या पंथाचे मुख्य आचार्य दयानंद यांनी वेदांचा अर्थ लाविला आहे. वेदांना एकेश्वरवादाचा पेहराव त्यांनी दिला आहे. मंत्रभागांत जेथे पशुयज्ञाचा संदर्भ येतो, तेथे रूपकात्मक अर्थ लाविला आहे. दयानंदांच्या दृष्टीने वेद पूर्ण प्रमाण आहे.

दयानंदांनी अत्यंत पुराण्या वेदमंत्रांचा मोठ्या चढाओढीने अर्थ करून वेदांना नव्या युगास अनुरूप बनविण्याचा व्यर्थ खटा-टोप केला आहे. वेदांतील कालवश झालेल्या कल्पनांचें पुनरु-ज्जीवन करून नव्या समाजजीवनास उपयुक्त असा नवा अर्थ निर्माण करण्याच्या प्रयत्नांत बौद्धिक दृष्टीने दयानंदास पूर्ण अपयश आलें आहे. आर्यसमाज म्हणजे मुसलमानी धर्माची प्रतिक्रिया होय. एक देव, एक वेद व एक धर्म हा संदेश नव्या युगास अनुरूप असणें शक्य नाही. बाराशें वर्षांपूर्वी महंमदाने जो संदेश अरबी लोकांना दिला, त्यासारखा संदेश अंधानुकरणाने या विज्ञान प्रधान युगांत देणे अत्यंत अप्रासंगिक होय.

काही लोक म्हणतात कीं, मूळ वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन करून हिंदूंचा यापुढें खरा उत्कर्ष होईल. बुद्धपूर्वधर्माचा संदेश

दिल्याने हिंदू पूर्वीसारखे पराक्रमी बनतील. परंतु बुद्धोत्तर कालात हिंदु दुबळे व हीन बनले, हें एक ऐतिहासिक असत्य आहे. बुद्धोत्तरकालातच हिंदूंचीं तीन चार मोठीं साम्राज्यें झालीं. तेवढीं साम्राज्यें बुद्धापूर्वी होती, यांस इतिहासांत पुरावा नाही. दुसरी गोष्ट अशी कीं, वेदांतील कल्पनांनी हिंदू यापुढें अधिकच निकृष्ट बनतील; कारण वेदांतील सृष्टिविषयक व समाजजीवनविषयक विचार अगदी कोते व भ्रामक स्वरूपाचे आहेत. सृष्टी व समाज याबद्दलच्या भ्रामक विचारांच्या स्वीकाराने मानव अधिक दुर्बलच बनेल. कारण सृष्टीतील व समाजातील कार्यकारणभावाच्या यथार्थ ज्ञानानेच मनुष्य अधिक पराक्रमी व समर्थ बनतो. वेदांत ऐहिक जीवनाला, प्रवृत्तिवादाला आणि भौतिकसाधनांना फार महत्व आहे हें खरें. परंतु निसर्गशक्तींच्या ठायी अनेक देवता राहतात व त्यांच्या लहरीने सृष्टीतील घडामोडी होतात, हें महान् अज्ञान त्यांत आहे. त्याचप्रमाणे त्यांत देवतांच्या आराधनेचें शुष्क व व्यर्थ कर्मकांड किंवा यज्ञ आहेत. त्या सव्यापसव्याचा व लटांबराचा आज आपल्या संस्कृतीशी मुळीच मेळ बसणार नाही. त्यांतील देवरूपें व देवचरित्रें आजच्या ज्ञानाशी व नैतिक कल्पनांशी अगदीच विसंगत आहेत. आजची विज्ञानें व समाजशास्त्रें यांच्याशी तुलना करता असें दिसेल कीं, तो वैदिकधर्म अडाणी समाजाचा होता. वेदांचें श्रेष्ठत्व त्या काळांतच शोभणारें व त्या परिस्थितीस अनुरूप असेंच होतें. त्या वेदांची आजच्या सुधारणेशी व संस्कृतीशी तुलना न केलेलीच बरी. भास्कराचार्यांचें गणित आजच्या गणितापुढें फारच तोटकें व क्षुद्र भासतें म्हणून त्याची ऐतिहासिक योग्यता

व थोरवी कमी नाहीं; तसेंच वेदांचे आहे. वेद, उपनिषदें, गीता व दर्शनें यांना ऐतिहासिक महत्व फार आहे; म्हणून आजच्या जीवनांत त्यांना मार्गदर्शक करणे आत्मघातकीपणाचें ठरेल.

गीताधर्माचें पुनरुज्जीवन

गीतेतील प्रवृत्तिमार्गाने व अध्यात्मयोगाने बऱ्याच शिक्षितांचें लक्ष खेंचून घेतलें आहे. आधुनिक अनेक पंडितांनी व नेत्यांनी गीतेचीं भाष्यें, रहस्यें, विवरणें व टिपणें लिहून त्यांतून नव हिंदुधर्माचा उद्बोधक संदेश काढण्याचा प्रयत्न केला आहे. यासंबंधी पहिली ही गोष्ट विचारात घेतली पाहिजे कीं, गीतेतील तत्त्वज्ञान, गीता सांगते म्हणून प्रमाण आहे, कीं, तें विचाराच्या कसोटीस उतरते म्हणून प्रमाण आहे ? तसेंच, गीतेतील सर्व विचारांची परस्पर संगति नीट लागते काय ? गीतेतील विचारांत अनेक गुंतागुंतीचे विषय आले आहेत. पुनर्जन्म, निर्विकार गुणातीत आत्मा, परमेश्वर, कर्मविपाक हे गीतेचे मूलभूत सिद्धांत तर्कशास्त्राच्या नियमानुसार मानवबुद्धीनें निश्चित करता येत नाहीत. गीतेवर ज्यांची श्रद्धा आहे, त्यांना ते सिद्धांत आपोआप मान्य आहेत, किंवा ज्यांना स्वतःस तसा अलौकिक अनुभव येतो, असें वाटतें, त्यांना ते मान्य आहेत. पण शब्दप्रमाणावर ज्यांची श्रद्धा नाही किंवा ज्यांना 'आपणांस तसा अलौकिक अनुभव यतो' असें म्हणण्याचें अलौकिक धाडस नाही, त्यांना गीतेतील हे मूलभूत सिद्धांत कसे पटणार ? गीतेत प्रवृत्तिवाद आहे कीं, निवृत्तिवाद आहे हा विषय अगदी वेगळा आहे. गीतेत प्रवृत्तिवाद असो वा निवृत्तिवाद असो, त्याच्या मुळाशी पुन-

जन्मवाद, कर्मविपाक म्हणजे दैववाद, ईश्वरवाद इत्यादि महत्त्वाचे सिद्धांत आहेत. ज्यांना गीतामूलक नवा हिंदुधर्म स्थापावासा वाटतो त्यांनी गीतेचें स्वतःप्रामाण्य श्रद्धेने गृहीत धरलेंच पाहिजे. गीतेचें शब्दप्रामाण्य ज्यांस कबूल नाही, ज्यांस बुद्धिवादानेच चालावयाचे आहे व ज्यांस बुद्धिवादी धर्म पाहिजे आहे, त्यांना गीतेतील अनेक अध्यात्मविषयक व देवताविषयक प्रश्न बुद्धीने सिद्ध करण्यास मार्केंडेयाचें आयुष्यही पुरावयाचें नाही.

आज प्रवृत्तिवाद किं निवृत्तिवाद हा प्रश्न समाजाच्या जीवनांत महत्वाचा नाही. खरा प्रश्न निराळा आहे, समाजप्रगति कुंठित झाली आहे व नव्या समाजरचनेचे प्रश्न पुढे उभे आहेत. दोन अडीच हजार वर्षांपूर्वीची गीता आजच्या प्रश्नांपुढे काय करणार ? अभ्युदय व निःश्रेयस हे ध्येयवाचक शब्द सामाजिक प्रश्न सोडविण्यास असमर्थ आहेत. समाजाचें गतिशास्त्र व सामाजिकशक्तींच्या आघातप्रत्याघातांचे नियम शोधणारें शास्त्र आज पाहिजे आहे. गीतेतील वेदांती चर्चेने तेथें काही भागणार नाही. गीता निष्कर्मयोग सांगते, असें म्हणतात. वस्तुत. कर्मांचे व्यक्तीवर व समाजावर काय परिणाम घडतात, आणि त्या कर्मांपासून काय फल निष्पन्न होतें, याचा आढावा घेऊन जें कर्म योग्य ठरेल, तेंच सत्कर्म होय. परंपरागत रूढीने चालत आलेली अमुक कर्में अयोग्य होत हें बौद्धिक पद्धतीने ठरलें पाहिजे. याकामीं सामाजिक शास्त्रेंच उपयोगी पडतील, गीता नव्हे. दुसरा मुद्दा असा कीं, गीतेची मांडणी पौराणिक पद्धतीची आहे, त्यांत स्वाभाविक तर्कशुद्धता व प्रमाणबद्धता नाही. ती खटपट

करून त्यांतून काढावी लागते, त्यामुळे गीतेचे अनेक अर्थ होतात. अशा या गीतेचा या बुद्धिवादी विज्ञाननिष्ठ युगात काय उपयोग होणार ?

बुद्धिप्रामाण्य व हिंदुधर्माचे नवीकरण.

कांही हिंदु पंडितांना व शिक्षितांना जातिधर्माचें वैयर्थ्य पटते त्यामुळे त्याचा अभिमान वाटत नाही; जातिभेदाची घटक असलेली अस्पृश्यता आणि रोटीबेटीव्यवहाराचे सूक्ष्म नियम यांचेंही महत्व पटत नाही, त्यामुळे जातिधर्म हें हिंदुधर्माचें खरें लक्षण नव्हे असें त्यांस वाटते. म्हणून जातिधर्मापेक्षां तात्त्विक व उच्च भूमिकेंतले लक्षण ते शोधण्याचा किंवा दाखविण्याचा प्रयत्न करीत असतात. पण त्यांत त्यांना अपयश आलें आहे. या प्रयत्नांतून अस्तित्वात नसलेला नवा हिंदुधर्म निर्माण होत आहे. या प्रयत्नांच्या मुळाशी अर्धवट बुद्धिवादी व अशास्त्रीय अशा स्वरूपाच्याच कल्पना असतात. हल्लींचे सामाजिक प्रश्न गहन आहेत. त्यावर योजलेले हे तात्पुरते तोडगे अगदी निरर्थक ठरतात. त्यांतील बुद्धिवाद दिखाऊ व कच्चा असतो. त्या बुद्धिवादाच्या वरवरच्या पातळ आवरणाखाली अंधश्रद्धाच दडलेली असते. मूलगामी विचारसरणीचा त्यांत अभाव असतो. खऱ्या बुद्धिवादास रजा दिल्याशिवाय नवा पारमार्थिक धर्मसंप्रदाय उभारता येणार नाही. हें त्यांना कळत नाही. पारमार्थिक संप्रदाय नव्या स्वरूपांत आणावयाचा झाल्यास, त्या करितां शब्दप्रामाण्य स्वीकारलेंच पाहिजे. पूर्ण बुद्धिप्रामाण्य आलें कीं, धर्मवस्तु शिल्लकच राहणार नाही. अलौकिक दैवी वस्तूंवरील

श्रद्धा हा धर्मकल्पनेचा प्राण आहे. शब्दप्रामाण्याशिवाय या वस्तूला कसलाच खंबीर आधार मिळत नाही ही गोष्ट लो. टिळक व दयानंद यांनी ओळखली होती. म्हणूनच दयानंदानी वेद व टिळकांनी गीता प्रमाण मानली.

विद्वद्रत्न के. ल. दप्तरी, प्रो. पां. वा. काणे, तर्कसांख्यतीर्थ कोकजे, महादेवशास्त्री दिवेकर इत्यादि धर्मनिर्णयमंडळाची विद्वान् मंडळी, बुद्धिवादमूलक तत्त्वनिष्ठ नवा हिंदुधर्म रचण्याचा प्रयत्न करूं लागली आहेत. कोणत्याही धर्माच्या मुळाशीं अलौकिक दिव्य असा अनुभव किंवा शब्दप्रमाण असावेंच लागतें. धर्मनिर्णयमंडळाचे संस्कारविधि देवताविषयक कल्पना गृहीत धरूनच रचले आहेत. या देवताविषयक कल्पना म्हणजेच केवळ संकेत नाहीत असें म्हटलेंच पाहिजे. कारण खोट्या संकेताची मानव समाजाला गरज नाही. त्या कल्पनांचे प्रामाण्य, ज्यांना देवतांचा अनुभव आहे, प्रत्यक्ष साक्षात्कार झाला आहे, त्यांच्या शब्दांवरच अवलंबून आहे, असें म्हटलें पाहिजे. ईश्वर, अमरत्व, ब्रह्म, माया, अदृष्ट इत्यादि कल्पनांचा निश्चय सुधारलेला बुद्धिवाद व निरोगी मनाचा अनुभव करू शकत नाही. धर्मनिर्णयमंडळास शुद्ध शब्दप्रामाण्य मान्य नसल्यास त्या मंडळाचे प्रार्थनाविधि व संस्कारविधि अर्धवट मंद श्रद्धेचे द्योतक आहेत असेंच म्हटलें पाहिजे. दृढनिश्चयाशिवाय व खोल अमर्याद श्रद्धेशिवाय धर्मस्थापना कधींच होऊ शकत नाही. या महान् समाजक्रांतीच्या विज्ञानयुगात नवीं भौतिकशास्त्रें व समाजशास्त्रें उत्पन्न झालीं आहेत. ही श्रेष्ठ साधनें उपलब्ध झालीं असता, त्यांचा उपयोग न करता केलेले प्रयत्न व्यर्थ ठरतील, यांत शंका नाही.

धर्ममूल्याची चर्चा

काही लोकांचें असें म्हणणे आहे कीं, ईश्वर, आत्म्याचें अमरत्व व कर्मविपाकवाद यांच्या कल्पनांना मानवी जीवनांत कांही मूल्य आहे. सर्वज्ञ सर्वशक्तिमान् सर्वगुणसंपन्न परमकल्याणमय ईश्वर बुद्धीने सिद्ध होवो वा न होवो, आत्म्याचें अमरत्व तर्कशुद्धरीतीने पटविता येवो अथवा न येवो; किंवा व्यक्तीने केलेल्या कर्माचें फल केव्हां तरी त्याच व्यक्तीला भोगावेंच लागतें ही गोष्ट प्रमाणांनी शाबित होवो वा न होवो; ह्या वस्तूंचें अस्तित्व गृहीत धरल्याशिवाय मनुष्यांस संसारांत समाजधारणेसंबंधीं कर्में किंवा सत्कर्में धीराने करता येत नाहीत, म्हणून त्या वस्तूंचें अस्तित्व गृहीत धरलेंच पाहिजे. ह्या मानवबुद्धीच्या पलीकडच्या वस्तूंच्या अस्तित्वकल्पनेने मनुष्यास कर्मांची व जीवनाची कृतार्थता वाटते, हेंच त्या वस्तूंच्या कल्पनांचें मूल्य होय. समाजधारणेस किंवा समाजव्यवस्थेस ईश्वर, स्वर्ग, नरक, आत्मा, पारलौकिक जीवन इत्यादि वस्तूंच्या कल्पनेची आवश्यकता आहे.

या कल्पनेत अनेक दोष आहेत. पहिला दोष असा कीं, ईश्वरश्रद्धा व अमरत्वभावना या अलौकिक व पारलौकिक मूल्यांपेक्षां अगदी निराळ्या मूल्यांच्या म्हणजे केवळ ऐहिक मूल्यांच्या योगानें इतिहासांतील फार मोठ्या घटना घडून आल्या आहेत व येत आहेत. कला, विद्या, त्याग, शौर्य, पराक्रम इत्यादि मानवी गुण पराकाष्ठेला पोंचविण्याचें सामर्थ्य ऐहिक बुद्धिगम्य मूल्यांत आहे. फ्रेंच राज्यक्रांति ज्या वर्गांनी केली, त्यांच्या जीवनाला व परा-

क्रमाला स्वातंत्र्य, लोकसत्ता व बंधुत्व इत्यादि सामाजिक मूल्याचान्च पाठिंबा होता. अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धांत, लोकसत्ता व मानवी मूलभूत हक्कांची स्थापना या ध्येयाने अमेरिकेतील लोक लढले. स्पेनच्या गेल्या अयशस्वी व प्रतिक्रांति पर्यवसायी यादवी युद्धांत लोकसत्ता, मानवीहक्क, आर्थिक गुलामगिरीचा नाश आणि समाजवाद या ध्येयांनी प्रेरित झालेल्या आंतरराष्ट्रीय शूरांनी धारातीर्थी देह ठेविले आहेत. हिंदुस्थानांत फासावर गेलेले भगतसिंगासारखे लोक राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या ध्येयांनीच देहार्पण करून गेले. जीवन-मरणाचीच ज्या ठिकाणी कसोटी असते, त्याठिकाणी सुद्धा अमरत्व व ईश्वर या भावनांचा नुसतां स्पर्शही नसताना महान् कार्ये सामान्य जनसुद्धा पार पाडतात. ही गोष्ट सामाजिक मानसशास्त्रास मान्य आहे. ईश्वरावर व अमरत्वावर श्रद्धा नसलेले मोठमोठे विज्ञानसंशोधक भौतिकशास्त्रांत अहोरात्र जीवापाड मेहनत करीत असतात. संशोधक माणसे केवळ ज्ञानलालसेने, व्यवसाय प्रीतीने, उपजीविकेचा धंदा म्हणून किंवा समाजप्रीतीने प्रेरीत होऊन व जीव धोक्यांत घालून धाडसी कृत्यें करीत असतात. आई मुलाकरिता खस्ता खाते, ती स्वर्गाकरिता किंवा ईश्वराकरितां नव्हे. तिचा जीव मुलाच्या जीवात मिळून गेलेला असतो; तीच्या भावना मुलाच्या हितालाच परमार्थ समजतात. केवळ माझे एका व्यक्तीचें काय भवितव्य आहे, याचीच चिंता ज्यांना असते, असे सामाजिक प्राणी फार थोडे असतात. सामाजिक क्रिया व्यापक अहंभावानेच घडत असतात. समाजात जन्माला आलेल्या मानवाचा अहंभाव सामाजिक इतिहासाच्या विशिष्ट युगानुरूप संकुचित किंवा व्यापक झालेला असतो. त्याच्या व्यापकतेची मर्यादा विशिष्ट

ऐतिहासिक परिणतीवर अवलंबून असते. कुटुंबाच्या हिताकरिता उसंत न घेता खपणारी प्रजा समाजाच्या आरंभापासून आहे. तिला ईश्वर व अमरत्व नाही हें कळलें तरी ती तशीच खपेल. जमातीचा कायदा पारलौकिक भीतीवाचून मनापासून पाळण्याची वृत्ति रानटी लोकांतही आढळते. धार्मिक ध्येयार्थ झटणाऱ्या व्यक्तीला स्वतःच्या पावित्र्याची व पारलौकिक जीवनाचीच फार काळजी असते व त्याकरिता तिची नीति असते. तिची ही भावना अत्यंत स्वार्थी असते. हा स्वार्थ अगदीच विकृत असतो. कारण तो केवळ भ्रामक कल्पनेवर आधारलेला असतो. समाजाची प्रगमनयुक्त धारणा, राष्ट्रवाद, समाजवाद, मानव्याचा उत्कर्ष, इत्यादि ऐहिक बुद्धिगम्य ध्येयें समाजनिष्ठ आहेत, वैयक्तिक नाहीत. तेथें वैयक्तिक साध्य गौण ठरतें. कारण त्या व्यापक ध्येयांत वर्तमान व भावी अनंत व्यक्तींचें हित समाजस्थैर्य व समाजकल्याण साठविलेलें असते. ऐहिक सामाजिक मूल्यांची तरफदारी करणारा भौतिकवाद, व्यक्तीच्या काल्पनिक पारलौकिक ध्येयांचा पुरस्कार करणाऱ्या अध्यात्मवादापेक्षा अधिक सत्य व श्रेष्ठ आहे. कारण ह्या भौतिकवादांत समाजांतील सर्व व्यक्तींच्या योगक्षेमाचा अन्तर्भाव होतो. धार्मिक मूल्यांतील दुसरा दोष असा कीं, विशिष्ट देशकालमर्यादेत महत्व पावलेल्या विधिनिषेधांस, भावनांस, आचारांस, विचारांस किंवा संस्थांस धर्मवाद शाश्वतमूल्य अर्पण करतो, त्यांना शाश्वत अलौकिक शक्तींचा पाठिंबा निर्माण करतो. हाच परमेश्वरी आदेश किंवा संकेत आहे असें सांगतो, हें ऋषीला वा महात्म्याला दिसलेलें महान् सत्य आहे, असें दाखवितो. त्याचा

परिणाम असा होतो कीं, विशिष्ट देशकाली व विशिष्ट परिस्थितीतच कांही आचारविचारांना जें महत्व असतें तें परिस्थिति बदलल्यावर नष्ट होतें आणि त्यांची अडगळ बनते. धर्ममूल्यामुळे ही अडगळ प्रगतीच्या मार्गांत अडथळा उत्पन्न करते. अपौरुषेयता, ईश्वरसंकेत, कर्मविपाक इत्यादि शाश्वतमूल्येंच परिवर्तन करण्यास अडथळा करून प्रगतीचे वैरी बनतात. हीच धार्मिक शाश्वत मूल्यें मानवांच्या अधोगतीचीं द्वारें बनतात, असें मानवेतिहास बजावून सांगत आहे. धर्मत्व किंवा पारलौकिक मूल्य असलेली विशिष्ट ध्येयें, भावना, आचार व संस्था याच प्रगतीच्या शृंखला बनतात. मनुष्यानेंच जन्माला घातलेला व राखलेला धर्म व ईश्वर मनुष्यावर कुरघोडी करतो व त्याचा अध:पात करतो. म्हणून बुद्धिवादावर आधारलेली व गरज संपताच बदलता येणारीं ध्येयें व मूल्यें यापुढे पाहिजेत. धर्ममूल्यांस रजा दिली पाहिजे.

धर्ममूल्यांचा तिसरा दोष असा कीं, धर्मसंस्थेवर सत्ताधारी वर्गाच्या लोकांचा प्रभाव पडतो, व ते त्या धर्ममूल्यांचा व धार्मिक विचारसरणीचा उपयोग सामान्य जनतेला गुलामगिरीत व अज्ञानात ठेवण्याकडे करतात. ईश्वरवाद, अमरत्व, पापपुण्य व कर्मविपाक यांचा उपयोग आपला सामाजिक दर्जा, सत्ता व भोगसाधनें कायम करण्याकडेच सत्ताधारी वर्गाने केला आहे, असें सगळ्याच धर्मांचा इतिहास सांगतो. जातिभेदातील विषम कायदे व अस्पृश्यतेची संस्था धर्ममूल्यांनीच हजारों वर्षें जगविली. ग्राम्य भौतिक स्वार्थ साधण्यास गूढ अध्यात्मवादाचा चांगला उपयोग होतो.

भौतिकवाद हा अनैतिक असतो व गूढ अध्यात्मवाद हा नैतिक असतो, असा मेळच चुकीचा आहे. गूढ अध्यात्मवादाच्या पोटी ग्राम्य व घृणित भौतिकवाद समावलेला असतो, आणि विज्ञानशुद्ध भौतिकवादाच्या पोटात अत्यंत उच्च दर्जाचा अध्यात्मवाद साठविलेला असतो. मनुष्याची बौद्धिक व मानसिक उन्नति हाच मानवी जीवनातील अध्यात्मवाद होय. समाजांतील सगळ्या घटकांचा नित्य योगक्षेम नीट चालविण्याची तरतूद केल्याशिवाय, विद्या व कला यांचीं द्वारें सगळ्या मानवांस पूर्णपणे उघडीं केल्याशिवाय, प्रगतीची सगळीं साधनें सगळ्या समाजघटकांस प्राप्त होऊ शकतील अशी व्यवस्था केल्याशिवाय, समाजांत श्रेष्ठ अध्यात्मवाद अवतरणारच नाही. आत्म्याचा म्हणजे मनुष्याच्या शक्तींचा विकास करणे हाच मानवी जीवनातील अध्यात्मवाद होय, व ह्या विकासाकरिता सृष्टीतील सगळ्या शक्तींचें साहाय्य विज्ञान व कला यांच्या द्वारें घेणे यास विज्ञानशुद्ध भौतिकवाद म्हणतात. सामाजिक उच्च ध्येयांची साधना म्हणजेच अध्यात्मवाद होय.

विश्वाचा कार्यकारणभाव व विश्वाचें मूळ स्वरूप कसें आहे या विषयाशी संबद्ध असलेले अध्यात्मवाद व भौतिकवाद असे दोन पक्ष तत्त्वज्ञानात प्रसिद्ध आहेत. त्यांचा येथे परामर्श घेतला नाही. जीवनाशी संबद्ध जो अध्यात्मवाद व भौतिकवाद त्याचाच तेवढा येथे उलगडा केला. सृष्टीतील कार्यकारणभाव चेतन ज्ञानयुक्त शक्तीच्या संकल्पविकल्पयुक्त आत्म्याच्या आधीन आहे. विश्वातील सगळ्या घडामोडी एकमेवाद्वितीय, चेतन, विचारशील, सर्वशक्तिमान्, सर्वस्वामी, सर्वव्यापी

परम-आत्म्याच्या इच्छामात्रेकरून घडतात; आत्म्याचाच आविर्भाव म्हणजे हें विश्व होय; हा तो अध्यात्मवाद होय. उपनिषद्, गीता, शंकराचार्य, इस्लाम, ख्रिश्चनधर्म व हेगेलसारखे अध्यात्म-वादी तत्त्ववेत्ते ह्यांचा हा अध्यात्मवाद आहे. आत्मव्यतिरिक्त वस्तुशक्तींच्या कार्यकारणभावाच्या नियमांनी हें बनलें व बनत आहे, असें विज्ञानसिद्ध भौतिकवाद ( Scientific Materialism ) सांगतो. या अध्यात्मवादाची व भौतिक वादाची सविस्तर चर्चा या प्रबंधात करण्यास पुरेशी जागा नाही.

विश्वातील अनंत शक्तींचा विस्तार, सूक्ष्मता व गांभीर्य हीं पाहिलीं म्हणजे जिज्ञासूंच्या ठायी एक चमत्कृतिपूर्ण भावना उदय पावते; अनंताची संवेदना असें मॅक्स मुलर त्या भावनेला संबोधितो. ही अनंताची संवेदना ह्याच सर्वधर्मांचा आधार होय, असें मॅक्स मुलर सांगतो. ह्या विचारात एक मोठा दोष आहे, ज्ञाताच्या पलीकडचें सान्तापलीकडचें जें अनंत आहे, त्याचीच म्हणजे केवळ अव्यक्ताचीच शुद्ध भावना म्हणजे धर्मकल्पना नव्हे. धर्मकल्पनेत सान्तविश्वांतील ज्ञात व अनुभूत अशा कल्पनांचे विपर्यस्त व विकृत भ्रांतिजाल धर्मसंस्थेने निर्माण केलें आहे. स्वर्ग, नरक, ईश्वर, पुनर्जन्म, कर्मविपाक, न्यायाचा शेवटचा निवाडा, इत्यादि कल्पना म्हणजे अव्यक्त शुद्ध अनंत नव्हे. ज्ञात विश्वाच्याच पोटी गर्भित अशा कल्पनांचा आरोप करून बनविलेलें निराळें काल्पनिक विश्व म्हणजे धार्मिक तत्त्वें होत. जागृतीच्या विपर्यासाने जसें स्वप्न तयार होते, तशींच धर्मतत्त्वें सुद्धा तयार झाली आहेत.

विश्वाचें गूढ धर्मसंस्था व विज्ञान

भावपूर्ण, तरल, रम्य, उदात्त व उत्कंठापूर्ण अशा ज्या गंभीर चमत्कृतिरूप विश्वविषयक वृत्ती आत्म्याला भारून टाकतात, त्यांचा समाजसंस्थेचा अवयव बनलेल्या संस्थारूप धर्माशी संबंध कमी आहे. महासागरांत जहाजावरून प्रवास करीत असणाऱ्या तत्त्वचिंतकाला महासागरांत वीचींचें नृत्य चालू असता व अमर्याद विस्ताराचें अवलोकन करीत असता या वृत्तींचा अनुभव येतो. वालुकामय विशाल प्रदेशांतील मुशाफराला रात्रीच्या प्रशांत-समयी गगनमंडळातील तारागणांचें अवलोकन करीत असता या वृत्तींचा अनुभव येतो. वृक्षवल्लीलताहीन, पशुपक्षिमनुष्यशून्य, शीतल, हिममय व उत्तुंग अशा हिमालयांतील पर्वतराजींच्या परिसरांत या वृत्तींचा साक्षात्कार होतो. ऐन्स्टीन (Einstein) ने म्हटलें आहे कीं, "आश्चर्यपूर्ण विश्वच सगळ्यांत सुंदर आहे, असा अनुभव येतो. खऱ्या कलेचें व विज्ञानाचें तेच उगमस्थान आहे. ज्याच्या ठायीं या भावनेचा उदय होत नाही, ज्याला चमत्कृति व विस्मय वाटत नाही, त्याचे डोळे कायमचे मिटले, नव्हे तो मेला, असेंच म्हटले पाहिजे. या दृष्टीने, केवळ याच दृष्टीने, मी धार्मिक आहे." ऐन्स्टिनच्या या म्हणण्यात पुष्कळ तथ्य आहे. ऐन्स्टिनप्रमाणे कँटलाही विश्वाबद्दल अशीच विस्मयवृत्ति अनुभवावयास आली होती. तो म्हणतो—"मस्तकावरील तारकामय अनंत आकाश आणि अंतःकरणांत वसत असलेली नीतितत्त्वावरील अढळ श्रद्धा यांच्याकडे पाहून विस्मयाला पारावार राहात नाही." वसंत ऋतूतील कोमल पल्लवांनी व पुष्पानी आच्छादलेली सृष्टि व शरदांतील प्रसन्न जल, समृद्ध शस्य आणि नीलाकाश पाहून उदित होणाऱ्या कवीच्या

अंतःकरणांतील चमत्कृतीशी या वृत्तींचें साम्य आहे. या वृत्तींचा धर्मांतील भविष्यें, स्वर्गनरक, सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् संतांचे चमत्कार, अवतार व प्रेषित यांच्याशी कांही संबंध नाही. अज्ञात अचिन्त्य व अनंत विश्वापुढे नम्र होणे एवढेंच याचें फल व रहस्य आहे. या नम्रतेने विज्ञानाला जन्म दिला, धर्माला नव्हे. ही नम्रता जिज्ञासेला प्ररावते. ही नम्रता संशोधनवृत्तीला उत्साहित करते व मानवाला अपूर्णतेची जाणीव सारखी देऊन प्रगतीच्या व विकासाच्या अनंत विस्ताराची कल्पना जागृत ठेविते. धर्मसंस्थेने अशी विश्वविषयक नम्रता क्वचितच निर्माण केली आहे. धर्माने युगानुयुगे सर्वज्ञतेचा मक्ता स्वतःकडे घेतला आहे; सचेतन व अचेतन विश्वावर आपलें वर्चस्व आहे, अशी बतावणी आजपर्यंत धर्मच करीत आला आहे. धर्मानेच श्रद्धेच्या क्षुद्र टेस्ट टयूबमध्ये विश्वासंबंधी सगळें आश्चर्य व गूढ वितळून टाकलें आहे. विश्वाचें गूढ सहज लीलेने उकलून दाखवितो असा गर्व धर्मानेच आजपर्यंत वाहिला आहे. आज्ञाताबद्दल धर्माला आदर नाही; धर्माने लोकांवर नेहमी वजन कसें मारावें एवढ्याचीच फार काळजी घेतली आहे. सत्याची त्याला फारशी कदर नव्हती. उपनिषदांतील व दर्शनांतील कांही विचार वगळल्यास लोकांवर वजन ठेवण्यापुरताच कुतः, कथं, इत्यादि प्रश्नांचा धर्माने विचार केला आहे, काही धार्मिक तत्ववेत्ते यास अपवादच होत. क्षुद्र मानवाच्या सुकृतदुष्कृताशी सगळ्या विश्वाचा संबंध जोडण्याचें काम धर्मानेच आजपर्यंत केलें, कारण विशिष्ठ हितसंबंध राखणे हेंच ध्येय धर्मापुढे होते. विज्ञानाने ही भ्रांति उच्छिन्न केली. ज्योतिष, भूशास्त्र,

जीवनशास्त्र, मानसशास्त्र यांच्या योगाने ही भ्रांति उघडकीस आली.

विज्ञानाच्या प्रभेत वावरणाऱ्या मानवाच्या मनावर विज्ञानाच्या वर्तमान विकासाचा परिणाम असा होत आहे कीं, या विश्वांत मानव अत्यंत क्षुद्र आहे. महासागराच्या सगळ्या तीरावर जितकी वाळू आहे, त्या वाळूत एका कणाचें जें महत्त्व आहे, तितकेंच या विश्वांत भूगोलास महत्व आहे. ( १ ) धर्मशास्त्राने जीवास सगळ्या विश्वाचा मध्यबिंदु कल्पिलें आहे. जीवाच्या हिताहितावर व पापपुण्यावर सगळा सृष्टिव्यापार अवलंबून आहे, असें धर्मशास्त्राने मानिलें आहे. ( २ ) विश्वातील सगळ्या क्रियांच्या व घडामोडींच्या पाठीशी कांही तरी उद्देश व योजना आहे अशी कल्पना धर्माने केली आहे. हा उद्देश बाळगणारा व योजना करणारा स्रष्टा आत्मा धर्माने गृहीत धरला आहे.

या धार्मिक विचारसरणीचा त्याग करून अगदी निराळीच विचारप्रणाली विज्ञाननिष्ठ मानव निर्माण करीत आहे. त्याच्या दृष्टीने हा भूगोल अणूंच्या व्यापाराने केव्हां तरी निर्माण झाला आहे. त्यावर जीव व मानव उत्पन्न झाला. हा मानव भोवतालच्या सृष्टीशी झगडत त्या सृष्टीला अधिकाधिक वश करून जगण्याचा प्रयत्न करीत आहे. या प्रयत्नात त्याला वाढतें यश प्राप्त होत आहे. शास्त्रज्ञ मानव विश्वांतील शक्तींच्या घडामोडी स्वतःच्या जीवनाचेंच प्रतिबिंब ( anthropomorfic ) होय असें

मानण्याचें सोडून देऊ लागला आहे; आपणांस पाहिजे तसें हें विश्व आहे, असें मानण्याची रानटी विचारपद्धति तो टाकून द्याव-यास लागला आहे. ज्ञातापेक्षा अज्ञात अनंत पटीने महान् आहे, हें ओळखून त्या अज्ञाताला ज्ञानाच्या मर्यादेत खेचून स्ववश कर-ण्याचा कर्मयोगच शास्त्रज्ञ मानवास पसंत होत आहे. " मी पुण्य-संपादन करण्याचा प्रयत्न करीत असताच पापाने मला घेरलें आणि प्रकाशाकरितां धडपडत असतां अंधकाराने मला ग्रासलें. " अशी उपनिषदांत वर्णिलेली तक्रार तो यापुढे करणार नाही. या पापास व अंधकारास निवारण्याकरिता तो देवाचा धावा न करिता मान-वाच्या कर्मकौशल्यावरच जास्त भर देऊ लागला आहे. समाजातील अन्याय, वैषम्य, निर्घृणता, कृपणता, दैन्य, उपासमार, अज्ञान, इत्यादि दुर्गुणांबद्दल देवास किंवा दैवास जबाबदार न धरता समाजरचनेसच तो जबाबदार धरू लागला आहे. ज्या प्रश्नांची उत्तरें मिळणें असंभवनीय आहे त्या प्रश्नांची काल्पनिक उत्तरें देऊन धर्म आत्मवंचना करतो. अशी आत्मवंचना विज्ञाननिष्ठ मानव करणार नाही. हे प्रश्न सुटत नाहीत, असें म्हणून प्रश्न-पत्रिका कोरी ठेऊन पराभव व अल्पज्ञता कबूल करण्याइतकी ऋजुता त्याच्या मनाला प्राप्त झाली आहे. तो वातावरणावर ताबा प्राप्त करील, नवीन तारकांचा शोध लावील, अचेतन सृष्टीला सचे-तन बनवील, रोगांचा संपूर्ण नाश करील, दीर्घायुष्य प्राप्त करील, सगळी पृथ्वी एखाद्या रेखीव व नवीन सुंदर शहरासारखी निर्वेध निर्विघ्न व सुगम करील, मृत्यु म्हातारपणीं झोपेसारखा जरूर व गोड वाटेल असें आरोग्य साधील. ज्ञानाचें क्षेत्र व्यापक होत आहे,

त्यामुळे अस्ताव्यस्त व मिथ्याभूत पौराणिक कल्पनांनी तो फसवणूक करून घेणार नाही. या विश्वाच्या अंतर्यामी गूढ सचेतन देवतांचा व्यापार सुरू असतो, मृत्यूनंतर धार्मिक व आध्यात्मिक जीवास योग्यतेप्रमाणे स्थान व फळ प्राप्त होतें इत्यादि प्रकारच्या भ्रांतीच्या जाळ्यातून मुक्त होऊन मेल्यानंतर प्राप्त होणाऱ्या स्वर्गाला या भौतिक विश्वांतील इंद्रियगम्य समाजात आणण्याचा प्रयत्न विज्ञानाचें बळावर मानवाने करावा, अशी परिस्थिति आज उत्पन्न झाली आहे. नवी समाजरचना निर्माण करण्याकरिता झगडा केव्हांच सुरू झाला आहे. धर्मक्षेत्रांत लढत असता चंद्रसूर्यतारकांच्या पलीकडच्या स्वर्गाच्या साधनेकरिता सर्वस्वार्पण करण्याची तयारी मनुष्याने युगानुयुगे दाखविली आहे. भलत्याच खोट्या मार्गांत फुकट जाणाऱ्या त्याच अगणित जीवनशक्तींना सत्यसृष्टीतील वास्तवानुसारीं ध्येयें सिद्ध करण्याची अगणित साधनें सापडलीं आहेत व सांपडत आहेत. या साधनांनी दृष्टीच्या टप्प्यांत आलेलें, चैतन्याने रसरसलेलें, अचेतनांत जीवन ओतणारें, विद्युत्–संचय करणाऱ्या यंत्राप्रमाणे थरारणारें, मध्यान्हीच्या सूर्याप्रमाणे देदीप्यमान असलेलें नवीन सामाजिक विश्व निर्माण करणे हेंच मानवशक्तीचें या पुढील साध्य आहे.

धर्मापेक्षां श्रेष्ठ सामाजिक संस्था

आतां धर्मसंस्थेपेक्षा उच्चतर अशा सामाजिक संस्था निर्माण होऊ लागल्या आहेत. धर्मसंस्थेने मानवसमाजार्थ पूर्वी जी कामगिरी बजावली तीच कामगिरी अधिक कुशलतेने व उच्च भूमिकेत राहून पार पाडणारीं साधनें व संस्था समाजाने निर्माण करण्याचा प्रयत्न

सुरू केला आहे. पूर्वीच्या धर्मसंस्थेस माहीत नसलेल्या सामाजिक व्यवस्थेची गरज आता उत्पन्न झाली आहे.सर्व मानवांना सर्व विद्याकलाच्या शिक्षणाची तरतूद करणारी समाजव्यवस्था आता पाहिजे; समाजांतील प्रत्येक घटकाचा योगक्षेम नीट चालविता येईल अशी आणि यांत्रिक–औद्योगिकं धंद्यांवर सामाजिक मालकी स्थापून निर्मिलेली आर्थिक पुनर्घटना पाहिजे; आर्थिक उत्पादनाच्या साधनांच्या खाजगी मालकीवर उत्पन्न झालेल्या सरंजामदारी व भांडवलदारी वर्गांचें ज्यात अस्तित्व नाही अशी समाजरचना पाहिजे; समाजवादी तत्वावर अधिष्ठित व लोकसत्तेच्या राज्यघटनेने युक्त अशी समाजसंस्था पाहिजे.

वरील नूतन ध्येयें आपल्या परंपरेचीच नव परिणति आहे. व्यासाने मानवव्यवहाराला, लोकव्यवस्थेला व समाजधारणेला मुख्यत्व देऊन शाश्वत नैतिक मूल्यांनाही सापेक्ष ठरविलें; बुद्धाने मानव्याला मध्यवर्ती स्थान दिलें; वेदांपासून तो शंकराचार्यांपर्यंत तत्त्ववेत्त्यांनी सत्याच्या नित्यसमीक्षेचा व संशोधनाचा अग्नि जागृत ठेविला. हिंदुधर्माचा हा थोर वारसा भारतीयांना मिळालेला आहे, तो न सोडता, भूतकालांत कधीही निर्माण करता आलें नाहीं असें उच्च सामाजिक जीवन निर्माण करण्याची जबाबदारी त्यांच्या-वर आहे. भूतकालांतील परिस्थितीला उच्च ध्येय समजून जे वर्तमानकालात प्रयत्न करतात, त्यांना भविष्यकाळ नसतो. नव्या काळात नवीं ध्येयें व नवीं साधनें निर्माण करणारेच लोक थोर भवितव्याचे कर्ते बनतात. भूतकालीन विचारांची पायरी पायाखालीं घातल्याशिवाय नवविचारांचें उच्चतर स्थान गांठता येत नसतें.

# संदर्भ ग्रंथ



## मराठी ग्रंथ.


| ग्रंथ — | — लेखक |
| --- | --- |
| गीतारहस्य, | लो. टिळक |
| नीतिशास्त्रप्रवेश, | प्रो. वा. म. जोशी |
| धर्मरहस्य, | विद्वद्रत्न के. ल. दप्तरी |
| धर्मविवादस्वरूप, | ,, ,, |
| तात्विक मीमांसापद्धति, | ,, ,, |
| आमचा सनातन धर्म, | श्री. ह. कृ. मोहनी |


## संस्कृत ग्रंथ.


(१) ऋग्वेद, (२) अथर्ववेद,
(३) वाजसनेयी संहिता, (४) ऐतरेयब्राह्मण,
(५) तैत्तिरीयब्राह्मण, (६) ताण्ड्यब्राह्मण,
(७) शतपथब्राह्मण, (८) बृहदारण्यकोपनिषत्,
(९) छांदोग्योपनिषत्, (१०) कठोपनिषत्,

(११) श्वेताश्वतरोपनिषत् , (१२) कात्यायनश्रौतसूत्र,
(१३) गौतमधर्मसूत्र (१४) वसिष्ठधर्मसूत्र,
(१५) कौशिकसूत्र, (१६) मनुस्मृति,
(१७) याज्ञवल्क्यस्मृति, (१८) वैशेषिकसूत्र,
(१९) न्यायसूत्र, (२०) योगसूत्र,
(२१) जैमिनीयसूत्र, (२२) ब्रह्मसूत्र,
(२३) भगवद्गीता, (२४) महाभारत,
(२५) कौटिलीय अर्थशास्त्र.

(२६) गीताभाष्य, शंकराचार्य.
(२७) शारीरभाष्य, ,,
(२८) श्लोकवार्तिक, कुमारिलभट्ट.
(२९) तंत्रवार्तिक, ,,



# BIBLIOGRAPHY.




(1) Studies in the Philosophy of religion, by Pringle Pattison.

(2) Natural history of religion, by David Hume.

(3) Elementary forms of religious life, by Durkheim.

(4) History of Hindu Philosophy, by Prof. Radhakrishnan.

(5) Eastern Religion and Western thought, by "

(6) Hindu view of life, by "

(7) Religions of India, by Hopkins.

(8) The thresholds of religion, by Dr. Marett.

(9) Religion of the Semites, by Robertson Smith.

(10) Origin and growth of religion; as illustrated by the religions of India, by Max Mullur.

(11) S'aivism, Vais'navism and other minor religious sects, by Dr. Bhandarkar.

(12) Primitive culture, by E. B. Tylor.

(13) Golden Bough, by Sir James Frezer.

(14) The Philosophy of Hegel, by W. T. Stace.

(15) The Decline of The West, by Oswald Spengler.

(16) Introduction to critique of political Economy, by Karl Marx.

(17) Communist Manifesto, by Karl Marx.

(18) Hegelian philosophy of Right, by Karl Marx.

(19) Ludwig Feuerbach, by F. Engels.

(20) Anti-Dhuring, by "

(21) Essence of Christianity, by Feuerbach.

(22) From Hegel to Marx, by Sidney Hook.

(23) Introduction to Kant's philosophy, by N. Clerk.

(24) Intelligence in the Modern world philosophy, by Dewy.

(25) The Historical method in Social Sciences, by M.M. Postan.

(26) The History of Europe, by Fisher.

(27) Science Religion And Reality, by Needham.

(28) Totem and Taboo, by S. Freud,

(29) The varieties of religious experience, by Willaim James.

(30) The education of human race, by Lessing and Herder.

(31) General Anthropology, edited by Franz Boas

(32) Census Ethnography, India 1901-1931, by Prof. T. C. Hodson.

(33) Census of India, 1931 Vol. I Part III, by B. S. Guha.

(34) Encyclopaedia of social Sciences

(35) Heredity and Politics, by J.B.S. Haldane.

(36) We Europeans, by Julian Huxley, A. C. Haddon, A. M. Carrsaunders.

(37) Passing of the Gods, by Calvertun.

(38) Vicissitudes of Aryan Civilization in India. by M. M. Kunte.



# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३ | १८ | उत्तन्न | उत्पन्न |
| १४ | २ | तत्वें, | तत्त्वें |
| २१ | १६ | देवता, | देवता. |
| २५ | ११ | आस्तेयादी | अस्तेयादि |
| २६ | ६ | संबंध; | संबंधः— |
| ३० | २३ | Ebid | Ibid |
| ३२ | १५ | पद्धतीस | पदवीस |
| ३६ | ११ | भौतिक, ऐतिहासिक व | भौतिक व ऐतिहासिक |
| ४३ | १६ | उच्चारण | उच्चाटण |
| ५२ | १८ | मॅलिनोस्की | मॅलिनोस्कीने |
| ६२ | १ | Conscious | Consciousness |
| १४० | ४ | करण्याकरिता | करण्याकरिता आचरिलेल्या |
| १४५ | १० | आध्यात्म | अध्यात्म |
| १५२ | २० | धातु किंवा | धातु, |
| १६३ | १७ | बौधिक | बौद्धिक |
| १८५ | २० | त्यात | यात |
| १९७ | १६ | घातला | आला |
| २०१ | १४ | रोन्दोल | रान्दोल |
| २०४ | १ | बतन | बनत |
| २१० | २१ | तीन | चार |
| २११ | १८ | तीन | चार |
| २११ | १९ | वैशत्व | वैश्यत्व |
| २३० | १५ | आज्ञाता | अज्ञाता |

—0—